प्रकाशक

**बळवंत विष्णु परचुरे**

**परचुरे, पुराणिक आणि मंडळी,**

बुकसेलर्स व पब्लिशर्स, माधवबाग, मुंबई नं ४

  



  

मुद्रक

**अनंत सखाराम गोखले**

'विजय' प्रेस, ५७० शनवार, पुणें

# प्रास्ताविक

'पेशवाईतील दुर्जन' हा 'कादंबरीमय पेशवाई' मालेतील आठवी कादंबरी होय. 'गुजराथ माळव्याकडे शाहूमहाराजाचे सेनापति त्रिंबकराव दाभाडे हे स्वार्थाला व अनुचित्या कारस्थानाना बळी पडून पेशव्याच्या जाचातून शाहू-महाराजाना सोडविण्याचा लटका बहाणा करून अरेरावीने वागत होते व त्याना काही हस्तकही मिळाले होते. सेनापतींच्या त्या उपद्व्यापाना आळा घालणे अपरिहार्य होऊन बसल्याने शाहूमहाराजाच्या अनुमतीने श्रीमंत बाजीराव पेशवे यानी ती कामगिरी स्वतःच्या शिरावर घेतली. त्याना प्रथम सेनापतीशी सलोखा करण्याचे होते नव्हते तेवढे गोडीगुलाबीचे प्रयत्न करून पाहिले. पण त्या प्रयत्नाना यश येण्याचा मुळीच संभव दिसेना. तेव्हा पेशव्याना अखेर सेनापति व त्याचे हस्तक याविरुद्ध समरांगणावर उभे रहावे लागले. गुजराथेत डभई येथे त्या उभय सैन्याचे युद्ध झाले. त्या युद्धात सेनापतीचा पूर्ण मोड होऊन त्यातच त्याचा अंत झाला' हा प्रस्तुत कादंबरीच्या कथानकाचा ऐतिहासिक पाया होय. ही डभई-ची लढाई तारीख १ एप्रिल १७३१ ह्या दिवशी झाली.

कथाभागाबरोबर ह्या इतिहासाचेंही विवेचनात्मक निवेदन माझ्या नेहमीच्या परि-पाठाप्रमाणे एकसमयावच्छेदेकरून केले जाईलच. पण त्या विवेचनाच्या समर्थनात्मक थोडा खुलासा येथे होणे अवश्य आहे. प्रस्तुतच्या डभईच्या लढाईचा प्रसंग इतिहासविश्रुत आहे यात तर संशयच नाही. पण ह्या लढाईत अथवा ज्या कारणपरंपरेमुळे लढाई झाली त्या कारणपरंपरेत खरा व जास्त दोष कोणाचा हा विचार करण्याजोगा मुद्दा एथे ओघानेच उत्पन्न होतो, निदान उपलब्ध ऐतिहासिक साधनामुळे तो उत्पन्न झाला आहे. उदाहरणार्थ, 'दाभाड्यांची बखर' ह्या इतिहासग्रंथात हा प्रसंग सविस्तर व रसस्फुरित वर्णन केला आहे. त्यातील महत्त्वाचा आशय असा —'त्याचे (दाभाड्याचे) फौजेत बाजिरावाने फितूर केला होता हे त्याजला माहीत नव्हते. त्रिंबकराव दाभाड्याचे सापत्न मामा मानसिंग-राव टोके पेशव्याचे फितुरात होते. त्यानीं बारगिरास सांगून गोळा मारविला, तो त्रिंबकरावाचे कानफटींत लागून त्यायोगे सायंकाळीं मृत्यु पावले. पाणी पाजावया-चे मिसें चाळीस हजार फौज पळून गेली. हे वर्तमान मागें यशवंतराव (दाभाडे)

सेनाखासखेल यास सांडणीस्वार लढाई सुरू झाल्यावर रवाना झाला होता तो पोचल्यावर, कळले ते फौजेनिशीं तयार होऊन चढोन गेले पेशवे पुढे पळो लागले ते पुढे, मागे कूच दरकूच सातारियास दाखल जाले सेनाखासखेल व व बाबूराव (दाभाडे) आले त्यास राजश्री यांनी आज्ञा केली की, तुम्ही माझा गळा कापून ब्राह्मणास मारणे, मी अपराधी आहे ऐसे उत्तर महाराजाचें ऐकोन उभयता वधु कूच करून रुसोन तळेगावीं आले मागे राजश्री तयारी करून समजाविसाकरिता तळेगावास आले, बोलण्याचालण्याची तोड पाडून, राजश्रीस मेजवानी सवाई याचे वाड्यात केली तेथे मोहरा-रुपयाची चौनरी करून वर राजश्रीस वर्सविले ते समयी राजश्रींनी गळ्यात पदराळे व तरवार घालून, बाजीराव यास उभा करून, उमाबाईस बोलावून आणून, पदरा यातील तरवार काढोन बाईपुढे ठेविली व बाजीराव याजला पायावर घातले, आणि बोलले की, तू आपले हाते याचा गळा काप नंतर समजूत पटला'

वरील मजकूर वाचताना कोणाला वाटाव की, 'जणु काय पेशवे व सेनापति यांच्या झगड्यात सारी चूक पेशव्याचीच होती! पेशव्यांनी सेनापतीच्या पक्षात फितूर करून त्याला मारविले पुढे सेनापतीच्या बंधूंनी पेशव्याना हा हा म्हणता ठार केले असते व शाहूमहाराजानाही पेशव्याचे समर्थन करण्याला अन्य उपाय सापडेना, पेशव्याचे रक्षणही त्याना करता येईना, म्हणून त्यानी उभयता दाभाडे बंधूना ब्रह्महत्येच्या पातकाची जाणीव करून दिली, व आपल्या हातून ते पातक होऊ नये म्हणूनच दाभाडे बंधु रुसून तळेगावी गेले त्यानंतर त्यांनी दाभाड्याची आई उमाबाई हिला भेटावयाला मुद्दाम पेशव्यासह तळेगावी जाऊन पेशव्याना तिच्या पायावर घालून त्याच्यासाठीं प्राणदान मिळविले' हे विवेचन अत्यंत हृदय स्पर्शी आहे, व हा बखरकार खरोखरच मोठा मार्मिक लेखक असला पाहिजे याबद्दल वादच नाही त्याप्रमाणेच जुन्या ऐतिहासिक पोवाड्यांत त्रिंबकराव दाभाड्याचा एक पोवाडा उपलब्ध आहे, त्यात इतरत्र उपलब्ध नसलेली बरीच माहिती उपलब्ध आहे, व त्या शाहिराला त्रिंबकराव दाभाड्याची आई उमाबाई व इतर परिवारा तील माणसे याच्याकडून चांगली बक्षिसे मिळाल्याचा उल्लेखही त्याच पोवाड्याच्या शेवटी केलेला आहे यावरून हा पोवाडा त्याच काळी पेशवे व सेनापति याचा युद्धप्रसंग झाल्यानंतर थोड्याच दिवसानी रचण्यात आला असावा असे दिसते. हा पोवाडाही रसाळ आहे

पण दाभाडयाची बखर अथवा उपरोक्त पोवाडा या दोन्ही ऐतिहासिक प्रमाणांत पेशवे व सेनापति यांच्यांत युद्धप्रसंग का झाला याच्या कार्यकारणभावाचा विचार करण्यात आलेला नाहीं उलट त्यांत शक्य तों दाभाडयांचे श्रद्धापूर्वक गुण-गौरवगानच केलेलें आढळतें असें होण्याचें कारण उघड आहे बखरी, पोवाडे वगैरे वाङ्मय इतिहासाला प्रमाणभूत कोठवर मानावें याचा आजवर पुष्कळच खल होऊन ऐतिहासिक संशोधनांत त्याचा नंबर ओघानेंच बराच खालीं लागला आहे त्या काळी बखरी किंवा पोवाडे यांची रचना करणाराच्या दृष्टीसमोर सत्येतिहासकथन हें एकच ध्येय नसे, 'ज्याची खावी पोळी, त्याची वाजवावी टाळी' या न्यायाने थोरा मोठयाच्या पदरचे गुणिजन पोवाडे वगैरे काव्यें व बखरी रचीत असले पाहिजेत, ही गोष्टही बखरी व पोवाडे यांचे प्रामाण्य ठरवितांना विचारांत घेणें अवश्य आहे दाभाड्याची बखर अशीच विरचिली गेली असली पाहिजे, व पोवाडा तर अशाच उद्देशानें विरचिला गेला असावा हे त्या पोवाडेगायनाबद्दल शाहिराला जे वर्षासन मिळालें त्यावरून उघड आहे आणि म्हणूनच हा उपरोक्त गोष्ट ध्यानीं घेऊन दाभाडयाची बखर व पोवाडा यातील विवेचनाला विभूतिपूजाप्रियतेमुळें ओघानें प्राप्त झालेलें एकांगित्व सारासारविचारपूर्वक बाजूला सारून त्यांतील इतिहास तेवढा पारखून घ्यावयाला हवा ही विवेचनात्मक सूचना या ठिकाणीं मुद्दाम देण्याचें कारण पेशवे व सेनापति यांच्या युद्धप्रसंगाबाबतचा खरा इतिहास उपरोक्त बखर व पोवाडा यांच्या द्वारा ध्वनित होणाऱ्या इतिहासाहून अगदीं निराळा आहे, व कित्येक लेखक-लेखिकांनी उपरोक्त बखर आणि पोवाडा यांतील विधानांना इतिहासप्रमाणें मानून इतरत्र उपलब्ध असलेल्या इतिहासप्रमाणांना नजरेखालीं घालण्याची तसदी न घेतां सेनापतिवधाच्या पापाचें खापर बाजीराव पेशव्याच्या माथीं फोडण्याचें अविचारी कृत्य केलें आहे !

ह्या एकांगी विचारसरणीमुळें बाजीराव पेशव्यावर [१] सेनापतीची आगळीक केल्याचा, [२] सेनापतीच्या सैन्यांत फितूर केल्याचा, [३] फितुराकडून विश्वासघातानें सेनापतीला मारविल्याचा, [४] सेनापतीचे बंधु पाठलाग करूं लागले तेव्हां रणांगणातून पळ काढल्याचा, आणि [५] शाहूमहाराजाच्या मध्यस्थीनें दाभाड्यापासून आपला बचाव केल्याचा, असे पांच आरोप प्रत्यक्षतः किंवा अप्रत्यक्षतः लागू होऊं पाहतात. पकीं पहिल्या आरोपाचें खंडन आजवरच्या उपलब्ध इतिहाससाधनांनी परस्पर निर्विवादपणें

झालेले आहे व प्रस्तुत कथानकाच्या अनुरोधानेही ती चर्चा सविस्तरपणे झालेली वाचकांना पहावयाला मिळणारच आहे दुसरा आरोप काही अंशी खरा ठरला तरी त्यामुळे आधुनिक युद्धनीतीला मुळीच नाव न येता उलट त्या निमित्तानें बाजीराव पेशव्याच प्रतिस्पर्ध्याला चीत करण्याचे चातुर्य ठळकपणें दिसून येते जिथे सेनापति निजामासारख्या हिर्दवाच्या हाडवऱ्याला सामील होऊन आसुरी स्वार्थलालसेनें राजद्रोहाचें भयकर पातक उघड उघड जोडण्याइतका व राजाज्ञा पायाखाली तुडविण्याइतका अरेराव माजला होता, तिथे बाजीराव पेशव्या सारख्या त्याच राजवटीच्या मुख्य कारभाऱ्याने शाहूमहाराजाच्या अनुमतीने अशा अरेरावाचे पारिपत्य करण्याच्या कामी 'शठ प्रति शाठ्य' या न्यायाचा अवलब केला तर कोठे बिघडले ? तिसरा आरोप तर सर्वथैव खोटा आहे याला प्रत्यतर म्हणून पुढील उतारा पुरेसा आहे —"सेनापतीचे फाजेचा मोड होऊन पळू लागले. त्रि कराव जातीने आडून उभे राहिले लोक थोडे राहिले हत्तीवरील महात पडला असता जातीने पायाने हत्ती चालवून तिरदाजी केली तेव्हा साडणीस्वार बाजीराव याणी पाठविला जे 'अशी लढाई शत्रूशी करून महाराजास सतोषी करावे ते आपणास कशास पाहिजे ? आम्ही लढाई तहकूब करितो आणि भेटीस येता', असे सागून पाठवले परतु वीरश्रीस पडून तसाच हत्ती पुढे चालविला बाजीराव याणीं आपले लोकास ताकीद केली की, 'सेनापतीस कोणी जाया करू नये' परतु इतकियात, होणारानुरूप, सेनापतीच्या कपाळास गोळी लागली ठार जाले हे पाहून बाजीराव मागे सरून फौजेत लूट अथवा पाठलाग करू नये, बुणगे लूट नये, हत्ती घोडे कोणी घेऊ नये, पाडाव जाहलें असेल ते सोडून द्यावे, म्हणोन सरून जाऊन राहिले आणि मातबर मजली करून जावे असे केले सर्व वर्तमान महाराजास लिहून पाठविले आणि महाराजास येऊन भेटले सर्व वृत्त समजाविले महाराजानी चित्ती आणिले जे, अविवेक करून नवाबा(शीं ?)नी राजकारण केले दुर्बुद्धि धरून आगळीक करून आपणातच लढाई केली त्याचे फळ जाहले परतु मोठे माणूस पदरचे व्यर्थ जाया जाहले जाली ते गोष्ट पुन्हा येत नाही पुढे उभयताचेही मनास आणोन करणे तसे करता येईल" (चिटणीसकृत थोरले शाहूमहाराज याचे चरित्र, पृष्ठ ५० ) ह्या उताऱ्यात सेनापतीला मानसिगराव टोके याने मारल्याचा स्पष्ट उल्लेख नाहीं पण तो बखरींत व पोवाडयातही आहे, तोच ग्राह्य धरला तरी तो मानसिंग बाजिरावाचा फितूर होता

याला आधार नाही उलटपक्षी मानसिंग हा सेनापतीचा सावत्र मामा होता हें लक्ष्यात घेता त्या सावत्रपणात आणखी अन्य वैमनस्याची भर पडून मानसिंगानें आपल्या भाच्याचा आडून हस्तेपरहस्ते अचानक बळी घेतला असेल चौथा आरोप केवळ 'पडलों तरी माझेंच नाक वर' अशा स्वरूपाचा आहे कारण सेनापतीची प्रस्तुत युद्धप्रसंगी चाळीस हजार फौज होती, तिचा पाडाव झाल्यावर किंवा ती सारी फौज 'पाणी पाजावयाचे मिसें' पळून गेल्यावर बाजीराव तरी कोणाला भिऊन पळणार ? दुसरें असें कीं, एखादा शेंदाड शिपाईसुद्धा अचानक एवढा विजय कसाही पदरी पडल्यावर पळ न काढण्याइतका धीट नि सशय बनेल, मग बाजिरावासारखा रणशार्दूल रणांगणातून पळाला असें म्हणणाराला थोडेसे तरी तारतम्यज्ञान असेल असे कोणीं कसें म्हणावें ? शेवटचा आरोप तर इतका फोलकट आहे की, त्याचे खडन करण्याचीच आवश्यकता नाही

येथवरचे विवेचन वाचल्यानंतर पेशवे व सेनापति यांच्यातील प्रस्तुत युद्ध-प्रसंगाची कार्यकारणपरंपरा स्थूलमानें पण सुसंगतपणे वाचकांच्या ध्यानी येईल अशी आशा आहे ह्या परंपरेला अनुसरूनच इतिहासाची मुळीच हानि न करता प्रस्तुत कादंबरी विरचिली गेली आहे

'कादंबरीमय पेशवाई' मालेमधून पेशवाईचा समग्र इतिहास सुमारे पचवीस कादंबऱ्यांत पूर्ण करावयाचा असा माझा सकल्प प्रथमच जाहीर झाला आहे त्या सकल्पानुसार प्रस्तुत कादंबरीसह आजवर आठ कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या, म्हणजे आपण एकदर सकल्पित कार्यक्षेत्राचा एक तृतीयांश पल्ला गाठला ह्या कार्याला प्रारंभ होऊन आज जवळ जवळ तीन वर्षे पुरीं झालीं अर्थात् प्रति-वर्षी चार कादंबऱ्या प्रसिद्ध करावयाच्या ह्या नियमानुसार झालें हे कार्यही कमीच झाले ही चूक असेल तर त्या चुकीचा धनी सर्वस्वी मी आहें पण मी तरी हें कार्य दिरंगाईने करीत आहें असेही नाहीं माझ्या मनाजोगे हे कार्य होण्याला एवढा अल्पस्वल्प विलंब प्रारंभी अपरिहार्यच होता यापुढे इतका विलंब लागणार नाही असें वाटते पहावें काय होतें ते देवाची मजा ! हें कार्य जसें श्रेयदायी, आनंददायी व उपयुक्त आहे, तसेंच ते अवघड व जबाबदारीचेंही आहे. तें हौशी, कार्यदक्ष व जनमान्य अशा प्रकाशकाच्या स्वयंप्रिय श्रमांनी व महाराष्ट्र जनतेच्या अतःकरणपूर्वक सक्रिय सहानुभूतीने दिवसेंदिवस कल्पनेबाहेर यशस्वी होत आहे मुद्रणकलावैभवसंपन्न 'विजय' मुद्रणालयांतच मालेचे मुद्रण होत

असल्याने ह्या मालेतील कादबऱ्याच्या बाह्य सौंदर्यात नितान्त चारुतेची स्वाभाविकपणेच भर पडत आहे समस्त महाराष्ट्रीय विद्वज्जनवृंदानाही ह्या मालेचा उत्कट अभिमान व आपलेपणा वाटतो व तो त्यानी वेळोवेळी प्रशंसोद्गारानी प्रदर्शित केला आहे यामुळे ही माला आज महाराष्ट्रातील आबालवृद्ध स्त्री पुरुषाना परिचित व प्रियतम बनून राहिली आहे ह्या यशात माझा लेखक या नात्याचा वाटा थोडाचाच आहे याची मला इतराहून जास्त जाणीव आहे ह्या यशाचे मुख्य धनी मालेचे प्रकाशक आहेत मालेचे कार्य पूर्ण होण्यापूर्वीच मीं त्याचा असा गौरवपूर्ण उल्लेख करणे कोणाला कदाचित् औपचारिकसे वाटेल, पण मालेला प्रतिदिनी अधिकाधिक प्राप्त होणारे शुक्ल वत यश पाहून माझे अंतःकरण उचंबळून येते, ते असे योग्य स्थली उघडे केल्याने मनाला अपूर्व समाधान वाटते अगदीं मोजक्या शब्दात कजुषपणे सागावयाचे तर मालेचे प्रकाशक हे नुस्ते प्रकाशक नसून जसे मालेचे तसेच मालाकाराचेहि रक्षणकर्ते आहेत ते कसे, ते याहून विस्ताराने निवेदन करावयाचे तर ती एक मोठी हृदयस्पर्शी आत्मकहाणी होईल पुढेमागे परमेश्वराने तसा सुयोग मला माझ्या आयुष्यात प्राप्त करून दिला तर 'कादंबरीमय पेशवाई'चें संकल्पित लेखनकार्य पूर्ण झाल्यावर जरूर वाटल्यास ती आत्मकहाणीही मी निवेदन करीन पण संकल्प करण्यापेक्षा तो पाळणे जास्त अवघड असल्याने आज त्याविषयी जास्त ऊहापोह नकोच

प्रस्तुतची कादंबरी ता १० मार्चला प्रसिद्ध होईल असे जाहीर करण्यात आले होते. ह्या कार्याला प्रारंभ झाल्यापासून आजवर मधून मधून जो कालव्यय झाला त्याचा भरपाई करण्याचा माझा विचार होता, पण मध्यंतरी इतर सार्वजनिक कार्यव्यापामुळे व एका आकस्मिक आजाराने राईचा पर्वत होऊन त्यातच माझ्या आयुष्यातील एक महिना वाया गेल्यामुळे एवढा उशीर कादंबरीच्या प्रकाशनाच्या कामी अपरिहार्यपणे झाला त्याला माझा तरी काय इलाज !

असो. आता यापुढे कोंकणात सिद्दीने पुन्हा माजविलेल्या अंधाधुंदीचा नायनाट श्रीमंत बाजाराव पेशवे यानी करून पश्चिम दिग्विजय कसा संपादन केला, ह्या मनोरम व हृदयस्पर्शी प्रसंगावर

**'पेशवाईतील पश्चिम दिग्विजय'**

ही 'कादंबरीमय पेशवाई'मधील नववी कादंबरी विरचिली जावयाची असून ती यथाकालीं प्रसिद्ध होईल, एवढें सांगून वाचकाची तूर्त रजा घेतो

व्यंकटपुरा, सातारा.
तारीख १।५।२९

**विठ्ठल वामन हडप**

# पेशवाईतील दुर्जन

## विषयप्रवेश

श्रीमंत बाजीराव पेशवे व छत्रपति शाहूमहाराज या उभयतांचाही मुक्काम तेव्हां साताऱ्यात होता.* कोल्हापुराकडे संभाजीराजे व त्यांचा शिरजोर हस्तक उदाजी चव्हाण यांनी पुन्हा एकवार शाहूमहाराज व पेशवे यांच्या विरुद्ध उचल खाल्ली होती व तेव्हांच शाहूमहाराजांचे† नवे सेनापति त्रिंबकराव दाभाडे यांनी गुजराथ माळवाप्रांतीं पेशव्यांच्या निःपाताचे अचाट कारस्थान रचून पेशवे व इतर मराठे सरदार यांनी त्या प्रांतीं मराठशाहीच्या नांवावर हस्तगत केलेला मुलूख बळजबरीनें स्वतःच्या घशांत लोटण्याचा डाव मांडला होता. अशीं हीं दोन महासंकटें एकाच वेळीं आपला जबडा पसरून 'खाऊं का गिळूं' अशा अहमहमिकेनें चालून आल्यामुळें या दोन्ही संकटांना एकाच वेळीं तोंड देणें बाजीराव पेशव्यांना प्राप्त झालें होतें. पैकीं कोल्हापुराकडील मोहिमेंत विजयश्रीला प्रथम वश करून व पुढें कोल्हापूरकर आणि सातारकर यांच्यांत स्नेह वगैरे तडजोडीचे उपाय जे योजावयाचे, त्यांची योग्य योजना करून त्या योजनेची अमलबजावणी होण्यापूर्वीच बाजीराव पेशवे दुसऱ्या संकटाला तोंड देण्याची तयारी करण्यासाठीं साताऱ्याला आले होते. तेथें शाहूमहाराजांशीं बरेच दिवस ह्या प्रश्नाबाबत वाटाघाट करून त्यांनी प्रथम दाभाड्यांशीं जुळतें करून घेतां येईल याविषयीं एखादी उपाय-

---

* 'पेशवाईचा दरारा' ही ह्या मालेंतील सातवी कादंबरी ह्याच प्रसंगावर विरचिली गेली आहे.

† सेनापति खंडेराव दाभाडे ता. १५ मे १७२९ नंतर मुतखड्याच्या विकारानें मरण पावला. त्यानंतर ता. ८ जानेवारी १७३० रोजीं शाहूमहाराजांनी त्रिंबकरावाला सेनापतिपदाचीं वस्त्रें दिलीं. लगेच त्रिंबकरावाची बुद्धि चळली. तो पेशव्यांचा प्रतिस्पर्धी बनला. त्याचें पारिपत्य करण्यासाठीं बाजीराव पेशव्यांनी इ० सन १७३० च्या पावसाळ्यापासूनच मोहिमेची तयारी चालविली. त्या वर्षी ऑगस्टांत ते पुण्याला आले व दोन महिने मोहिमेची तयारी करीत होते. प्रत्यक्ष मोहिमेला सुरुवात ता. १०।१०।१७३० रोजीं झाली.

योजना करण्याची बाजिरावाची मनीषा होती, आणि दरम्यान् एक अनिष्ट प्रकार घडला नसता तर दाभाडे आणि पेशवे याच्यातील लढा तेव्हाच सामोपचाराने मिटला असता ज्या अनिष्ट प्रकाराने हे सारे सामोपचार अशक्यप्राय ठरविले, तो प्रकार असा की, दाभाड्यांनीं शाहूमहाराज व बाजीराव पेशवे याच्यात वितुष्ट आणून महाराजाची मर्जी सुप्रसन्न करून घेण्याच्या हेतूने शाहूमहाराजाना त्याच्या परिचयातील भास्करराम कोल्हटकर नावाच्या एका गृहस्थाच्या मार्फत एक पत्र पाठविले होतें 'पेशवे हे उपरे उपटसुंभ आहेत, ते फार आपमतलबी आहेत, महाराजाचे राज्य गिळवून घेऊन स्वत सिंहासन बळकावण्याचा त्याचा दुष्ट हेतु आहे, त्यापासून महाराजाच्या राज्याचें रक्षण व्हावे म्हणून आम्ही महाराजाच्या वतीनें उत्तरप्रांती पेशव्याविरुद्ध शस्त्रग्रहण केले आहे तरी महाराजानीं आमचा उदात्त हेतु ओळखून आम्हाला साह्य करावें' हा त्या पत्रातील आशय होता दाभाड्याच्या ह्या मानभावी पत्रामुळे महाराज फसले तर नाहींतच, उलट, त्याचा पेशव्याच्या राष्ट्रनिष्ठेविषयी हेतूबद्दल पेशव्यावर आणि त्याच्या असामान्य पराक्रमावर पूर्ण भरवसा असल्याने ह्या पत्रावरून त्याना दाभाड्याचा अत्यत राग आला व 'अशा घरभेद्या मस्तवाल सेनापतीचें पारिपत्य होणे अवश्य आहे' असा त्याचा पूर्वापेक्षाही ठाम ग्रह होऊन त्यानी पेशव्याना तसे सागितलेही. पेशव्यानाही अर्थातच दाभाड्याच्या ह्या घरभेदेपणाची चीड आली, पण शिवाय त्या पत्रातील मजकुराच्या रोखावरून ह्या पत्राचे प्रवर्तक एकटे दाभाडेच नाहीत, याच्या मुळाशी कोल्हापूरकर, निजाम व प्रतिनिधिपक्ष याचेही तेच अग असले पाहिजे' असाही नक्की कयास त्यानी बाधला ज्या भास्कररामाने हे पत्र आणले, तोही ह्या कटातील एक कटवाला असावा असाही पेशव्याचा ग्रह झाला ह्या कटाचे समूळ उच्चाटण करावयाचे तर अत्यत न्यायनिष्ठुर बनल्याशिवाय गत्यतर नाहीं असे पाहून त्यानी भास्कररामापासूनच न्यायाची अमलबजावणी सुरू केली महाराजाच्या बैठकीतून आपल्या वाड्यात येताच त्यानी प्रथम भास्कररामाविषयी कसून चौकशी केली त्या चौकशीत भास्कररामाच्या दुराचाराच्या आणखीही काही गोष्टी अचानकपणे उजेडात आल्यामुळे त्याला देशत्यागाची शिक्षा फर्मावण्यात आली भास्करराम महाराजाच्या लोभातील आहे हे बाजिरावाना माहीत असल्यामुळें त्यानीं इतकी सौम्य शिक्षा दिली, नाहींतर आजन्म कैद अथवा प्राणदड अशी भयकर शिक्षाच त्याच्या वाट्याला यावयाची !

वरील गोष्टीला दोन घटकादेखील झाल्या नाहींत, तोंच त्याच भास्कररामाचा जन्मदाता महाराजांकडून तातडीचें आमंत्रण घेऊन आला, यावरून बाजिरावानीं तेंव्हाच अटकळ केली कीं, ह्या मंडळीनें महाराजापर्यंत वशिला लावला असावा व 'त्यांना शिक्षा माफ करा' असें आपणाला सांगण्यासाठींच महाराजानीं बोलावलें असावें तरी ही शंका फेडून घेण्यासाठीं बाजिरावानीं रामशास्त्र्यांना विचारलें, "शास्त्रीबुवा! आज महाराजाच्या निरोपाचें काम करण्याची पाळी आपणावरशीं आली?"

यावर रामशास्त्री उत्तरले, "श्रीमंत मोठे चतुर आहेत श्रीमंतांना सर्व कांहीं कळतें"

"मला सर्व कांहीं कळतें पण मला वाटतें, आपण आपल्या चिरंजिवाचा अपराध जर नीट ध्यानीं घेतला, तर तो आपला पुत्र आहे असें म्हणण्याचीही आपणाला लाज वाटेल

"गोष्ट खरी, पण माझा पुत्र अपराधी असला तरी तो माझा पुत्र आहे"

"याचा अर्थ काय? तुमचा पुत्रच काय, प्रत्यक्ष माझ्या पुत्रानें अगर बंधूनें अशी गोष्ट केली असती, तरी तो अपराधी ठरला नसता की काय? माझ्या पाठच्या बंधूनें असा अपराध केला असता, तर त्यालादेखील मी याहून कडक शासन केलें असतें न्यायाच्या बाबतींत साक्षात् परमेश्वर माझ्या कर्तव्याच्या आड येऊं लागला तर त्याचा देखील मी मुलाहिजा करणार नाहीं, मग तिथें आपल्या पुत्राची गोष्ट कशाला? आपणासारख्या धर्मनिष्ठ वृद्धानें तरी असले पक्षपाती बढाईखोरपणाचे उद्गार काढावयाचे नव्हते"

"माझ्याविषयीं श्रीमंताचा निष्कारण गैरसमज झाला मी बढाईखोरपणानें बोललों नाहीं" रामशास्त्री दोन्ही हात जोडून दीनवाणी मुद्रा करून म्हणाले, "मी असें म्हणालों की, पोटचा पोर अघोर अपराधी असला तरी त्याच्या जन्माचें वाटोळें होईल अशी शिक्षा त्याला व्हावी असें पित्याला कधींच वाटणार नाहीं माझ्या ठायीं आपण आहां अशी कल्पना करून आपण ह्या गोष्टीचा विचार करा, म्हणजे माझ्या परिस्थितीची आपणांला यथावत कल्पना करता येईल व ओघानेंच आपल्या अंतःकरणाला करुणेचा पाझर फुटेल आपणाला माझी पर्वा करावीशी वाटली नाहीं, तरी आपण सारे एका जातीचे ब्राह्मण पडलों—"

रामशास्त्र्यांनी जातीचा विषय काढला, त्याबरोबर बाजीराव चिडून त्याना पुढे बोलू न देता म्हणाले, "पुरे करा असत्य। जात्यभिमानाच्या गोष्टी मजपाशीं मुळींच सांगू नका जा तुम्ही महाराजांकडे, आणि त्याना सांगा की, मी आताच पाव घटकेच्या आत येतो"

पेशवे रागावले, आता त्यांच्या शब्दावर प्रतिशब्द बोलण्याची सोय नाही, असे पाहून रामशास्त्र्यांनी 'जशी आज्ञा' असा आपल्या संभाषणाचा जुलुमाचा समारोप करून तेथून पाय काढला त्यांच्या मागोमाग अमळशाने बाजिरावही महाराजांकडे जावयाला निघाले

  

बाजीराव शाहूमहाराजांपाशी जातात, तों तेथे रामशास्त्री व ज्याला बाजिरावांनीं अपराधी ठरवून देशत्यागाची शिक्षा दिली होती तो भास्करराम असे दोघे तेथेंच महाराजांच्या पायापाशीं धरणे धरून बसले होते ते बाजिरावाना पाहताच अदबीनें उठून उभे राहिले

"या पेशवे! बसा" महाराज बाजिरावाना सन्मानपूर्वक आपणाशेजारीं बसवून घेऊन म्हणाले, "आम्ही तुम्हाला आता तातडीने अशासाठी बोलाविलें की, भास्कररामाने कोणताही अपराध केले असले तरी त्याला तुम्हीं एवढी कठोर शिक्षा द्यावयाची नव्हती"

बाजिरावानी विचारलें, "पण महाराजांनीं भास्कररामाच्या अपराधाचा योग्य विचार केला आहे का?"

महाराज उत्तरले, "आम्ही एकवार सांगितले ना, कीं हे अपराधी नसतील असे आमचे मुळींच म्हणणे नाही।" मध्यंच थांबून महाराजानी प्रथम रामशास्त्री व भास्करराम ह्या दोघानाही बाहेर जावयाला लावून बोलणें पुढे सुरू केलें, "कसे झाले तरी हे ब्राह्मण आहेत, शिवाय ते तुमच्या जातीचे आहेत"

थोडया वेळापूर्वी ह्याच सबबीवर आपल्या मुलाला गुन्हा माफ असावा अशी रामशास्त्र्यांनी आपल्या मुलातर्फे तरफदारी केली, तेव्हा बाजीराव रागाने एका क्षणात त्याचें तोंड बंद करू शकले, पण तीच सबब महाराजांनी पुढें केलेली पाहून त्याना विस्मयपूर्वक हसू मात्र आले ते क्षणभर विचार करून महाराजाना म्हणाले, "ब्राह्मण कधी अपराधी ठरूच शकत नाही अशी जर महाराजाची समजूत असेल, तर तिथे माझे बोलणेंच खुंटले! पण माझ्या मतें परस्त्रीचा

अभिलाष व राजद्रोह हे अपराध असे उपेक्षणीय खास नाहीत उलट ब्राह्मणांनी ते अपराध केल्यास त्यांचे स्वरूप जास्तच भयकर होते"

"पण भास्करराम अपराधी आहे अशी तुमच्या मनाची पूर्ण खात्री झाली आहे का?"

"अर्थात! भास्कररामाविषयी अशा प्रकारच्या तक्रारी मी आज प्रथमच ऐकतो आहे असे नाही असे असता शास्त्रीबुवांचा मुलगा काय किंवा कृष्णराव आणि राधा काय, सर्वच आपलीच मंडळी, म्हणून मी आजवर तिकडे दुर्लक्ष्य करीत आलो पण आता दुर्लक्ष्य करण्यासारखी सोय मुळींच उरलेली नाही राधेच्या बाबतीत भास्करराम आज कैक दिवस पापवासना हृदयाशी धरून आहे तेवढ्यासाठी त्या नवराबायकोंत वितुष्ट आणण्याचे त्याचे उपाय एकसारखे सुरू आहेत त्याप्रमाणेच हे बापलेक आपल्या माझ्या वाटोळयावर टपलेले आहेत याविषयीही मला आता शंका उरलेली नाही"

भास्करराम राधेला पापाचरणाला प्रवृत्त करण्यासाठी टपलेला आहे ही ओरड पूर्वी महाराजाच्याही कानी आली होती ते म्हणाले, "राधेच्या बाबतीत तुम्ही भास्कररामाचा संशय घेतला ते एक वेळ खरं असेल कदाचित, पण ते बापलेक तुमच्या नाशावर टपलेले आहेत यावर आमचा विश्वास बसत नाही मो याच्या तत्राने ते वागतात म्हणूनच तुमचा त्यांच्यावर हा ठपका ना?"

"आपण जर ह्या फितुरीचा धागादोरा शोधू लागलो तर तो फार दूरवर जाऊन पोंचतो देशस्थ व कोंकणस्थ हा वाद राजकारणात प्रथम प्रतिनिधींनी उत्पन्न केला हे आपणाला माहीत आहेच मोघे भोळेपणाने त्या वादाला बळी पडले व शास्त्रीबुवांच्या चिरंजिवासारखी गाळीव रत्ने स्वतः कोंकणस्थ असूनही पेशवे आणि प्रतिनिधि यांच्या ह्या दुहीत साधेल तेवढा लाभ साधून घ्यावा म्हणून त्यांना फितुर झाली आहेत मी माझ्याच तोंडाने जातीची निंदा करू नये, पण मी पेशवेपणाची जबाबदारीची जी भूमिका घेतली आहे, त्या भूमिकेला साजेसे निःपक्षपातीपणाचे माझे वर्तन असले पाहिजे पेशवे कोंकणस्थ आहेत, ते आपल्या जातीचे आहेत, तेव्हा त्यांच्याकडून आपणाला भरपूर आश्रय मिळेल व आपण कोणतेही अपराध केले तरी ते खपून जातील, अशा समजुतीने माझ्या नात्यागोत्याचेच काय पण इतरही काहीं कोंकणस्थ ब्राह्मण ताळतंत्र सोडून वागू लागले आहेत, त्यांतलेच कुटिल शास्त्रीबुवा व त्यांचे चिरंजीव. ह्यांच्या स्वार्थाची मजल

येथवरच याबत नाही, ती भेदनीतीचा आश्रय करून याच्याही पुढे फार दूरवर भराऱ्या मारू पहाते गोविंदपत माझा विश्वासू सेवक आहे, ह्या जगात माझ्या जिवाला जीव देणारा कोणी खरा स्वामिनिष्ठ सेवक माझ्या पदरीं असेल तर तोच एक त्याला माझ्यापासून फोडण्याचे व माझ्या मनात त्याच्याविषयी विष ओतण्याचे नाना प्रकारचे प्रयत्न काही थोडेथोडके झाले नाहींत पण तो फुटला नाही की मी त्याला सोडला नाही कृष्णराव व बळिराम हे दोघे भाऊ व त्याचे धनी मोघे, याच्या बाबतीतही असा पाताळयंत्रीपणा करण्याला ह्या मंडळीने कमी केले नाहीं. मोघे भोळे, ते त्याच्या कारस्थानाना बळी पडून आमच्याविरुद्ध गेले आपणाबरोबर आपल्या आश्रितानाही फितवून नेण्याचा मोघ्याचा विचार आहे असलीं आपली गृहच्छिद्रे आपणच आपल्या तोंडाने महाराजासमोर बोलून दाखविण्याला मला लाज वाटते पण मी आपणाला एवढे मात्र खात्रीपूर्वक सागू शकतों की, आज सेनापति जे अरेराव माजले आहेत, ते ह्या मंडळीच्या चिथावणी मुळेच प्राणिमात्र स्वार्थलोलुप असतोच स्वार्थ कोणाला सुटला आहे ? आपण हिंदुपदपादशाहीच्या संस्थापनेसाठीं अहर्निश झटतों, यातही आपला स्वार्थ आहेच पण समाज, धर्म व राष्ट्र याच्या धारणेसाठीं व कल्याणासाठी साधावयाचा स्वार्थ निराळा व जातीच्या, नात्याच्या किंवा वग-वशिल्याच्या माणसाचा आणि स्वत.च्या व्यक्तीचा स्वार्थ निराळा असल्या हीन प्रतीच्या स्वार्थाचा कलक माझ्या कारभाराला लागू नये यासाठीं मला इतके न्यायनिष्ठुर बनलेच पाहिजे अशा वेळीं आपपरभावाचा पुरस्कार मी कधीच करणार नाहीं ”

“ ते सारे खरे, पण तुम्ही माझे ऐकाल का ? ”

“ महाराजाचे मी कधी ऐकले नाहीं ? मात्र कोणत्याही बाबतीत मला काहींही सागावयाचे झाले तरी महाराजानी एकदर सारासार विचार करून सागावें ”

“ नेहमीं सत्याबरोबरच थोडासा व्यवहारही ध्यानी घ्यावा लागतो, नाहीं तर हीं माणसें आपली व हीं परकी असे मानण्याचा प्रघात कशाला पडला असता ? तुम्ही असे करा, भास्कररामाला हद्दपारीची शिक्षा केलेली एकवार माफ करा, त्याच्या हातून जर पुन्हा असला गुन्हा घडला, तर मग त्या शिक्षेची अमल-बजावणी करा ”

“ महाराजाच्या ह्या फाजील कनवाळूपणामुळें अनर्थ ओढवतील ”

“ अनर्थ कसले ओढवतात ? काजव्याच्या लकाकण्यानें जगात आगी थोड्याच लागतात ! ”

महाराजाच्या मनाचा कल भास्कररामाला निर्दोषी ठरवून सोडून देण्याकडे आहे असें पाहून बाजिरावाना त्याच्याविरुद्ध फार काहीं बोलता येईना महाराजानींही आणखी एका युक्तीने बाजिरावाची समजूत केली त्यानीं भास्कररामाला सांगितले, " भास्करराम ! थोर लोक शरण आलेल्याला कधीं मरण देत नसतात हे तुला माहीत आहे ना ? "

लगेच रामशास्त्री महाराजाच्या प्रश्नातील सूचक अर्थ ध्यानी घेऊन भास्कररामाला म्हणाले, " भास्करराम ! श्रीमंताच्या पायावर डोके ठेवून त्याची क्षमा माग व यापुढे कधीही असा अन्याय करणार नाही, श्रीमंताच्या चरणाशी अखंड निष्ठेने वागेन, अशी शपथ वाहा "

लगेच भास्कररामाने रामशास्त्र्याच्या रचनेनुरूप क्षमा मागण्याची कवाईत केली

" जा तुला पेशव्यानीं एकवार गुन्हा माफ केला आहे." महाराज म्हणाले

स्वत बाजिरावाच्या तोंडून गुन्हा माफ असे उद्गार निघाले नाहींत. कदाचित तितका दयाळूपणा भास्कररामाच्या बाबतीत दाखविण्याची त्याची मुळींच इच्छा नसेल पण महाराजाचे आश्वासन जें भास्कररामाला मिळालें ते बाजिरावाना बंधनकारक होतेच त्याना महाराजाच्या शब्दाविरुद्ध बोलता आले नाही व महाराजानीही त्याच्या ह्या भिडस्तपणाचाच फायदा घेतला त्या बठकीत आणखी विशेष वाटाघाट काहीच झाली नाही बठक सपली तरी बाजिरावाचा महाराजावरील राग ओसरला नव्हता वाड्यात जावयाला निघाल्यापासून तों वाडयात जाऊन पोंचेतो बाजिरावाच्या डोक्यात सतापजनक विचार एकसारखे घोळत होते " महाराजानीं अशा प्रकारें आमच्या कारभारात ढवळाढवळ करणे व आम्ही ती निमूटपणें सहन करणे ही गोष्ट आम्हाला अत्यत लाजिरवाणी आहे राजकारण करून राजवटीची आबादानी आम्हाला राखावयाची असते, ती अशाने कशी राखली जाणार ? राजाची लहर कायदा होऊ लागली, की ते राज्य लौकरच लयाला जाणार असें नक्की समजावे महाराजाच्या ह्या पक्षपाती धोरणाने घरच्याघरी असे शत्रु पोसले गेले, तर ते आम्हाला पुढे थोडेच जुमानणार आहेत ! ह्यामुळे आमचा वेज कमी होईल व आम्हाला कुत्रादेखील विचारीनासा होईल " याप्रमाणें विचाराचे चक्र वाडयात पोंचेंतों बाजिरावाच्या मस्तकात एक सारखे फिरत होते त्यानीं वाडयात पाय टाकला तेव्हा त्याच्या तोंडून भास्कररामाच्या बाबतीत

निर्णयात्मक उद्गार निघाले, ' वत्स ! मी भास्कररामालाच काय, पण साऱ्या कोल्हटकर कुटुंबाला हद्दपार करून चांगलेंच शासन करणार मग महाराज काहींही म्हणोत. न्यायाच्या कामी मी महाराजांचेंच काय पण साक्षात् परमेश्वर मला अन्यथा वागावयाला सांगू लागला तरी त्याचेंही ऐकणार नाहीं "

वरल्याप्रमाणे स्वतःच्या मनाशीं निर्णय ठरवून बाजीराव सदरेवर जातात, तों तेथे आणखी कोणी नाहीं असें पाहून काशीबाई व मस्तानी ह्या दोघीही दरवाजापर्यंत आल्या व त्यांनीं नानासाहेबाला कायसें पढवून सदरेवर पाठविलें. पोटचा पुत्र, रूपानें सुंदर व अत्यंत बुद्धिवान्, असा सभोंर आलेला पाहून बाजिरावांना संतोष वाटला यांत नवल काय ? नानासाहेब आले ते गुपचुप दरवाजाच्या आंत उभ्या असलेल्या आपल्या दोन्ही मातांकडे मधून मधून किलकिल्या नजरेनें पहात उभे राहिले. त्यांना बाजिरावांनीं वत्सलतापूर्वक हांक मारून विचारलें, " नाना ! काय रे ? "

नानासाहेबांनीं पुन्हा एकवार दरवाजाकडे पाहिलें. काशीबाई व मस्तानी ह्या दोघींनीं त्यांना पुन्हा एकवार कायसें खुणावून सांगितलें. नानासाहेब लडिवाळपणानें म्हणाले, " रावसाहेब ! तुम्ही भास्कररामममामाना त्यांच्या अपराधाची एकवार क्षमा करा "

त्या पितापुत्रांची दृष्टीला दृष्टि भिडल्यावर बाजिरावाच्या अपत्यवत्सलतेला पौर्णिमेची भरती आली. नी का व कशी आली. काशीबाई आणि मस्तानी ह्या दोन प्रियतमांकडे त्यांची दृष्टि वळताच त्या वत्सलतेच्या महासागराच्या लाटा बाजिरावाच्या अंतःकरणांत इतक्या उंच उंच उसळू लागल्या कीं, त्या लाटांनीं बाजिरावाच्या मनांतील संतापाचें किल्मिष हां हां म्हणतां कसें धुऊन गेलें याचा त्यांना थांगपत्ताही लागला नाहीं "

" एकूण भास्कररामानें इकडे वशिला लावला काय ? " बाजीराव कांहींसें स्वगत व काहींसें प्रकट म्हणाले.

पत्नीची प्रीति संपादन करून स्वतःचें प्रिय साधावयाचें असलें म्हणजे जगांतील साऱ्याच बायका लहान मुलांच्या मध्यस्थीनें आपला कार्यभाग साधून घेतात तशांत बाजिरावासारखा प्रेमळ व विलासी पति असला म्हणजे तर मस्तानीसारख्या चतुर, तरुण व रूपसुंदर स्त्रियांना आपल्या ठायींच्या मोहकतेची मदिरा पतीला मनमुराद पाजून आपल्या चंचल गहिऱ्या नजरेतील तीव्र कामुक तेजानें पतीचे

डोळे तेव्हाच दिपवून सोडता येतात मनुष्यस्वभावातील ह्या नैसर्गिक वैशिष्ट्याचें भास्कररामाला पूर्ण ज्ञान असल्याने बाजिरावाना प्रसन्न करण्याचा हा मार्ग त्याने तेव्हाच शोधून काढला त्याचा वडील बंधु कोन्हेरराम हा मस्तानीचा खासगी कारभारी असल्याने व तेव्हा तरी मस्तानी व काशीबाई सवती सवती असूनही सख्ख्या बहिणीसारख्या प्रेमानें एकमेकींच्या गळ्यात गळा घालून वागत असल्यानें भास्कररामाला त्या दोघींनाही कोन्हेररामामार्फत वश करून घेण्याला तेवढा अर्ध्या घटकेचा अवसर पुरला बाजीराव महाराजाशी मिलन बसले होते, तेवढ्यात भास्कररामाने इकडे येऊन ही नाकेबंदी केली

असे कसे झाले ते वाचकांनी मनुष्यस्वभाव ध्यानी घेऊन आपल्या मनाशीं ओळखावे पण असे झाले खरे! महाराजांच्या शब्दालाही मान न देता न्यायाने वागावयाचा निर्धार ज्याचा होता, तेच बाजीराव आपल्या परिवारात येताच बदलले भास्करराम अपराधी आहे व त्याचा अपराध अत्यंत भयंकर आहे ह्या गोष्टीचा त्याना विसर पडला काशीबाई व मस्तानी यानीं प्रथम नानासाहेबा-मार्फत व नंतर आपण स्वत भीड खर्च केली, त्याचा योग्य तो परिणाम झाला, भास्कररामाला शिक्षेची माफी मिळाली. त्यानंतर त्या प्रेमळ कुटुंबाच्या काय काय गुजगोष्टी झाल्या, याच्याशी आपणासारख्या त्रयस्थाना काहींच कर्तव्य नाही पण तेव्हाच भवितव्यता मात्र अदृश्य रूपानें त्याच्या बाजूला उभी राहून उपहासपूर्वक हसत होती ती का हसत होती बरें ?

तें आपणाला पुढे ओघाओघाने कळणारच आहे तसेंच हा भास्करराम व कोन्हेरराम, भास्कररामाने ज्या साध्वीवर पापी नजर ठेविली होती ती कृष्णरावाची पत्नी राधा, ही मंडळी कोणाची कोण व त्याचे येथे प्रयोजन काय, याही गोष्टींचा उलगडा पुढे व्हावयाचा आहे तूर्त आपण आपल्या मनाला एवढाच सवाल करून ठेवू की, बाजिरावानीं जर पत्नी पुत्राच्या मोहपाशात सापडून भास्कररामाला—त्या दुखावलेल्या सर्पाला मोकळें सोडलें नसतें, तर बरें झाले नसतें काय? पण त्याना तशी बुद्धि झाली! याचे कारण तूर्त तरी एकच—भवितव्यता!

प्रकरण पहिलें

# दोन महिन्यांनंतर

"आज मला सांग, मस्तानी! हा महाल तुझ्या सौंदर्याला शोभण्याजोगा होईल कीं नाहीं?"

"खरेंच सांगू का?"

"हो! खरेंच सांग"

"माझें सौंदर्य ह्या महालाच्या सौंदर्यावरून एकदा सोडून शंभरदा ओंवाळून टाकावें असेंच कुणालाही वाटेल, इतकी याची एकंदर घडण चित्ताकर्षक झाली आहे. लोक मला सुंदर म्हणतात खरें, पण सौंदर्याच्या बाबतींत मला देखील लाजविणाऱ्या सौंदर्यवती ह्या महालाच्या सौंदर्याकडे पाहून लाजेनें खालीं माना घालतील"

"इतका का आपला हा शनवारवाडा तुला आवडला?"

"आपण माझ्यासाठीं बांधलेल्या ह्या एका महालापुरतें मी बोलतें आहें—"

"म्हणजे? शनवारवाड्याच्या एकंदर इमारतींत हा महाल तेवढाच तुला आवडतो म्हणावयाचा! मग वाड्याच्या बाकीच्या रचनेंत तुला काय वैगुण्य दिसलें तें सांग तर खरें! म्हणजे आपणाला ते वेळींच दूर करतां येईल. सांग, यांत तुला काय उणें दिसतें?"

"तसें नव्हे—"

"नाहीं, काहीं वैगुण्य असलें तर तें वेळींच दूर झालेलें बरें. माझी इच्छा तुला माहीतच आहे, कीं इंद्रप्रस्थातील पुराणप्रसिद्ध राजवाड्याबरहुकूम ह्या वाड्याची उभारणी झाली पाहिजे. †वैभव, सौंदर्य व सुराज्य अशा तिन्ही दृष्टींनीं

---

† 'इतिहाससंग्रह' मासिकांत निरनिराळ्या इसमानीं शनवारवाड्याचें वर्णन दिलें आहे, त्यावरून पाहतां हा वाडा इंद्रप्रस्थ येथील पुराणप्रसिद्ध वाड्याबरहुकूम बांधला गेला यांत संशय नाहीं. हा वाडा गुरवार फा. शु. ६ ता. २।२।१८२८ रोजीं अग्निसात् झाला! आतां ह्या वाड्याचा जो भाग उभा दिसतो, तें वाड्याचें कलेवर आहे असेंच म्हणणें प्राप्त आहे. पेशवाईच्या ऐन अमदानीपासून तों पेशवाईचा अंत होईपर्यंत जर कोणीं हा वाडा पाहिला असता, तर त्याच्या-

हे आपले वसतिस्थान दुसरें इंद्रप्रस्थसें साऱ्या जनतेला वाटलें पाहिजे व सर्वांच्या तोंडून तसे धन्योद्गार निघाले पाहिजेत. हा उत्तरेकडाल दरवाजा तू पाहिलासच हा दिल्लीदरवाजा म्हणून मी मुद्दाम बांधविला आहे इंद्रप्रस्थाचे सारें वैभव लुटून आज अविंध जे त्याच दिल्लींत अरेरावसे माजून बसले आहेत, त्यांचा नायनाट करून आम्हाला पुन्हा आमचें हिंदवी साम्राज्य स्थापन करावयाचें आहे व ह्या पुण्यनगरीला हिंदु-पद-पादशाहीच्या कर्तेपणाचा बहुमान प्राप्त करून द्यावयाचा आहे ह्या कर्तव्याची आम्हाला निरंतर जाणीव असावी म्हणूनच उत्तराभिमुख अशी आपल्या ह्या शनवारवाड्याची रचना करण्यात आली आहे आम्ही मराठे यापुढे वेळोवेळी उत्तरेकडे दिग्विजयाला निघणार ते ह्याच दिल्लीदरवाजातून ह्या दरवाजातून आम्ही थेट दिल्लीवर चालून जाणार, व तिथें विजयलक्ष्मीला वरून हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत हिंदुपदपादशाहीची द्वाही फिरवीत त्याच मार्गाने माघारे फिरत येऊन ह्या दिल्लीदरवाजातून राजवाड्यात प्रवेश करणार अविंधांना मग आम्हाला शरण आल्याशिवाय गत्यंतर उरणार नाही. ते याच राजमार्गाने थेट दिल्लीपासून पुण्यापर्यंत लोटांगणे घालीत आमच्या पायापाशी येतील ''

'' पण माझ्या बोलण्याचा आशय तो नव्हता ''

'' तर मग ? ''

'' मी असें म्हणत होते की, आपण माझ्यासाठी बांधलेला महाल तर माझ्यापेक्षां सुंदर आहेच व तोही आपल्या ह्या इंद्रप्रस्थातील राजवाड्याप्रमाणे सुंदर अशा ह्या शनवारवाड्याच्या अनुपम सौंदर्याला सर्वस्वी शोभण्याजोगाच आहे —''

'' हें कमलाकृति कारंजे पहा ! इतकें सुंदर व इतकें मोठे कारंजे उभ्या भारतवर्षात अन्यत्र पहावयाला मिळावयाचें नाही वाड्यात जागोजाग सभोंवारदेखील आणखी अनेक सुंदर कारंजीं खेळवावयाची आहेत, ती मी उत्तरेकडील मोहिमे

---

सभोंवारचे सुंदर बागबगीचे, सभोंवार अष्टौप्रहर थुईथुई उडणारी कारंजीं व त्यांतल्यात्यांत वाड्यातील हिंदुस्थानांत सर्वांत मोठें कमलाकृति कारंजे पाहून कोणीही तोंडात बोटें घातलीं असतीं काळाच्या वक्रघातांखाली चुरडून जाऊन मातीच्या ढिगाऱ्यात गाडला गेलेला हा वाडा उकरण्याचा उद्योग सरकारने थोड्या वर्षांपूर्वी आरंभिला आहे, त्यामुळे त्याच्या सौंदर्यविशेषाचे भग्नावशेष मात्र आता तेथें पहावयाला सापडतात

वरून परत येईतों बहुधा तयार होतील तशीच वाड्यासभोंवार सुंदर बागशाई करण्यात येत आहे ती आपण मग पाहूच"

खरेंच, मला बागशाई फार आवडते"

"म्हणूनच तर वाड्याची उभारणी होताच केवळ तुझ्यासाठी मी प्रथम सभों-वारची बाग तयार करावयाला लावली ह्या बागेची खरी शोभा आज तुझ्या नजरेस भरावयाची नाहीं पण आणखी थोड्या दिवसांनी तू पहाशील तेव्हा म्हण-शील की, देवेंद्राचे नंदनवनदेखील ह्या बागेपुढे तुच्छ आहे सर्वप्रकारच्या फल-पुष्पांनी भरलेल्या बागेत तू मग विहार करूं लागलीस, की देवेंद्राची इंद्राणीदेखील तुझा हेवा करूं लागेल व मनात म्हणेल की, अशा नितांतसुंदर बागेत विहार करतां यावा म्हणून तरी आपण मृत्युलोकीं जन्म घेतलाच पाहिजे तुझ्या आवडत्या जाईजुईचे व गुलाबाचे ताटवे येत्या वसंत ऋतूत बहरतील तेव्हा त्यावर इतकीं फुलें सापडतील की, तीन त्रिकाळ ताज्या फुलांच्या शेजा आपल्यासाठीं तयार करता येतील आजदेखील आपणाला फुलशेजा हव्या तेवढ्या करता येतात, पण खास आपल्या बागेतील फुलांच्या शेजेवर पहुडल्याने आपल्याला जो आल्हाद होईल, त्याची माधुरी काही और आहे"

"मी माझ्या हातांनीं ते फलझाडांचे ताटवे शिंपीन व त्यावर फुललेल्या फुलांची फुलशेज माझ्या हातानें आपल्यासाठीं तयार करीन"

"का? बाग शिंपावयाला फुलमाळी व फुलांची शेज रचावयाला दासदासी नाहीत की काय?"

'फुलमाळी व दासदासी पुष्कळ आहेत, पण म्हणून त्यांनीं शिंपून फुलविले-ल्या फुलांना मीं शिंपून फुलविलेल्या फुलांच्या सुवासाची सर थोडीच येणार आहे! तसेंच त्यांनी रचिलेल्या फुलशेजेपेक्षा मीं माझ्या हातांनीं रचिलेली फुलशेज आपणाला जास्त सुंदर दिसून जास्त सुखावहही होईल फुलांचा नैसर्गिक सुवास व त्यांचें नैसर्गिक सौंदर्य यात माझ्या श्रमाची भर पडल्याने जी खुलावट होईल, ती काही निराळीच असेल त्यात आपणा उभयतांना विलासाचें सौख्य लाभायचें ते लाभून शिवाय आपली सेवा केल्याच्या पुण्याईची अमोल जोड माझ्या पदरी पडेल पण मी जें म्हणत होतें ते निराळेंच"

'तू आणखी काय म्हणत होतीस?"

' मी असें म्हणत होते की, आपण मला सुंदर म्हणता पण माझ्याहीपेक्षां

आणण माझ्यासाठा बांधलेला हा महाल सुंदर आहे व हा आपला वाडा त्या महालापेक्षाही सुंदर आहे, पण आपणाकडे पाहून त्या वाड्यानेंही लाजावें इतके आपण सुंदर आहां हो! पण मी असे बोलता कामा नये नाहीपेक्षा माझीच चांडाळणीची दृष्ट आपणाला लागायची!"

उपरोक्त प्रणयसंवाद श्रीमंत बाजीराव पेशवे व त्याची प्रियतमा मस्तानी यांच्यात चालला होता हें वाचकांनी ओळखलेंच असेल आज दसरा, आजच्या ह्या शुभ मुहूर्तावर पेशव्यांची स्वारी त्यांच्या ह्या नव्या शनवारवाड्यातून सीमोल्लंघनाला निघावयाची होती व तेथूनच पुढे त्र्यंबकराव दाभाड्यावरील गुजराथ-माळव्याकडील पेशव्यांची मोहीम सुरू व्हावयाची होती. आज बरेच दिवस पेशवे व छत्रपति शाहूमहाराज यांच्यात सेनापतीच्या अरेरावी कारभाराबद्दल वाटाघाट होऊन व सेनापतीशी सलोख्याची बोलणी शक्य तितक्या सामोपचाराच्या परींनीं होऊन सेनापतीचें पारिपत्य करणें अपरिहार्य झाल्यामुळेच बाजीराव पेशवे कोल्हापूर-करावरील मोहीम अर्धवट सोडून या नव्या मोहिमेच्या तयारीसाठी महाराजांच्या अनुज्ञेनें सुमारें दोन महिन्यापूर्वी पुण्याला येऊन राहिले होते इकडे ही मोहिमेची तयारी सुरू होती व त्यापूर्वीच शनवारवाडा बांधण्याला सुरवात झाली होती वाड्याचें काम पूर्ण व्हावयाला अजून थोडा अवकाश होता, पण जे काम पूर्ण झाले होते व जें होत होतें, त्यावरून कोणालाही त्यांच्या वैभवशालीपणाची व अनुपम सौंदर्याची कल्पना करता आली असती बाजीराव पेशवे जसे शूर व चतुर वीराग्रणी होते, तसेच ते अत्यंत रसिक, विलासी व ऐशीही होते आपल्या आजवरच्या दहा वर्षांच्या पेशवाईच्या कारकीर्दीत त्यांनी अतुल पराक्रम करून यश, कीर्ति व वैभव यांची एवढी थोर जोड मिळविली होती की, याच्या हातून या हिंदुस्थानात हिंदुपदपादशाही स्थापन होणार याविषयीं समस्त हिंदूंना पूर्ण खात्री. इंग्रज, फ्रेंच, पोर्तुगीज वगैरे परक्या स्वार्थसाधूंना वैषम्य व मुसलमानांना जबरदस्त भय वाटू लागलें होतें जिकडे ऐकावें तिकडे बाजिरावाच्या पराक्रमाचें व यशस्वितेचें वर्णन! ही त्यांची यशोगीतें ऐकून प्रत्येक हिंदूला हिंदुपदपादशाहीच्या योजनेला मूर्तस्वरूप प्राप्त व्हावें म्हणून झटण्याला संजीवनी सेवन केल्याप्रमाणे स्फुरण चढे व तींच यशोगीतें ऐकून शत्रूंच्या अर्थात मुख्यत मुसलमानांच्या सर्वांगाचा संतापानें व भीतीने थरकाप होई दक्षिणेत निजाम व उत्तरेत महमदखान बंगष, सरबुलंदखान वगैरे मातबर बादशाही सुभेदार-सरदारांना

बाजीराव, त्याचे बंधु चिमाजीअप्पा व इतर मराठे सरदार यांनी इतके जेरीला आणले होते की, मराठ्यांचा उघडपणे द्वेष करण्याइतके ही धैर्य त्यांच्या अंगीं उरलें नव्हतें म्हणूनच एकाला वर म्हणावयाचें व दुसऱ्याला पळ म्हणावयाचें असे दाणे पेरून कोंबड्यांची झुंज लावण्याचे भेदनीतीचे उपद्व्याप त्यांनीं सुरू ठेविले होते दिल्लीच्या मुसलमान बादशहांची सार्वभौम सत्ता हळूहळू नामशेष होता होता जागोजागीं तिचा नाममात्र अवशेष शिल्लक राहू लागला होता तात्पर्य, बादशाही सत्तेचा सूर्य मावळत्या दिशेला वळत होता व पेशव्यांच्या म्हणजेच मराठ्यांच्या मर्दुमकीमुळे हिंदुपदपादशाहीचा बालसूर्य उगवून आपल्या सोज्वळ तेजानें उभाठयावर आला होता हिंदुपदपादशाहीच्या ह्या वाढत्या सार्वभौम वैभवाला राजवाड्याप्रमाणे शोभादायक होईल असाच शनवारवाडा मुद्दाम शकुनाच्या जाग्यावर[*] इंद्रप्रस्थाच्या गतकालीन वैभवशाली राजवाड्याच्या प्रथानुसार वर्णनानुसार बांधण्याचें बाजिरावानीं मनावर घेतलें होतें मस्तानी ही त्यांची त्रिभुवनसुंदर प्रियतमा, तेव्हा आपल्या नावाबरोबरच तिचेंही नाव त्या वाड्यात चिरस्मरणीय होऊन रहावें म्हणून त्यांना वाड्यात एक अत्यंत सुशोभित असा महाल मुद्दाम तिच्या नावानें बांधला होता त्या विलासी दरबाराच्या विलासविहाराना सर्वस्वी साजेसाच तो महाल होता, एवढे सांगितल्यावर त्याच्या रचनाशैलीचें निराळे वर्णन करण्याचें कारण नाहीं हा महालच काय पण वाड्याचा प्रत्येक भाग बांधविताना बाजिरावांनी तो सर्वांगसुंदर व उत्कृष्ट बांधला जावा अशी योजना तर केलीच होती, शिवाय त्यातील मोठे कमलाकृति कारंजे व सभोवारची इतर कारंजी, वाड्या सभोवारची बाग, वाड्यातील स्नानगृहें व इतर महाल वगैरे सौंदर्यविशिष्ट गोष्टी

[*] पेशवाईकालीन कागदपत्रावरून बाजीराव पेशव्यांनी शनवारवाडा बांधण्यासाठी अमुकच जागा का निश्चित केली याविषयी व शनवारवाडा ह्या त्याच्या नामाभिधानाविषयी असा निष्कर्ष निघतो की, 'एकदा बाजीराव पेशवे घोड्यावर स्वार होऊन मार्गानें चालले असता ह्या जागीं (वाडा बांधण्यापूर्वी) एक ससा एका कुत्र्याच्या मागें पळत असलेला त्यांना आढळला वास्तविक कुत्रा सशाच्या मागे पळावयाचा, तें हें विचित्र दृश्य पाहून ही जागा शकुनाची आहे असे बाजिरावाच्या मनानें घेतलें व तीच जागा त्यांनी वाडा बांधण्यासाठीं मुकर केली तेव्हा वाड्याची कोनशिला शनवारी सुमुहूर्तावर बसविण्यात आली, त्यावरून त्याला शनवारवाडा हें नाव पडलें

करताना त्यांनीं मस्तानीच्या व आपल्या इतर कौटुंबीयांच्या आवडीनिवडींचाही विचार केला होता त्यांनीं आज मुद्दाम प्रातःकालच्या वेळीं कामकरी वगैरे वाड्याच्या कामावर यावयाच्या पूर्वीं मस्तानीला वाड्याची एकंदर रचना दाखविण्यासाठीं बरोबर आणलें होतें हीच वेळ उभयतांनीं वाडा पहावयाला येण्यासाठीं साधली याचें कारण शक्य तों एकान्त लाभावा हेंच होतें, व वाड्यांतील धूर्त पहारेकरीही हा त्या उभयतांचा मनकवडा आशय ओळखून अन्य नीं हाकच मारली तर जवळ जावयाचें अशा विचारानें मुद्दाम दूरवर उभे राहिले होते आता, ते दूर उभे राहूनही धनी व त्याची प्रियतमा यांचें काय संभाषण चाललें आहे तें ऐकण्यासाठीं उत्सुकतेनें कानोसा घेत होते व त्या आधुनिक रति मदनाच्या जोडप्याच्या अनुपम लावण्याकडे टक लावून पण चोरून पहात होते, हे निराळे त्या पहारेकऱ्यांचीच गोष्ट कशाला! अन्वर्थक अशा कविकल्पनेच्या अलंकारिक भाषेत बोलावयाचें तर त्या दिवशीं प्रातःकाळीं सारें आकाश अभ्राच्छादित झालें असतांही बाजीराव-मस्तानी हें अनुपम लावण्यसंपन्न जोडपें प्रातःकाळीच वाड्यांत आलेलें पाहून त्यांचें दर्शनसौख्य घेण्यासाठीं उगवता सूर्य आपल्या वेगवान् सप्ताश्वरथांत आरूढ होऊन तें अभ्राच्छादन दूर सारीत पुढे येतांना पूर्वक्षितिजावर दिसूं लागला होता विजयादशमीचा तो मांगल्यपूर्ण दिवस, त्या दिवशींचा तो सर्वोत्तम उषःकाल, कोल्हापुराकडील मोहिमेत बाजिरावाच्या चातुर्यपूर्ण योजनेमुळे दिवसेंदिवस विजय मिळत असल्याच्या बातम्या वारंवार येत त्याप्रमाणें त्या या दिवशींही येथें येऊन थडकल्यामुळे बाजीराव व त्याचा सेनापरिवार यांच्या त्या सणासुदीच्या आनंदांत अधिक भर पडलेली, त्याला उत्तरेकडील नव्या मोहिमेविषयींच्या उत्साहाची अपूर्व जोड मिळालेली, अशा परमोत्साहजनक वातावरणांत आपल्या आवडत्या शनवारवाड्यांत सर्वांगसुंदर पेशवे व त्याची निसर्गसुंदर प्रियतमा सणासुदीच्या बहुमोल वस्त्रालंकारानीं विभूषित होऊन सहल करावयाला आल्यावर सजीव आणि निर्जीव अशी उभयविध सृष्टि त्यांना पाहून आपल्या डोळ्यांचें पारणें फेडून घेऊं लागली तर त्यांत नवल तें काय?

पण तें यौवनसंपन्न प्रणयपिपासु जोडपें तेव्हां प्रणयरंगांत इतकें रंगून गेलें होतें कीं, साऱ्या सजीव व निर्जीव सृष्टीचे डोळे आपणाकडे वेधून राहिले आहेत याचें त्या दोघांनाही भान नव्हतें म्हणूनच त्यांचें पूर्वोक्त प्रणयसंभाषण आपसांत चाललें होतें

मस्तानीने बाजिरावाच्या सौंदर्यावरून सौंदर्यसंपन्न शनवारवाड्याची मीठ-मोहरी ओंवाळून टाकलेली ऐकून बाजिरावांना आपल्या सौंदर्याविषयीं • लनाच अहंकार वाटू लागणे शक्यच नव्हते मस्तानीला मस्तानीमहाल व त्याची अंतर्बाह्य रचना अत्यंत आवडली एवढाच तिच्या बोलाचा अर्थ त्यांनी घेतला व त्याच्या मते शनवारवाड्यात एक वैगुण्य अपरिहार्य कारणामुळे राहू पहात होते त्याचा उल्लेख केला,१ "वाड्यासभोवार वाड्याच्या एकंदर राजशाही थाटाला शोभेसा चिरेबंदी तट बांधण्याचा माझा विचार महाराजांच्या विरोधामुळे रहित ठेवावा लागणार, त्याला मात्र माझा इलाज नाही तो तट जर बांधता येईल, तर आपला वाडा खरोखरच दुसरा इंद्रप्रस्थातील राजवाडासा शोभेल"

मस्तानी यावर आपल्या कोकिळेप्रमाणे मधुर व कोमलस्वरात उद्गारली, "महाराजांनीं तट बांधायला का विरोध केला न कळे पण मी म्हणते झालें तेही एका अर्थी बरेंच झालें"

"ते कसें काय ?" बाजिरावांनी स्मित-हास्य करून विचारले

"शालजोडी हजारो रुपये किंमतीची असली तरी तिला ठिगळ का बरें लावतात ?"

"बरें मग ?"

'मुलाच्या गालाला काळं गालबोट का बरें लावतात ?" मस्तानीने विशेष लाडकेपणाने बाजिरावाच्या अंगरख्यावरील मौक्तिकमाळा जरा बाजूला सरकली होती ती आपल्या हातानें नीट करीत विचारले, "मी काय म्हणते तें आलें का आपल्या ध्यानीं ?"

"हो ! आले ध्यानीं लाडके ! वाइटांतून देखील चांगला अर्थ काढण्याची हातोटी तुला किती बेमालूम साधली आहे तें माझ्या ध्यानी आले"

"नेहमी आपण शुभ बोलत असावें"

"मग ? मी कुठें नाही म्हणतो ? माझें तुला आता एवढेंच सांगणे आहे कीं, तू नेहमी स्वतःला गालबोट लावीत जा नाहीतर तुला जगाची दृष्ट लागावयाच्या-पूर्वी माझीच दृष्ट लागावयाची !"

१ शाहूमहाराजांनी शनवारवाड्याला चिरेबंदी कोट बांधण्याला बाजिरावांना मनाई केल्याचा उल्लेख जेधे शकावलींत आहे 'पेशवाईचा दरारा' ह्या कादंबरींत ह्या प्रसंगाचे वर्णन देण्यात आले आहे

" उष्टे पत्नीन पतींचे सेवन करायचे असते, पतीने पत्नीचे उष्टे सेवन करायचे नसते "

" मग ! त्याचा इथे काय स... ? "

" अहाहा ! एवढी त्रिभुवनातील चतुराई अंगा भरली आहे, नजरेच्या एका भरारीसरशी आकाशातील नक्षत्रेदेखील मोजायची कला ज्याना साधलेली, त्यांनी असे वेड घेऊन पेडगावला जाणे काही बरे नाही आपण कोटी केली ती मीच नव्हती का आताच केली ? "

" पहा ! तूच पहा ! मी उगाच नाहीं म्हणत तुला दृष्ट लागेल असे ! " असे म्हणून बाजिरावानीं लडिवाळपणाने मस्तानीच्या अणकुचीदार हनुवटीला हात लावला. दोघानीही एकमेकाकडे पाहून स्मितहास्य केलें

तेवढ्यात मस्तानीची दृष्टि समोर गेली, तो ती चटकन् दोन पावलें मागे सरून किंचित दचकून म्हणाली " अगबाई ! भावजी आले ! "

प्रकरण दुसरें

# चिमाजीअप्पा

"कोण ? अप्पा आला ?" असे म्हणून बाजीराव मागे वळून पाहतात, तोंच खरोखरच चिमाजीअप्पा त्यांच्या मागे उभे ! बाजीरावही त्यांना पहातांच अंमळ ओशाळले व चिमाजीअप्पाकडे वळून म्हणाले, "अप्पा ! काय ?"

"आजच्या विजयादशमीच्या मुहूर्तावर संगमावर डेरे द्यावयाचे ना ?"

"हो !"

"आणि मोहीम तशीच पुढे चालवावयाची ?"

"हो ! मोहीम तर चालवावयाचीच पण मला वाटतें, आपण आणखी एकवार सेनापतींना शुद्धीवर येण्याची संधी द्यावी हे बरें ते जर तेवढ्यानें शुद्धीवर येऊन सलोखा करण्याला तयार झाले, तर भांडणाचा प्रसंग आपोआपच टळेल"

"दादा ! मला वाटतें, आपणाला अलीकडे मोहिमेच्या दगदगीचा कंटाळा येऊं लागला आहे आजवर विश्रांति व विलास आपल्या आधीन होते, पण आता आपण त्यांच्या आधीन झाला आहां" चिमाजीअप्पा मस्तानीकडे तीक्ष्ण नजरेनें निरखून पहात बोलून गेले

बाजीराव व मस्तानी ह्या दोघांनीही चिमाजीअप्पांचा तो टोमणा ओळखला त्यावरून आपलें संभाषण यांनी ऐकलें असावें, अशी त्या दोघांचीही खात्री झाली अप्पांनी त्या दोघांना आतांच प्रणयप्रांताच्या सरहद्दीवर सहल करतांना पाहिलें होते त्यांना बाजिरावाच्या त्या कृत्याचा राग आला असे नाहीं, ते भलत्या वेळी भलत्याच रंगात रंगून राहिले होते म्हणून त्यांचा राग आला आणि त्यांत यांनीं अजूनही सेनापतींशीं सलोखा करण्याचा नाद आपल्या डोक्यात ठेवला असल्याबद्दल च्या रागाची भर पडली. चिमाजीअप्पांना राग कां आला ते त्यांच्याच शब्दांत बाजीराव व मस्तानी यांना स्पष्टपणें कळून चुकलें आपल्या खोचिक बोलानीं त्या दोघांच्या-ही अंतःकरणाचा हळूच चिमटा घेतला असे त्यांच्या ओशाळलेल्या मुद्रावरून ओळखून चिमाजीअप्पा पुन्हा अंमळ सौम्य शब्दांत म्हणाले, "देवळांत भक्तांची मारे गर्दी जमली आहे, पण देव मात्र तेथें नाही, तर त्याचा काय उपयोग ? धनीसाहेबांच्या शब्दासाठींच केवळ असंख्य मावळा मुंगीसारखा सैन्यांत सामील होऊन

उत्तरेकडील मुलुखगिरीवर जाण्यासाठीं लोटत येत आहे प्रथम आल्यासारखे धन्याचें दर्शन घेऊन त्याच्या मुखातून शाबासकीचा व उत्साहाचा शब्द ऐकावा ही प्रत्येकाची उत्कट इच्छा आपल्या दर्शनासाठीं आपल्या वाड्यासमोर अशा उत्साही सैनिकांचा सागर आपले पाय धुण्यासाठीं उसळतअसताना आपण मात्र इकडे सहल करीत हिंडत आहा, याला काय म्हणावयाचें ? पहाटेची नौबत ऐकून आपल्या बायकोमुलांबरोबर सुखाच्या साखरझोपेंत गढून गेलेले गावकरी खडबडून जागे होऊन सैन्यात हजेरी देण्यासाठीं तिकडे धावत येत आहेत, बाहेरगावचे लोक तर आज दसऱ्याच्या सणाला घरी आपल्या कुटुंबपरिवारात सुग्रास भोजन करून घटकाभर आनंदीआनंद अनुभवावयाचा सोडून मरणमोलाची मुलुखगिरी करण्यासाठीं एथवर धावून येत आहेत, आणि हे सारें त्यानीं ज्याच्या जिवासाठीं करावयाचें, ते आपण विलास-विहाराच्या गोष्टी बोलत इकडे गुतून पडला आहा ! हे पाहून लोकानी आपणाला काय बरें म्हणावें ? दादा ! आपण रागावू नका मी जरा स्पष्ट बोललो, वडील बंधूना धाकट्यानें असें बोलू नये हे मला कळतें, पण आपण माझा हेतु ध्यानी घ्या "

बाजीराव पूर्ववत ओशाळेपणानें पण शांतपणानें म्हणाले, " अप्पा ! तुझ्या स्पष्टोक्तीचा मला कधी तरी राग आला आहे ? तू म्हणतोस ते खरें, या वेळीं मी जाग्यावर असावयाला पाहिजे, पण जिथे तू आहेस तिथे मी आहे असेच नाही का ? "

चिमाजीअप्पा म्हणाले, " लोक जे देवळात येतात, ते देवाच्या दर्शनासाठी येतात, देवळाच्या महिरपीवर कोरलेल्या द्वारपाळाच्या दर्शनासाठी येत नाहीत महादेवाच्या देवळात नंदीला मान मिळतो, तो महादेवाचें वाहन म्हणून मिळतो, पण महादेवच जाग्यावर नाहीत, तर नंदीला कोण विचारतो ? त्या बाबतीविषयीं मग दर्शनेच्छु भाविकाना आदर वाटण्याऐवजीं त्याला सर्वजण दगड म्हणून ओळखू लागतात " चिमाजीअप्पा मस्तानीकडे वळून म्हणाले, " वहिनी ! मी म्हणतो हें खरें ना ? "

" खरें " मस्तानी उद्गारली

" मग हे ओळखूनच तुम्ही दादांना अशा वेळी इकडे रमवून ठेवावयाचें नव्हतें ते एखादे वेळी चुकतात असे तुम्हाला आढळल्यास तुम्हीं त्याना समजुतीची गोष्ट सागून मार्गावर आणले पाहिजे तुम्हाला त्यांच्याशिवाय व त्याना तुमच्याशिवाय घटकाभर देखील करमत नाही हें मला माहीत आहे पतिपत्नींचें एकमेकावर असेंच उत्कट प्रेम पाहिजे, पण तें प्रेम दोघांनाही कर्तव्याचा विसर

पाडणारे आगळे असता कामा नये पहा, आज इतके मावळे मराठे इतक्या सकाळीच आमच्या आज्ञेला मान देऊन धावून आले व येत आहेत ते त्यांचे त्यांच्या नायकमुलावर किंवा त्यांच्या नायकामुलाचे त्यांच्यावर प्रेम नाही अथवा त्याना समारसुखाची आवड नाही म्हणून थोडेच धावून आले असतील किंवा येत असतील!"

"तुम्ही म्हणता ते खरे" असे चिमाजीअप्पाना उद्देशून उद्गारून मस्तानी बाजिरावाकडे वळून म्हणाली, "आपण आता मोहिमेकडेच सारे लक्ष दिले पाहिजे आपणासारख्या मोठ्या माणसाचे वर्तन अनुयायाना कित्ता घेण्याजोगे निर्मल, नमुनेदार व सशयातीत असले पाहिजे."

"तसच तुमचे देखील" चिमाजीअप्पा म्हणाले, "वहिना! खरं सागतो, माझा तुमच्यावरच जास्त राग आहे"

"तो का म्हणून भाई? मी तुमचे काय घोडे मारले?" मस्तानी चिमाजी-अप्पाकडे स्मितहास्यपूर्वक पहात म्हणाली, "मी सर्वांना किती भिऊन वागते ते माझे मला माहीत! असे असता तुम्हीच माझ्यावर रागावता असे नव्हे, तर स्वारीदेखाल अनेकदा रागावते तरी बरे की, मी स्वारीचा शब्द खाली पडू देत नाही नेहमी अष्टौप्रहर स्वारीचा बोलला शब्द झेलायला जोडल्या हातानी समोर उभी असते!"

"तेच तर तुमचे चुकते तुम्ही अशाने पतिव्रताधर्माचे यथान्याय पालन करता खरे, पण पतीच्या इच्छेचा किंवा आज्ञेचा सारासार विचार न करता पतीच्या हातातील कळसूत्री बाहुलीसारखे पत्नीने त्याच्या लहरीप्रमाणे वागावे हा काही पतिव्रतेचा—सहचारिणीचा धर्म नव्हे"

इतक्यात बाजीराव स्मितवदनाने चिमाजीअप्पाकडे पाहू लागले त्याना उद्देशून चिमाजीअप्पा म्हणाले, "खरेच, मी सागतो दादा! आपल्या कर्तव्य-पालनात आजकाल जी थोडीफार ढिलाई होते, ती वहिनीच्या ह्या गरीबपणाच्या स्वभावामुळेच" लगेच ते मस्तानीकडे वळून म्हणाले, "हेच पहाना वहिनी! आज सकाळीच जर तुम्ही दादाना इकडे आणले नसते, तर ते तिकडची महत्त्वाची कामे सोडून इकडे खास आले नसते शनवारवाडा आजचा उद्या पहाता आला असता —"

"पण भावजी! मी स्वारीला इकडे वाडा पाह्यला आजच जाऊ या असें मुळींच म्हणालें नाहीं"

'नसाल म्हणाला! पण त्यानी इकडे यावयाचे ठरविले तेव्हा तुम्हीं होकार तरी दिला कीं नाही? तिथेंच चुकले तेव्हा जर तुम्ही त्याना त्यान्या कर्तव्याची जाणीव देऊन त्याच्याबरोबर इकडे यावयाचे साफ नाकारले असते, तर अनायासे काम झाले असते पत्नी ही तीनत्रिकाळ पतीच्या लहरींवर तरगणारी पत्नीची केवळ विलासदासी असते असें नाही, ती मनात आणील तर हरएक बाबतीत पतीची मार्गदर्शकही होऊ शकते व तरच ती खरी सहचारिणी शोभते एका सहचारिणीला पतीची भार्या, माता, मत्री अशी अनेक नाती प्रसगोपात्त सार्थ करून दाखवावयाचीं असतात"

"बरे, तें आता राहूद्या आम्हा चुकलों, मग तर झाले आता ना पहा मी तुझ्याबरोबर निघालो" असे म्हणून बाजीराव चिमाजीअप्पाबरोबर कसब्यातील§ राजबागेजवळील आपल्या वाड्याकडे जावयाला निघाले

चिमाजीअप्पानीं क्षणभर रेंगाळून मस्तानीकडे पाहून बाजीरावाना विचारले, "आणि ह्या नाही का आपल्याबरोबर यावयाच्या?"

"मी बरोबर नाहीं येत नाहींतर पुन्हा माझ्यावर तुमचा ठपका यायचा मी आपली माझ्या जागी जाते कशी!" मस्तानी म्हणाली

यावर चिमाजीअप्पा 'पण' एवढा एकच शब्द अडखळत उच्चारून थाबले

मस्तानीनें विचारले, "का? असे अडखळला का?"

"उगाच विशेष काहीं नाहीं" चिमाजीअप्पा म्हणाले

"तरी पण?" मस्तानीने पुन्हा विचारले

"तुम्ही आमच्याबरोबर मोहिमेवर येणार ना?" चिमाजीअप्पानी विचारले

"स्वारीनें मला नेले तर व आपण स्वारीला तशी सल्ला दिली तर!" मस्तानी म्हणाली

"तू इथेच रहा. तू बरोबर असलीस म्हणजे मला माझ्या इतर कामाचा तुझ्या-

§ शिवाजीमहाराज व मातुःश्री जिजाबाई कसब्याच्या गणपतीजवळील 'राजमहाल' नावाच्या वाड्यात रहात असत या वाड्याजवळच एक बाग होती, तिला राजबाग म्हणत सध्या ही बाग व हा वाडाही काळाच्या उदरात गडप झाला आहे!

मुळें वेळीं वखतीं विसर पडावयाचा, व तो दोष माझ्या माथीं बसावयाचा" बाजीराव म्हणाले

मस्तानी यावर काही न बोलता नुसती किंचित् बावरलेल्या हरिणीसारखी त्या दोघांच्या तोंडाकडे टकमक पहात उभी राहिली

"का? इथे रहाणें तुला पसंत नाहीं वाटतें?" बाजिरावांनी गालातल्या गालात हसत चिमाजीअप्पाकडे नेत्रकटाक्ष फेकीत विचारलें

"मी आपल्या आज्ञेबाहेर नाहीं आपणाला जर मोहिमेत एकट्यानें करमणार असेल व मी बरोबर आल्यानें आपण आपल्या कर्तव्यांत चुकूं असें आपणाला वाटत असेल, तर मी मागे एकटी राहायला तयार आहे पण भावजी आताच म्हणाले की—"

बाजीराव मध्येंच म्हणाले, "अप्पा म्हणाला तें खरें, पण तें शब्दार्थीनें खरें नाहीं, तत्त्वार्थीनें खरें अर्धांगी नेहमीं पतीबरोबर पाहिजेच पण वीर, मुत्सद्दी, राज्यकर्ता व गृहस्थ अशा भिन्न भिन्न भूमिका आम्हाला भिन्न भिन्न वेळी साजऱ्या करावयाच्या असतात या न्यायानें समरांगणाच्या मार्गातील व प्रत्यक्ष समरांगणावर तरवार हीच आमची अर्धांगी होय रंगमहालात आमचें चित्तरंजन करणाऱ्या अथवा इतर हरएक कार्यांत सल्लामसलत देणाऱ्या यौवनसंपन्न सुंदर मानवी अर्धांगीचें तिथें प्रयोजन नाहीं ती अशा वेळीं कार्यसिद्धीला तर उपयुक्त होणार नाहींच, पण उलट कार्यनाश मात्र करील"

"तो कसा काय?" मस्तानीनें स्तिमित वृत्तीनें आपल्या गोंडस डाव्या हाताची रत्नजडित मुद्रिकायुक्त तर्जनी आपल्याच अणकुचीदार हनुवटीवरील खळग्यावर ठेवून म्हणाली, "तें मला कळेल तर आजवर झालें तें झालें, यापुढे तरी शहाणपणानें वागता येईल!"

"ह्या गोष्टी फोड करून सांगावयाच्या नसतात, त्या ज्याने त्यानें तारतम्य-बुद्धीनें ओळखावयाच्या असतात दूरची गोष्ट कशाला? आजचाच प्रकार पहाना, अप्पानें माझी चूक माझ्या पदरात घातली ती अगदीं बरोबर पण अशी चूक माझ्या हातून तरी कां झाली?" बाजिरावांनीं विचारलें

"ते मला तरी काय माहीत नाहीं!" मस्तानी उद्गारली.

"अशा चुका प्रणयी युवदंपत्यांच्याच हातून होतात, व त्या त्यांना नकळत होतात हें त्यातले विशेष" बाजीराव म्हणाले

चिमाजीअप्पा तेवढ्यात मध्येंच हसून म्हणाले, "हे पहा, अजून दोन तीन दिवस आपणाला मोहिमेवर निघावयाला अवकाश आहे आजच ह्या वाटाघाटी कशाला? प्रथम मोहिमेची जय्यत तयारी तर होऊ द्या, मग पुढचें पुढे पहातां येईल" ते मस्तानीकडे वळून म्हणाले, "वहिनी! असे पहा आता तुम्हीदेखील आमच्याबरोबर चला"

"पहा बर!" मस्तानी किंचित विषादाने म्हणाली

"तुम्हाला काय त्याचे? मी चला म्हणतो ना?" चिमाजीअप्पा उत्तरले

मस्तानीच्या ह्या प्रश्नात व अप्पाच्या उत्तरातही बराच खोल अर्थ साठविलेला होता त्या प्रश्नोत्तरात पेशव्याच्या अंत पुरातील सवतीमत्सर पूर्णपणे प्रतिबिंबित झाला होता पण बाजिरावाना व अप्पानाही हा विषय नवीन नसल्याने त्यांनीं मुद्दामच या वेळीं ती बाब प्रामुख्यानें विचारात घेण्याचे टाळले कदाचित् एक मेकाच्या सकोचवृत्तीमुळेच त्यानी तसे केले असेल अप्पाचे आताचे एकदर वर्तन व विचार हीं मस्तानीच्या मनकवड्या विचाराना पोषक असल्याने मस्तानी त्याच्या अनुमतीची पडत्या फळाची आज्ञा घेऊन त्याच्याबरोबर वाड्यात जावयाला तयार झाली शनवारवाड्याच्या दिल्लीदरवाजाबाहेर त्याचे घोडे सज्ज होतेच मस्तानी आज बाजिरावाबरोबर आली ती आपल्या आवडत्या कस्तुरी नावाच्या कृष्णवर्णाच्या घोडीवर स्वार होऊन आली होती अप्पाच्या ते ध्यानींही नव्हतें त्यामुळे ती कस्तुरीकडे वळलेली पाहून अप्पानीं तिला विचारलें, "वहिनी! तुमचा मेणा कुठे आहे?"

"मेणा?" मस्तानी म्हणाली, "भावजा! आपणाला आता मोहिमेवर जायचे आहे मोहिमेवर मेणे आणि पालख्या काय करायच्या? मोहीम आणि जनानखाना यात जमीनअस्मानाचें अतर आहे ऐषआरामाच्या वेळीं जनानखान्याचे महत्त्व, मोहिमेच्या वेळीं त्याचे काय होय? मी तुमच्याबरोबर मोहिमेवर येणार ती तुमची एक सैनिक या नात्याने येणार म्हणजे पेशवे आपल्या प्रियतमेचे प्रिय करता करता आपल्या कर्तव्यालाही विसरतात असे कुणीं म्हणायला नको"

अनेक महत्त्वाचे अर्थ एकाच शब्दातून व्यक्त करण्याचे मस्तानीचे चातुर्य वाखाणण्याजोगे होतें केव्हा केव्हा तर तिच्या ध्यानींमनीं नसलेले गूढार्थही तिच्या शब्दातून आपोआप उत्पन्न होत आताही तसेच झाले ती बोलली ती

वस्तुत. पेशव्यांच्या अत पुरातील गृहकलहाना उद्देशून बोलली, पण अप्पाना मात्र वाटले कीं, आपण आतांच बाजिरावाना विलासलोलुपतेबद्दल ठपका दिला, त्याला प्रत्युत्तर म्हणून तिने हा खासा टोमणा हाणला मात्र त्यात त्याना विषाद वाटला नाही, उलट आनदच वाटला ह्या निमित्ताने तरी मस्तानी जर कार्यक्षम बनली, तर ता बाजिरावाना मर्यादेत ठेवून कर्तव्यतत्पर करण्याला स्वयप्रेरक शक्तीप्रमाणे उपयुक्त होईल असा त्याना अजूनही भरवसा वाटत होता ते मस्तानीला मन-मोकळेपणानें म्हणाले, "वा ! वहिनी ! मग तर फारच उत्तम ! ईश्वर तुमचा शब्द खरा करो !" इतक्यात जवळच्या देवालयातील घटानाद झाला तो ऐकून चिमाजीआपा क्षणभर थबकून उत्साहित चित्ताने म्हणाले, "वहिनी ! ऐका ! तुमच्या-आमच्या सदिच्छेला ही ईश्वराची साक्ष ऐका !"

चिमाजीअप्पा म्हणाले त्याप्रमाणे ती ईश्वराची साक्ष असो किंवा नसो, श्रद्धाळु मस्तानीला ते खरेंच वाटले तिनें तेथल्या तेथे ज्या दिशेकडून तो घंटानाद ऐकू आला होता त्या दिशेकडे वळून हात जोडून गभीर मुद्रेने मनातल्या मनात ईश्वराची करुणा भाकली, "भगवता ! माझ्या मुखातून सैनिकवृत्तीचे, स्वयस्फूर्तीचे बोल निघायला व त्याना तुझी मान्यता मिळायला एक गाठ पडली हा योगायोग जर तुझ्या कृपेमुळे जुळून आला, तर 'मस्तानी ही पेशव्याना विलास-विहारात गुतवून कर्तव्यपराङमुख करणारी अवलक्षणी कृत्या आहे, ही पेशव्यां-च्या दुर्लौकिकाला कारण होईल' असा जो आरोप माझ्यावर येऊ पहात आहे, त्याचें आपोआप निरसन होईल देवा ! माझ्या हाकेला धावा व माझ्या हातून पेशव्याच्या लौकिकाला साजेशी काही कामगिरी होईल असें करा"

मस्तानीने ज्या अपवादाचा मनात उच्चार केला, तो अपवाद ती बाजि-रावाच्या पदरी आल्या दिवसापासून तिच्या वाट्याला आला होता पहिली गोष्ट, मस्तानी आपल्या मनाने जरी बाजिरावाची धर्मपत्नी होती व बाजीरावही प्रथमपासून तसेंच मानीत होते,* तरी खुद्द त्यांच्या घरात व इतरत्र 'मस्तानी ही बाजिरावाची रक्षा' असाच बोभाटा झाला होता, आणि त्या बोभाट्याला आळा घालण्याला ती दोघेही असमर्थ होती वर वर त्या बोभाट्याचीं कारणे दिसत तीं अशीं की,

* बाजीराव मस्तानीच्या धर्मविवाहाचा व मस्तानीच्या पूर्वायुष्याचा रहस्यमय वत्तान्त **'पेशवाईचें पुनर्वैभव'** या पेशवाईमालेतील सहाव्या कादबरीत आला आहे

बाजिरावाची धर्मपत्नी काशीबाई ही अत्यंत प्रेमळ व सरळ वृत्तीची साध्वी होती हें खरें, पण मस्तानी तिच्याहून तरुण व रूपवान् अशी असल्यानें व तिचें कुलशील आणि चारित्र्य ही प्रथमपासूनच सार्वत्रिक संशयाची पात्र होऊन बसल्याने तिच्याविषयीं काशीबाईला स्त्रीस्वभावानुसार सापत्नभावाचा दुजेपणा वाटणे स्वाभाविक होतें मस्तानीविषयीं जी भावना काशीबाईची, तीच भावना थोडयाफार अंतरानें इतर आप्तेष्टांचीही होती बाजीराव हे विलासी व उमदे गडी असल्याने ते मस्तानीच्या ठायी वाजवीपेक्षा जास्त आसक्त बनून राहिले होते त्या आसक्तीच्या अतिरेकात त्याना काशीबाईचाही अनेकदा विसर पडे, त्यामुळें अनायासें त्याच्याविषयींच्या लोकापवादाना दिवसेंदिवस बळकटी येत होती वस्तुतः ह्या विलासलोलुपतेच्या आरोपाला बाजीरावच जास्त पात्र व जबाबदार होते मस्तानीची त्यात मोठीशी चूक नव्हती ती काय, वृक्षामागून वृक्षाची छाया या न्यायाने वागे पण जनापवादातील साऱ्या अपयशाला धनी मात्र तिलाच व्हावे लागे कारण बोलून चालून ती सर्वांनाच परकी पडली तिच्याविषयीं एकट्या बाजिरावाशिवाय इतरांना का व कसा ओढा वाटणार! हीं अर्थात् पूर्वी निर्देशिल्याप्रमाणे वरवरचीं कारणे झाली यातले अंतस्थ कारण शोधावयाचे तर त्यासाठीं दोन महिन्यापूर्वी भास्कररावाला बाजिरावानी दुखाविले होतें तेथवर किंवा त्याहीपेक्षा खोल पाण्यात जाणे अवश्य होतें मस्तानीचा कारभारी कोन्हेरराम हा भास्कररामाचाच वडील भाऊ होता ह्या दोघा भावानीं व कोन्हेररामाच्या बायकोनें मिळून पेशव्याच्या गृहसौख्याच्या मंदिराचा पाया आतून पोखरण्याचा सपाटा चालविल्यामुळेंच त्या घरात नसते कलह माजले होते

अशा अंतस्थ नाजुक परिस्थितीमुळे मस्तानी अलीकडे सदासर्वदा मनांतून खिन्नावलेली असे बाजीराव तिला खिन्न होण्याला कोणतेही कारण होऊ देत नसत, ते तिला अगदीं फुलात घालून वागवीत, हे सारे जरी खरें, तरी सभोवार उसळलेल्या काहुरात तिच्या वाटयाला 'ही पेशव्याची रक्षा' असा जो अपमान येई, तो तिला सहन होण्याजोगा नव्हता ह्या अपमानाचें बीज प्रथम पेशव्याच्या घरात त्याच्या आप्तमंडळीच्या असंतोषात रुजले होतें व तेथून पुढे त्याचा सर्वत्र फैलाव होत होता थोरामोठयाच्या अशा बाबतींत ठिणगीचा वणवा व राईचा पर्वत होण्याला फारसा अवकाश लागत नाहीं थोरामोठयांचे तोंडपुजे व आपमतलबी नोकरचाकर असल्या खासगी असंतोषाची होळी पेटवून त्या होळीवर स्वतःची पोळी भाजून घेण्यात चांगले तरबेज असतात. त्यांना अनादिसिद्ध

जगद्विख्यात सवतीमत्सराचे महत्त्व कळत नसेल असे थोडेच आहे ! त्यांतही ह्या द्वेषाग्नीला नेहमीं प्रज्वलित ठेवणारे भास्करराम, कोन्हेरराम असे वडानलानें रसरसलेले निखारे पेशव्याच्या अस्तनीतच होते मग काय विचारता ! त्यानी स्त्रीजातीच्या मनातील नैसर्गिक सवतीमत्सराचा फायदा घेऊन भोळ्या काशीबाईचे कान फुकून तिच्या तोंडदेखले मस्तानीच्याविरुद्ध बोलून आपला जम बसविण्याचा प्रयत्न चालविला, इतकेच नव्हे तर मुळात त्या मत्सराचा उद्भव व जोपासना करण्याच्या कामीही त्यानी पूर्ण खबरदारी घेतली, त्याचा हा सारा परिणाम होता त्यातल्या त्यात आश्चर्याची गोष्ट ही की, हा द्वेषाग्नि सर्वांचीं अतःकरणें जाळीत सुटला होता, तरी त्या अग्नीला क्षणोक्षणी प्रज्वलित करणारे अस्तनीतील निखारे मात्र कोणालाही दिसत नव्हते

मस्तानीसारख्या सज्जन स्त्रीला सभोवारचे सारे जग असें हिणवू लागलेलें पाहून कसा खेद होणार नाही ! ह्या सर्व गोष्टीचा विचार करून तिनें बाजिरावाना सागून स्वतःसाठी स्वतत्र असे एक निवासस्थान मागून घेतले होते घरगुती तटे मिटावे व वितुष्टे कमी व्हावा हा मस्तानीचा असे करण्यातील हेतु पण त्या हेतूचाही सर्वत्र असा विपर्यास झाला की, मस्तानीनें पेशव्याना पूर्ण नादीं लावून कुटुबातून वेगळे काढण्याचा कारभार आरंभिला आहे. काहीनीं तर ह्या बाजीराव-मस्तानीच्या प्रेमसबधावर आणखी काही भलभलते तर्ककुतर्क करून भलभलतीं कारस्थाने रचण्याला सुरवात केल्याची बातमी मस्तानीला मिळाला होती त्या कारस्थानाची बातमी तिला मिळाली, पण कारस्थानाचा उगम कोठून होतो हे कळल्याशिवाय त्याना आळा घालण्याचा उपाय तिला तरी कसा सुचणार ! मात्र ह्या कारस्थानाच्या सुरुगाचा भडका केव्हा कसा उडेल, त्यात आपला सत्यनाश होईल की काय, ह्या भयाची तरवार मस्तानीच्या मानेवर सदाची लटकत होती तिला अशा स्थितींत आधार एका बाजिरावाचाच ते आपल्या ठायी आसक्त आहेत, ते जात्याच विलासी आहेत हें ती ओळखीत होती पण विलासासक्त माणसाच्या अत करणात शुद्ध प्रेमाची गगा सतत वहात असतेच असे नाही त्याची अत करणे गढूळ होण्याचा बराच सभव असतो हा मानवी स्वभावाचा निसर्गविशेषही तिला पूर्णपणे अवगत होता तिच्यासारख्या अन्य एखाद्या स्त्रीला या वेळीं स्वहिताचा एक उपाय सुचला असता, आपल्या प्रियकराला भल्याबुऱ्या उपायानीं नादीं लावून ठेवणे हाच तो उपाय पण मस्तानी इतकी अधम नव्हती तिचें बाजिरावा-

वरील प्रेम शुद्ध निर्मल गंगाजलाप्रमाणें होतें व त्या प्रेमासभोंवारची धर्मबंधनेंही ती स्वयंप्रेरणेनें पाळीत होती ती आपणाला बाजिरावाची धर्मपत्नी मानीत होती, व त्या नात्यानें आपलें कौटुंबिक कर्तव्य काय तेंही तिला चांगलें अवगत होतें. म्हणूनच कुटुंबघात होईल अशी कोणतीही गोष्ट करण्याची दुर्वासना तिच्या मनाला कधींही शिवली नाहीं अर्थात् सभोंवारच्या अनिष्ट वातावरणात आपला टिकाव लागण्याचा एकच राजमार्ग मात्र तिच्या अटकळींत होता, तो सर्वांना आपण प्रिय होण्याचा ही सर्वप्रियता प्राप्त होण्यासाठीं आपणाला सखी लाभली पाहिजे असें तिचें मन तिला सांगत होतें व ती सखी लाभावी अशी ती वारवार प्रसंग पाहून परमेश्वराला आळवी, त्यातलेंच तिचें आजचें आळवणें होतें

असो बाजीराव, चिमाजीअप्पा व मस्तानी हीं आपापल्या घोड्यावर स्वार होऊन मोहिमेचें पुढें कसें करावयाचें याविषयीं बोलत चालली, तेव्हा शनवार वाड्यातला एक पहारेकरी त्याच्याकडे जरा चमत्कारिक नजरेनें पहात होता. पण तिकडे कोणाचेंही लक्ष नव्हते. ती निवासस्थानीं जाऊन पांचेपर्यंत दाभाड्याशीं पुन्हा तडजोडीची भाषा करावयाची किंवा नाहीं याविषयी वाटाघाट चाललीच होती. त्या वाटाघाटीचा निर्णय इतर कार्यकर्त्या मंडळींच्या विचाराने ठरावा एवढेंच तेव्हां ठरलें

  

पेशव्याच्या राहत्या वाड्यासमोर तेव्हा सैन्यात दाखल होण्यासाठी परमोत्सुक झालेल्या तरुण व तेजस्वी सैनिकांचा सागर उसळला होता त्या सर्व सैनिकांना पेशवेसरकाराची स्वारी आलेली पाहून अत्यानंद झाला त्यांनी पेशव्याच्या नावाचा जयजयकार करून सारे नभोमंडळ दणाणून सोडले आपल्या वल्लभाविषयी इतका आदर ह्या लोकांच्या ठायीं वसत आहे असे पाहून मस्तानीला धन्यता वाटली. आपण या वेळीं बाजिरावाबरोबर जाऊन त्या सर्व सैनिकांचा परामर्ष घ्यावा किंवा खरें बोलावयाचें तर बाजिरावाच्या त्या बहुमानांत त्याची अर्धांगी या नात्यानें आपलाही वांटा आहे असें सर्वांना दाखवावे असें तिच्या मनात आलें. पण जनप्रवादाचें भय तिला तसे काहीं करू देईना इतकें बाजिरावाबरोबर त्या जनसंमर्दात जाण्याला उत्सुक झालेले तिचे मन बऱ्याच लोकांचे नेत्र आपणाकडे आकर्षिले गेलेले पाहून किंचित् खट्टू झाले व केव्हा एकदा आपण सर्वांच्या डोळ्याआड होतों असे तिला वाटलें अप्पा बाजूलाच उभे होते त्यांनीं मस्तानीची

गोंधळलेली मनःस्थिति तेव्हाच ओळखली व तिला म्हटलें, "वहिनी! तुम्ही आंत जा ना? तुम्ही कोणी परक्या नाहीं"

अप्पाचे शब्द सहानुभूतीचे होते, पण ते ऐकून मस्तानीचे डोळे अकस्मात् पाण्याने भरून आले त्या नुसत्या चार शब्दांनीं आणूं नयेत ते विचार तिच्या मनांत आणून सोडले 'मी दासी!—पेशव्यांची प्रियतमा असलें तरी त्यांची एक विलासदासी मी-असें जर काशीबाईसाहेबांना वाटतें, तर मी तरी कोडगेपणानें स्वतःची मानखंडना करून घ्यायला त्याच्याकडे कशाला जाऊ! त्यापेक्षा आपण माघारें आपल्या वाड्यांत जावे हे बरें' असें एका क्षणात स्वतःच्या मनाशीं ठरवून ती अप्पाना म्हणाली, "भावजी! मी आले खरी, पण आतां परत माघारे जावेंसें मला वाटू लागले आहे"

"का बरें? इतकें कसलें भय तुम्हाला वाटते?" अप्पा आजूबाजूला पहात समोरून कोन्हेरराम येत होता त्याच्याकडे बोट दाखवून म्हणाले, "हे पहा तुमचे दिवाणजी आले याच्याबरोबर जावयाला तर कांहीं हरकत नाहीं ना?"

"वा! माझ्याबरोबर यावयाला वहिनीसाहेबांना हरकत कसली?" कोन्हेरराम आला तोंच आगतुक तोंडपुज्याप्रमाणे फिदिफिदि हसत पुढे आला व अप्पांना म्हणाला, "धनीसाहेब! आपण आता जा मी याना आंत घेऊन जातों"

"ठीक आहे" असें म्हणून अप्पानीं कोन्हेररामाला जरा बाजूला घेऊन त्याच्या कानात 'याचा कोणाकडून पाणउतारा होणार नाहीं अशी खबरदारी घे' असें सांगितले व ते तेथून बाजिरावांमागोमाग निघून गेले.

कोन्हेररामाने मस्तानीला आंत पेशवीणबाईकडे येण्याविषयीं इतका आग्रह चालविला की, त्याला नाहीं म्हणण्याचे मस्तानीच्या अगदीं जिवावर आले होतें. इतक्यांत तिची विश्वासू दासी †सुंदर अचानक तेथें आली व तिला म्हणाली, "बाईसाहेब! जशा आला तशा अगोदर माघाऱ्या चला पाहूं!"

"का बरें?" मस्तानीनें विस्मयचकितपणे सुंदरकडे पहात विचारलें, तेवढ्या-वल्या तेवढ्यांत कोन्हेरराम व सुंदर यांची एकदां—फक्त एकदांच दृष्टादृष्ट झाली. दोघाच्याही दृष्टींत एकमेकांविषयीं पूर्ण संशय भरला होता त्यांत फरक असेल तर एवढाच कीं, एखाद्या मांजरीची नजर समोरच्या असहाय उंदरावर खिळून असावी त्याप्रमाणे सुंदरची कोन्हेररामावर रोंखलेली दृष्टी त्याला खाऊं कीं गिळूं अशा

† 'पेशवाईचें पुनर्वैभव' ही या मालेंतील सहावी कादंबरी पहा

अर्थाचे मुके बोल बोलत होती व कोन्हेररामाच्या दृष्टींत गुन्हेगारीचा दीनवाणेपणा पूर्णपणे प्रतिबिंबित झाला होता

"कोन्हेरराम! तुम्ही जा कसे! तुमचे कारस्थान तिकडे तुमची वाट पहात आहे" सुदर खोचिकपणे म्हणाली

"त्याचे कसलें कारस्थान?" मस्तानीनें विस्मयपूर्वक विचारलें

"ते त्यांना माहीत कीं मला माहीत" सुदर उत्तरली.

"माझें कसलें कारस्थान?" कोन्हेररामानें चिडून विचारलें

सुदर निर्भयपणे पूर्ववत म्हणाली, "हे पहा, वैद्यापाशीं रोग दडवून काहीं भागावयाचे नाहीं मी सुदर आहें, तुम्ही मला ओळखता ना?"

सुदरच्या त्या प्रश्नात अशी काय जादू होती नकळे, पण पिशाचें रामनामाला भिऊन पळतात त्याप्रमाणे कोन्हेररामाने अत्यन्त खट्टू होऊन तेथून पाय काढला. जाता जाता तो एवढें मात्र म्हणाला, "वहिनीसाहेब! सुदरचा माझ्याविषयीं गैरसमज झाला आहे, तो योग्य वेळीं दूर होईलच तोपर्यंत आपला मात्र माझ्याविषयी गरसमज न व्हावा"

सुदर कोन्हेररामाला हलक्या हातानीं पण तुसडेपणाने पाठमोरा दूर लोटीत म्हणाली, "भल्या माणसा! तुझ्याविषयी माझा समज झाला आहे, गरसमज झालेला नाही तू एवढें एकच लक्षात ठेव कीं, या सुदरच्या पाठीला डोळे आहेत आता तू मुकाटपणे एथून जा कसा!"

कोन्हेरराम मुकाटपणे तेथून निघून गेला. जाता जाता तो वारवार मागें वळून पहात होता, पण चोरून उघडपणें सुदर अथवा मस्तानी याच्या नजरेला नजर भिडविण्याचे धैर्य त्याला झालें नाहीं

"सुदर! कोन्हेररामाचा असा अपराध तरी काय आहे?" मस्तानीनें विचारले

सुंदर उत्तरली, "आपण प्रथम आल्या पावलीं आपल्या मकाणाकडे माघाऱ्या चला, मग मी सारे काहीं सांगतें"

"पण मी काशीबाईसाहेबाना भेटायला आलें आहें. त्याना भेटल्याशिवाय माघारीं गेलें तर त्या व श्रीमतदेखील मला काय म्हणतील?"

"योग्य कारणे दाखवून श्रीमंताची समजूत मी घालू शकेन, आपण त्याची

काळजी करू नये. आणि बाईसाहेबांविषयीं आपण म्हणाल, तर त्याची समजूत परमेश्वराने करावी तेव्हां."

"म्हणजे काय ?"

"चला, तें सारें मी तुम्हाला सांगते प्रथम घरीं जाऊं तर खरें!"

मस्तानीनें ओळखलें कीं, इथे काहींतरी नेहमींच्याहून निराळा प्रकार आहे, एरव्हीं सुंदर इतकी निग्रहानें बोलली नसती सुंदर ही बुंदेलखंडांत जैतपूरच्या किल्ल्यात मस्तानी महमदखान बंगषाच्या कैदेंत होती तेव्हांपासूनची तिची विश्वासू दासी काशीबाई वगैरे मंडळी आपणाशीं दुजाभावानें वागते असें पाहून त्या मंडळींचीं कारस्थानें ओळखून काढण्याच्या कामगिरीवर मस्तानीनें तिची नेमणूक केली होती तिच्या शब्दावर मस्तानीचा विश्वास कसा बसणार नाही ! ती लगेच 'आपण जातों' असा एका नोकराहातीं बाजिरावांना निरोप पाठवून सुंदरबरोबर पायींपायींच आपल्या वाड्याकडे निघून गेली

प्रकरण तिसरें

# एक गरीब कुटुंब

ज्या दसऱ्याच्या दिवशीं बाजीराव व मस्तानी शनवारवाड्याच्या आवारांत गुजगोष्टी करण्यात गढून गेलीं होतीं, त्याच वेळीं शनवारवाड्यापासून कांहीं अंतरावर कसब्याच्या गणपतीच्या पिछाडीला जरा पलीकडे असलेल्या एका मोठ्या घराच्या मागच्या पडवीत एक सुमारे पंचेचाळीस वर्षांच्या उमरीची पण दारिद्र्य व सांसारिक विवंचना यामुळे सारे केस पिकल्यानें म्हातारी दिसणारी विधवा स्त्री व वीस वर्षांच्या उमरीचा मिसरूडही न फुटलेला पण पिळदार शरिराचा आणि तेजस्वी तोंडवळ्याचा एक तरुण अशीं दोघेजणं आपपात बोलत बसलीं होतीं. त्याच्या एकंदर वागणुकीवरून तीं मायलेकरें असावीं हे कोणाही त्रयस्थाला तेव्हांच ओळखता आले असतें, व त्यांच्या राहणीकडे पाहाता त्याचें अठरा विश्वे दारिद्र्य उगवत्या सूर्याइतकें स्पष्ट दिसून येत होतें. वाचकांनीं जास्त बुचकळ्यात पडू नये यासाठीं एथे आधींच हे सांगून ठेवणे बरें कीं, आपल्या नाव ओळखीचीं देवकी व कृष्णराव हींच तीं मायलेकरें होती.

" मग काय, आई! मी मोहिमेवर जाऊं ना? " कृष्णरावाने विचारलें.

कृष्णरावाचा हा प्रश्न एकून देवकीचे डोळे पाण्यानें भरून आले. ती आपल्या नेसत्या जुनेराच्या पदराने डोळे पुशीत उद्गारली, " बाळ! आता मी तुला जा किंवा जाऊं नको असें कोणत्या तोंडानें म्हणूं बरें! जाऊं नकोस म्हणेन, तर परमेश्वराने तुला जो पुरुषार्थाचा मार्ग मोकळा करून दिला आहे, त्या मार्गांत आड आल्याच्या अपराधाला मी धनीण होईन—"

" तूं विचार कर, जाऊं नको म्हणशील तर दादाप्रमाणे मी आजन्म आचारी-पाणक्या होऊन बसलेला तुला आवडेल का? "

" पण मोहिमेवर जायचें म्हटल्यावर रे तर रे " देवकी पुन्हा डोळ्यात दाटलेली आसवें पदराने पुशीत म्हणाली, "रणक्षेत्र म्हणजे बोलून चालून मृत्यूचा दरबार! केव्हा कशी वेळ येईल ती सांगून थोडीच येईल!"

" आई! आईच्या अंतःकरणाचा कळवळा या नात्याने मला तुझे बोल पटतात. पण इतकेंही करून मनाला वाटतें कीं, माझ्या आईने असे बोल बोला-

वयाला नको होते. आई ! जेव्हा जेव्हा मला माझी ओळख इतराना करून देण्याची पाळी येते, तेव्हा तेव्हा मी अभिमानाने माझ्या बाळपणापासून भयंकर हाल-अपेष्टा भोगताना स्वाभिमान, स्वधर्माभिमान व स्वकुलाभिमान याना जागून मला लहानाचा मोठा करणाऱ्या तुझ्या कष्टमय आयुष्याची करुणकहाणी प्रथम निवेदन करतो व मग सागतो की, अशा पराक्रमी कर्तबगार आईचा मुलगा मी ! आई ! खरेच सागतो, माझ्यासारख्या तरण्या बांडाने समरागणावर जाऊन शत्रूच्या अनेक बलाढ्य सैनिकाना मारणे व प्रसगविशेषी कर्तव्यपालनासाठीं स्वतः मरणे जितकें अवघड आहे, त्यापेक्षा तुझ्यासारख्या एका अनाथ ब्राह्मणविधवेने–आणि तीही भिक्षुकाची विधवा नव्हे, गृहस्थाची विधवा–अठरा विस्वे दारिद्र्यात वैधव्याची कुऱ्हाड माथा कोसळली असता व तीन अर्भकें पोसावयाला पदरी असता त्याना जगवून स्वतः अब्रूनिशीं जगणे जास्त अवघड आहे अशा थोर आईचे लेशमात्र गुण तिच्या कुशीत जन्म घेणाऱ्या पुत्राच्या वाट्याला आले तरी तो पराक्रमी नरवीरसा शोभतो अशा थोर आईचा मी भाग्यशाली पुत्र आहें मला माझ्या आईने अशा प्रसगी समरागणात उडी घालावयाला प्रोत्साहन दिले पाहिजे ते सोडून तू हे भलतेच काय आरभिलें आहेस अरे ? कल्पना कर की, साक्षात परमेश्वर या घटकेला येऊन तुझ्यासमोर उभा राहिला व 'म्हातारे ! तुझा मुलगा आचारी पाणक्या होऊन दीर्घायुषी तरी होईल, किंवा पराक्रम करून थोड्या दिवसात धारातीर्थी मरून पडेल यापैकी कोणते भाग्य तुझ्या मुलाला लाभावे असे तुला वाटेल ?'—असें त्या परमेश्वराने तुला विचारले, तर तू काय उत्तर देशील ? ''

त्या मायलेंकराचे याप्रमाणे सभाषण सुरू असता तीं त्या संभाषणाच्या ओघात स्वतःला इतकी विसरून गेलीं होतीं की, तेवढ्यात एक पचविशीच्या उमरीचा तरुण सोळा सत्रा वर्षे वयाच्या एका तरुण, वक्रदेही, वर्णानें काळीसावळी व नाकाडोळ्यानी नीटस अशा सुवासिनीसह केव्हा बाहेर येऊन उभा राहिला याची त्याना दादच नव्हती त्या नव्या तरुणाने पहिल्या तरुणाचे शेवटचे बोल पूर्णपणे ऐकले व घरात पाऊल टाकता टाकता उत्तर दिले, " कृष्णा ! तू म्हणालास ते मला अक्षरशः पटलें गेलेलङ्ठ आचारी पाणक्या होऊन शतायुषी होण्यापेक्षा समरांगणावर जाऊन तरवार गाजवून आंट घटकात मरणे उत्तम "

त्या नव्या तरुणाचे ते आकस्मिक उद्गार ऐकून देवकी व कृष्णराव यांनीं एकदम चमकून दरवाजाकडे पाहिलें.

"कोण? बळिराम! तू का तो?" देवकीनें बसल्या जाग्यावरून उठून विस्मयचकित वृत्तीनें पण हसतमुखानें हाक मारली

"कोण? दादा! तुम्ही केव्हां आलां?" कृष्णरावानें अत्यंत उत्सुकतेनें व उल्हसित मुद्रेनें बळिरामाला प्रश्न केला.

इतक्यांत बळिरामाबरोबर आलेल्या तरुण सौभाग्यवतीनें आंत येऊन प्रथम देवकीला नमस्कार केला. देवकीनें तिला 'अष्टपुत्रा सौभाग्यवती उदंड आयुष्यवती हो' असा आशीर्वाद दिला

बळिरामाच्या एकंदर रोखावरून त्याच्या तोंडून जे उद्गार निघाले ते त्राग्याच्या स्वरूपाचे होते हें तेव्हांच ओळखतां येण्याजोगें होतें. प्रथम देवकीनें तिकडे लक्ष्य न देतां बाहेरून दमून आलेल्या त्या दोघांना विश्रांति घ्यावयाला सांगून गूळपाणी घ्यावयाला आणून दिलें बळिरास एक लहानसा गुळाचा खडा तोंडांत टाकून दोन तीन वाटया पाणी घटाघटां पीत आपल्याबरोबर आलेल्या तरुण मुलीला म्हणाला, "राधे! आतां आपण आपल्या घरीं आलों आहों, इथें पाणी घ्यावयाला कांहीं हरकत नाहीं"

"म्हणजे काय?" देवकीनें मध्येंच विचारलें कृष्णरावानेंही तोच प्रश्न पण मूकवृत्ति धारण करून नुसत्या नजरेनें विचारला

"इतःपर माहेरच्या हद्दींत आपण साऱ्या जन्मांत पाणीदेखील पिणार नाहीं अशी तिची शपथ आहे" बळिराम उत्तरला

"असें का बरें?" म्हातारीनें बळिरामाकडे वळून विचारलें, "काय झालें रे?"

बळिराम उत्तरला, "यापुढें मोघे आमचे धनी नाहींत व आम्ही त्यांचे सेवक नाहीं"

"पण इतकें भांडण व्हायला झालें काय तें तरी कळूं दे!" कृष्णरावानें विचारलें

"भांडण होण्याचें कारण हेंच कीं, आम्ही त्यांच्या लहरीप्रमाणें सत्य, स्वाभिमान वगैरे चटसारें गुंडाळून ठेवून निमकहरामी करावयाला तयार नाहीं" बळिराम म्हणाला

"धनी आणि सेवक यांचें नातें असेंच अवघड आहे. सेवाधर्म गहन आहे" कृष्णराव म्हणाला.

"गोष्ट खरी. पण सेवकाला देखील धर्म आहे ना?"

"अर्थात्!"

" तो धर्म सोडून वागण्याची पाळी धन्यापायीं आल्यावर तिथें काय करावयाचें ? स्वतः चिमणाजीपंत, त्यांचे बंधु व चिरंजीव ह्या सर्व मंडळीचे पिंड शाहूमहाराज व पेशवे यांच्या अन्नावर पोसले. असें असतां चिमणाजीपंतानीं त्या खाल्ल्या घराचे वासे मोजून कोल्हापूरकरासारख्या शत्रूंना सामील व्हावें हें बरें काय ? बरें, तेंही राहो, थोरामोठ्यांच्या गोष्टींत आपण कशाला पडावें असें म्हणून स्वस्थ बसावें, तर तशीही सोय नाहीं ! मोघे स्वतः स्वामिद्रोह करून अधःपाताच्या गर्तेत पडले ते पडले आणि आपल्याबरोबर आम्हाला ओढू पहातात ! मीं सेवेसाठीं त्यांना माझें शरीर विकलें म्हणजे माझा आत्मा व माझी सदसद्विवेकबुद्धिदेखील विकली असें नव्हे कांहीं !"

" खरेंच तसें नाहीं तसें कोण म्हणतो ? "

" तसें मोघे म्हणतात मोघेच काय पण त्यांची नायकापोरेही तसेंच म्हणतात. पेशव्यांच्या बाबतींत एक अत्यंत नीचपणाची गोष्ट माझ्या हातून पार पाडण्याचा बाईसाहेबांचा विचार होता आणि मला असाही जबर संशय आहे कीं, यांच्या मुळाशी कोल्हटकर असावे "

" कोणता तो विचार ? "

" त्या मला आज्ञा करूं लागल्या कीं, मी आचारी या नात्यानें बाजीरावसाहेबांच्या मुदपाकखान्यांत प्रवेश करून घ्यावा व तेथल्या वित्तंबातम्या काढून दाभाडयांना किंवा मोघ्यांना कळवाव्या ! ही अर्थात् धनीसाहेबांची सांगी असेल "

' अरेरे ! काय अधम वासना ही !" कृष्णरावाच्या तोंडून ओघानें उद्गार बाहेर पडले तो तसाच म्हातारीकडे वळून म्हणाला, ' आई ! पहा ! हें ऐक ! मोघ्यांच्या पदरीं नोकरी करण्याला मी प्रथमपासून नाखूष आहे यांचें हेंच कारण इतकेंच काय, पण मला राहून राहून असेंही वाटतें कीं, मीं असल्या नीच मनोवृत्तीच्या वंशाशीं शरीरसंबंध जोडला हाही मोठाच अन्याय केला मला जर मोघ्यांच्या स्वभावांतील ही गोम प्रथमच कळली असती, तर मी त्यांच्या घराण्यांतील मुलगी करण्यापेक्षा आजन्म अविवाहित राहिलों असतों—"

देवकी मध्येंच म्हणाली, " बाबा रे ! कुलशील लग्नाच्या वेळीं पाहावें असतें तें एवढ्याचसाठीं जशी खाण तशीच माती निघावयाची. आजवर कैक पिढ्या चांदोरकरांच्या घराण्याची थोरवी जी कायम राहिली, ती आमच्या बालबोध घराण्याच्या रक्तांत मोघ्यासारख्यांच्या निमकहराम रक्ताची भेसळ होऊन पुढच्या पिढींत

आमच्या कुळाच्या आजवरच्या थोरवीवर बोळा फिरायचा ! हंडाभर दुधात एक मिठाचा खडा पडला तरी तो सारे दूध नासायला पुरतो शास्त्रीबुवानी आणि गोविंदाने ही सोयरीक कशाला जमवून दिली नकळे ! आणि मलादेखील तेव्हा होकार द्यायची दुर्बुद्धि कशी सुचली देव जाणे ! "

अपराध घडला मोघ्याच्या म्हणजे आपल्या पालकाच्या हातून, व त्याचें शासन मात्र आपणाला, हा चमत्कारिक न्याय पाहून राधेला कमालीचा विषाद वाटला तिचा चेहरा मानखंडनेमुळें खदिरांगारासारखा लाल झाला सासू, दीर, पति, अशा वडील माणसावर ती आजवर कधींच संतापली नव्हती तितकी आज संतापून कृष्णरावाकडे पाहून ती म्हणाली, " जसा आपणाला आपल्या कुळाचा अभिमान आहे, तसाच मलाही माझ्या कुळाचा अभिमान आहे, इतकेंच काय पण मला सासर आणि माहेर अशा दोन्ही कुळाचा अभिमान आहे मी अनाथ असलें तरी जातिवंत कऱ्हाड्याचीच कन्या आहे आपला अपराध मी यांनी केला तर आपण त्याना एकदा सोडून हजारदा नाव ठेवा ते माझे पोशिंदे असले तरी अशा वेळीं मी त्यांचा वृथा कवार घेऊन भांडणार नाही पण असले उणे बोल मात्र मी मुळींच सहन करणार नाही माझ्या पूर्वजांनी असली निमकहरामी कधींच केली नाही तुम्ही व मोघे यांच्यातील तिरस्काराना मुळात कीड कुठे लागली आहे हे मला माहीत आहे आता भावजी म्हणाले तेंच त्यांचे उत्तर पण मात्राच्या पिंडीवरील विंचवाला ठेचावें कुणी ? "

बळिराम राधेचें शांतवन करीत म्हणाला, " राधे ! तू अशी संतापू नकोस "

" का ? संतापू का नको ? " धुमसत असलेल्या अग्नीने एकदम पेट घ्यावा त्याप्रमाणे राधेचा संतापाग्नि जास्तच भडकला व अत्यंत उष्णतेनें लोखंडाचाही रस व्हावा त्याप्रमाणे त्या संतापाग्नीच्या आचेने जणु तिचें अंतःकरण वितळून नेत्रावाटे अश्रूंच्या रूपाने वाहू लागलें ते अश्रु उजव्या डाव्या हाताच्या उघड्या मुठींनीं पुशीत हुंदक्यावर हुंदके देत ती उद्गारली, " मी म्हणूनच समजून उमजून अशी सासरच्या माणसासाठीं वनवासाला निघालें असे असता अशीं उणींदुणीं बोलणी माझ्या वाटयाला—" यापुढे तिच्याने बोलवेनाच ! तिच्या तोंडचें अर्धें वाक्य तिच्या जोराच्या हुंदक्यात विरून गेले

बळिराम तेव्हां कृष्णराव व देवकी यांच्याकडे वळून म्हणाला, ' आई ! राधेच्या पायाचें तीर्थ घ्यावें इतकी तिची थोरवी आहे. खरे पाहू जाता ती स्वतः ह्या प्रसंगीं

बाणेदारपणाने वागली, इतकेच काय, पण मलादेखील तिच्या बाणेदारपणाच्या वर्तनानेच स्फूर्ति मिळाली "

" खरे का ? " देवकीने कुतूहलपूर्वक विचारले.

" तर ! ' बळिराम म्हणाला, " मी दुष्कृत्य करावयाला तयार होत नाही असे जेव्हा मी याच्या घरच्या मंडळींने पाहिले, तेव्हा त्या सर्वांच्या कोपाची वीज कडाडली ती प्रथम राधेच्या मस्तकावर कोसळली 'तुझा दीर असा बेपर्वाईने वागतो, तुझा नवरा तर पूर्वीच आम्हाला सोडून निघून गेला आहे, असली नाकापेक्षा मोती जड आम्हाला खपायची नाहींत. ते दोघे पाहिजे तिकडे भीक मागत जाऊदेत आणि त्याच्याबरोबर तूही जा' असे घरधनीणबाईंनी तिला सांगितले, त्याबरोबर त्याच पावली ती घरातून बाहेर पडली, व बाहेर पडता पडता तिने मलाही सांगितलें कीं, अशा ठिकाणी आपण यापुढे घोटभर पाणीदेखील प्यायचे नाहीं इतक्या लहान वयाची बायकोमाणूस होऊन देखील इतकी बाणेदारपणाने वागते, हें पाहून मलादेखील मग तिच्या मागोमाग घराबाहेर पडण्याची इच्छा झाली एरव्हीं मी एवढे धाडस केले असते की नाही याची माझी मलाच शंका आहे."

" हे मला काय माहीत ! ' कृष्णराव अमळ ओशाळून शांत होऊन म्हणाला, तू हे मला प्रथमच सांगावयाचे होतेंस "

पण आजवर ज्या गोष्टी मी विश्वासाने सांगत आले त्याचा तरी काय उपयोग झाला ? " आपणच शेवटी विजय झाला असे पाहून राधेला बोलावयाला जास्त जोर आला ती रागारागाने उद्गारली, " मला काही कुणाचे उणे काढायचे नाहीं. पण ज्यांना आपल्या वंशाचा आणि आपल्या वंशातील प्रत्येकाच्या नसानसांत खेळणाऱ्या रक्ताचा एवढा अभिमान व विश्वास वाटतो, त्यांनीं आपली बहीण अशा वेळी कशी वागते हे एकवार बघायचें होतें "

" का ? रुक्मिणी कशी वागली ? " कृष्णरावाने विचारले

बळिराम म्हणाला, " रुक्मिणी आता आमची उरली नाहीं, ती मोघ्याची झाली ती त्याच्या वळणावर जावयाचीच "

" म्हणजे ? " देवकीनें मध्येंच विचारलें.

" रुक्मिणीवहिनी आताशा माझ्याशीं इतक्या तोऱ्याने व परकेपणानें वागतात, माझ्याविषयीं नाही नाहीं ते गैरसमज असे पसरवितात की,—पण मी चुकले. त्या पडल्या माझी नणंद व मी पडले त्यांची भावजय त्या पडल्या श्रीमंत व मी

पडलें गरीब म्हणूनच परवा त्या आपल्या नवऱ्याबरोबर गेल्या तेव्हा मी अंथरुणाला खिळलें होते तरी मेल्याजित्याची चौकशीही त्यांनीं केली नाहीं पण गरिबांना श्रीमंतांविरुद्ध बोलण्याचा अधिकार नाही" असे म्हणून राधा बोलता बोलता थाबली

"कां? अधिकार कां नाहीं? गरीब काय आणि श्रीमंत काय, सर्व माणसें परमेश्वराला सारखींच प्रिय आहेत व सर्वांना एकच न्याय लागू आहे" कृष्णराव म्हणाला

"हा तत्त्ववाद बोलायला जितका गोंडस आहे, तितकाच कृतींत आणायला अवघड, जवळ जवळ अशक्य आहे परमेश्वराचें नातें आपण गोरगरिबांनीं मात्र आठवावें व त्याप्रमाणे वागावें पण वैभवशिखरावर चढलेल्या माणसांना परमेश्वरच आठवेनासा होतो, मग समानभावना त्यांना कुठून आठवतील? परमेश्वराला ओळखून व भिऊनच भावजींनी पेशव्यांशीं विश्वासघात करण्याचें नाकारलें पण यजमानीणबाई पडल्या श्रीमंत, तसेंच भास्करराम महाराजाचे आश्रित, ते पडले त्यांचे सल्लागार! त्यांना भावजींच्या ह्या पापभीरूपणाची काय किंमत? आपली बरीवाईट आज्ञा आपला नोकर मानीत नाही त्याअर्थीं तो उद्दाम, स्वामिद्रोही व विश्वासघातकी झाला, असा यजमानीणबाईचा ग्रह होण्याला कितीसा उशीर? आणि वन्संदेखील ज्या मला आजवर रोज घालूनपाडून बोलत आल्या, त्या श्रीमंत म्हणूनच की नाहीं? एरव्हीं मीही त्यांची नणंदच आहे पण मी पडले गरीब!" राधा डोळ्यांत आसवें आणून म्हणाली

"गरीब आणि श्रीमंत यांच्यात एवढा जबरदस्त भेद दिसतो खरा, म्हणूनच परमेश्वरा! आम्हाला तू जन्मभर गरिबींतच ठेव आमची दानत टिकून आम्हाला पोटापुरती मीठभाकर मिळाली म्हणजे पुरे आहे" देवकी परमेश्वराला हात जोडून म्हणाली.

बाळिराम अंगावरील कपडे उतरीत उतरीत म्हणाला, "आई! अल्पसंतोषी माणसाचा ह्या महत्त्वाकांक्षी जगात कधींच निभाव लागावयाचा नाही पोटापुरत्या मीठभाकरींत संतोष मानून मी आजवर मोघ्याच्या घरीं राहिलों, त्याचेंच हें प्रायश्चित्त मला भोगावें लागत आहे आज दसऱ्याच्या दिवशीं आम्हाला वणवण करीत एथवर यावें लागलें याचें कारण माझा अल्पसंतोषीपणा अल्पसंतुष्ट पोटार्थी माणसांचें जिणें मरणासमान असतें, हें आज माझ्या चांगलेंच अनुभवाला आलें"

इतके संभाषण त्या मंडळींत आपसांत सुरू होते, तरी राधा खाली बसली नाहीं, की ती वाटचालीनें इतकी थकूनभागून आली होती तरी घोटभर पाणीही त्याली नाही. राधेला काही दिवस गेले आहेत हें देवकीला माहीत होते; व म्हणूनच अशा गर्भारशीला वणवण करीत सणासुदीच्या दिवशी एथवर यावें लागल्याबद्दल तिचा जीव हळहळत होता. ती राधेला म्हणाली, " सूनबाई ! खालीं बैस आणि थोडे पाणी पी. दमून आली असशील, बैस खालीं "

" मी दमले नाही काही ! " राधा नम्रपणें उद्गारली

" हे काय बोलणें झाले ? तरण्याताठ्या बायका तुम्ही, तुमच्या अंगात रक्ताचा जोर असायचाच. पण सडेपणाची गोष्ट निराळी व आताची गोष्ट निराळी. तीं माणसें तरी अशीं कशीं निर्दय चांडाळ ? त्यांनी तुला अशी कशी वणवण करीत पाठविली ? बरें, त्यांना एक पाठवली तर पाठवली, पण तूं तरी कशी आलीस ? " देवकी आपुलकीने राधेला आपणाजवळ बसवून घेत म्हणाली

" सासूबाई ! झाले ते एका परीने बरेंच झाले—"

कृष्णराव मध्येच राधेला पुरतेपणी बोलू न देता, काहीशा तिरस्काराने म्हणाला, " पोटीं येणाऱ्या मुलानं जन्मापूर्वीच आम्हा सर्वांच्या वाट्याला वनवास आणला ! "

" असे बोलू नये रे, मी शुभ बोलावें " देवकी म्हणाली

राधा कृष्णरावाला उद्देशून स्वाभिमानपूर्वक टवचलेल्या नागिणीप्रमाणे उसळून म्हणाली, " मर्दासारखे मर्द असे फितुराच्या फितुरीवर विश्वासून व नशिबावर हवाला ठेवून वागू लागले कीं, त्यांच्या अंगच्या मर्दपणाची माती झाली असेच समजायला हवें " ती डोळ्यात आसवे आणून पुढे म्हणाली, " आमचे काय ! आम्ही बोलून चालून आडव्या मुडक्याची बायकामाणसें. पुरुष काय बोलतील ते मुकाटपणें ऐकून घेणें आम्हाला भागच आहे. पण आम्हां बायकानाही वाचा असते म्हटले, बायकानाही अंतःकरण असतें, स्वाभिमान, मानापमानही असतो. मर्दासारखे मर्द पुरुष हाती बांगड्या भरून दवाला दोष देत स्वस्थ बसले कीं बायकांना स्वतःची स्वतःच्या उभय कुळींच्या पूर्वजांची व स्वतःच्या पुरुषाची इज्जत राखण्यासाठी चूल सोडून उंबरठ्याबाहेर पाय काढावा लागतो. जग म्हणते कीं पुरुषाच्या मानधनवैभवाची स्त्री वाटेकरीण असते, कारण स्त्री ही पुरुषाची छाया असते. पण आजकालचे पुरुष ह्या नियमाला अपवाद ठरू पहात आहेत. डोहाळ्याची गोष्ट बोलायची झाली तरी देखील जे डोहाळे आपणाला अवकाळाचे दिसतात, तेच

मला सुकाळाचे दिसतात. आजचा काळ पुरुषांनीं घरकोंबडे बनून बसण्याचा नाहीं, पुरुषांनीच काय पण बायकांनींसुद्धा आज स्वदेश व स्वधर्म यांचा जयजयकार करीत पराक्रमी पेशव्यांनीं हातीं घेतलेल्या हिंदुपदपादशाहीच्या परममंगल कार्यांचे साफल्य करण्यासाठी घराबाहेर पडले पाहिजे, असा बोध आपण माझ्या डोहाळ्यापासून कां नाही घेत ? पराक्रम करून आपले व आपल्या देशाचें दैन्य दूर करता येईल तेव्हा येईल वाचेने तरी अशा पराक्रमाच्या शुभ गोष्टी आपण का बोलू नये ? "

राधा स्वभावत फार सालस होती ती वडील माणसाच्या देखत अशी ताठरपणानें कधीच बोलत नसे पतीला एखादी समजुतीची गोष्ट सांगावयाची झाली तरी ती एकांतात सांगे कृष्णरावाला मात्र दोन माणसांदेखत बायकोला टाकून बोलण्याची खोड होती ते त्याच्या अंगचे पाणी आजही बाहेर आले म्हणून बळिराम व देवकी याना मोठासा अचंबा वाटला नाहीं, पण राधा आज इतक्या उघडपणे त्याला टाकून बोलली याचे मात्र त्या तिघानाही आश्चर्य वाटले त्या आश्चर्याच्याही तिघांच्या तीन परी होत्या बळिरामाला नुसतें आश्चर्यच वाटलें व काहींसे कौतुकही वाटले देवकीला त्यात थोडासा सुनेचा उपमर्दकारक फटकळपणा दिसून आला कृष्णरावाला तर बायकोने आपला वडवडीत अपमान केला असे वाटले जात्याच त्याचा स्वभाव अत्यंत तापट लहानपणापासून तो कधी नाकावर माशीदेखील बसून घेत नसे तो बायकोचा वरचष्मा थोडाच सहन करणार ! त्यात आणखी राधेनें आपल्या आयायातील काहीं नाजुक गोष्टींचा वारवार उडता उल्लेख केला, तो तर केवळ टोमणेवजा होता वास्तविक आपल्या पतीवर आपला वरचष्मा असावा ह्या भावनेने काही राधा बोलत नव्हती पण चोहोबाजूनी अपमानानी भाजलेल्या कृष्णरावाच्या विकारवश मनाला तसे वाटलें तो एकदम उसळून रागारागानें म्हणाला, " ह ! तोंड आटोप ती जिभली जास्त चुरचुर करू लागली तर ती मला काद्यापासून उपटून काढावी लागेल "

संतापाला डोळे नसतात असे म्हणतात ते खोटें नव्हे राधाही कृष्णरावाप्रमाणेच संतापली होती ती कृष्णरावाच्या संतापाला न जुमानता पूर्ववत आवेशानें म्हणाली, " मर्दांनी आपली मर्दुमकी दाखवायची ती बायकाची मुस्कटदाबी करण्यात दाखवू नये, समरांगणावर शत्रूशी झगडण्यात दाखवावी. बायका काय, पुरुषाच्या सत्तेच्या गुलाम असतात. त्या बिचाऱ्या तुम्हा पुरुषाच्या गोठ्यातल्या मुक्या गाई ! असल्या मुक्या गाईंना गाजणाराना वीर म्हणत नाहींत, कसाई

म्हणतात. आजवर हा जाच मीं सहन केला, पण आतां तो मला सहन करवत नाहीं बरें ! घरच्या बायकांचे काळ सारेच पुरुष असतात; म्हणून कांहीं जग त्यांना भले म्हणत नाही, सांगून ठेवते ”

“ अजून तुझी टकळी बद होत नाहीं ? थांब—” असें म्हणून कृष्णराव आवेशातिरेकाने मुठी आंवळीत लाथ उगारून दातओठ खात राधेवर धावला बाळिराम व देवकी तेवढ्यात मध्यें पडलीं म्हणून बरें, नाहींपेक्षा कृष्णरावाची लाथ नेमकी राधेच्या उदरावरच बसावयाची

‘ कृष्णा ! कृष्णा ! हें काय असे वेडयासारखें करतोस ? राधा असें का बोलते याचा तू काही विचार केलास का ? ” बाळिरामाने कृष्णरावाला मिठी मारून आवरीत विचारले देवकीनेही त्याची परोपरीनें समजूत करीत राधेला आपल्या पाठीशीं घातले क्षणभर राधाही काही बोलली नाही कृष्णरावाला तेवढे काहीं क्षण विचार करावयाला मिळाले तेवढ्या तुटपुंज्या वेळात त्याला राधेच्या कळकळीच्या बोलाचा यथावत् अर्थ कळणे जरी शक्य नव्हते, तरी राधा गर्भारशी आहे ह्या गोष्टीचा उल्लेख देवकीच्या तोंडून झाला तेवढ्यावरून आपण लाथ मारण्याचा अविचार केला नाही हे बरें केले असे मात्र त्याला वाटलें

“माझ्या सरळ बोलण्याने जर आपणाला इतका अपमान झाल्यासा वाटला, तर मी आजवर माहेरीं असे अपमान व भलभलते आरोप ज्याच्या त्याच्या तोंडून पावलोपावलीं कसे बरें सहन केले असतील ! घरचे जर पुरुष खंबीर असतील तर असे कशाला होईल ! ” मानखंडित राधेनें स्फुंदत स्फुंदत विचारले ती आणखीही बोलली असती पण पुन्हा हे नवराबायकोचें भांडण निकरावर येऊ नये म्हणून देवकीनें राधेच्या तोंडावर हात ठेवून तिला गप्प केलें व तिच्या दंडाला धरून तिला घरांत नेलें

इतक्यात बाहेरूनच कोणीशी ‘कृष्णराव !’ हाक मारली, अशी ती हाक सर्वांनीं ओळखली. ती कोन्हेररामाची होती कोन्हेरराम हांक मारीत मारीत थेट आत आला तो आल्यामुळें सर्वांनाच आपल्या घरगुती भेंडणावर पडदा टाकावा लागला

## प्रकरण चवथें

# पूर्ववृत्ताचा धागादोरा

कुचक्राच्या ह्या एकंदर प्रकाराविषयीं समजूत पडण्यासाठीं बळिराम, कृष्णराव, कोन्हेरराम, देवकी, राधा वगैरे मंडळींचे परस्परसंबंध एथें निवेदन करणें अवश्य आहे. गोविंदपंत खेर व बळिराम आणि कृष्णराव चांदोरकर हे दोघे बंधु ही कऱ्हाडे मंडळी रत्नागिरी जिल्ह्यांतील नेवरे गांवची राहाणारी § त्यांचा एकमेकांचा

---

§ गोविंदपंत (खेर) बुंदेले, उपरोक्त चांदोरकर व कोन्हेरराम आणि भास्करराम हे दोघे कोल्हटकर बंधु ह्या सर्वांना इतिहासाच्या दृष्टीनें फार महत्त्व आहे. यास्तव त्यांचा थोडासा ऐतिहासिक परिचय वाचकांना एथें करून देणें इष्ट आहे. पैकीं गोविंदपंताचा परिचय पेशवाईमधील यापूर्वीच्या 'पेशवाईचा पुनर्जन्म', 'पेशवाईचें पुनर्वैभव' व 'पेशवाईचा दरारा' ह्या तीन कादंबऱ्यांतून वेळोवेळीं झालाच आहे. **चांदोरकर** घराण्याचा यापूर्वीचा इतिहास दुर्दैवानें उपलब्ध नाहीं. पण पुढच्या इतिहासावरून त्या घराण्याच्या पूर्वेतिहासाची कल्पना करणें वावगें होणार नाहीं. या कऱ्हाडे घराण्यांत **विसाजी कृष्ण बिनीवाले** हा लोकोत्तर नरवीर अवतरला. याच्या बाळपणाचा इतिहास उपलब्ध नाहीं. पण बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे यांच्या कारकीर्दीत विसाजीपंत खरे चमकूं लागले. पेशव्यांनीं त्यांचा पराक्रम ओळखून त्यांना इ० सन १७५० मध्यें नेमणूक करून दिली. इ० सन १७५७ मध्यें कडपा येथें कर्नाटकच्या नबाबाशीं पेशव्यांचें जें तुंबळ युद्ध झालें त्या युद्धांत विसाजी कृष्ण यांनीं विशेष मर्दुमकी गाजवून नबाबाला भारतीर्थी पाठवून यश संपादन केलें. इ० सन १७६० मध्यें त्यांनीं कर्नाटकांत फुलचरीकर फ्रेंचांशीं जीं कारस्थानें केलीं तीं त्यांच्या अपूर्व मुत्सद्देगिरीची साक्ष देतात, व तेव्हां कर्नाटकांत पेशव्यांच्या वतीनें राजकारण करणाऱ्या मराठा सरदारांत हे अग्रणी होते असें ठरतें. पुढें इ० सन १७६१ मध्यें पानपतचा घनघोर रणसंग्राम झाला, तेव्हां मागें महाराष्ट्राचा बंदोबस्त राखण्याचें जबाबदारीचें काम विसाजी कृष्णांनीं आपल्या शिरावर घेऊन यशस्वितेनें पार पाडलें. पुढें याच विसाजीपंतांनीं भरतपूरच्या जाटांना जरब देऊन त्यांजपासून ६५ लक्ष रुपये खंडणी वसूल केली. दिल्लीच्या बादशहाला अंकित करून घेऊन मराठ्यांच्या झेंड्याखालीं आणण्याचें व

थोडाफार घरोबा होता आज आपण ज्याला गोविंदपंत म्हणतों, तो गोविंदपंत प्रथम कोंकणातून वरघाटी आला तेंव्हा गोविंदा खेर ह्या एकेरी नावानेच दिल्लीच्या किल्ल्यावर मराठ्याचे विजयी निशाण फडकवण्याचें कार्य विसाजीपतांनींच इ० सन १७७३ मध्ये तडीला नेले मराठयाच्या सैन्यात याची योजना बिनीवर म्हणजे आघाडीवर होत असल्याने त्याचे पूर्वीचें 'चादोरकर' हे उपनाम बदलले जाऊन त्याना बिनीवाले असे नवीन उपनाम प्राप्त झाले याच नांवानें त्याचे वशज सध्यां महाराष्ट्रात नादतात पेशवाईत जे काहीं ब्राह्मण सरदार आपल्या पराक्रमानें चागले उदयाला आले व अपूर्व राष्ट्रकार्य करू शकले, त्यात विसाजीपत अग्रगण्य होत. (इतिहाससग्रह) प्रस्तुत कथानकात कृष्णराव व राधा हें जें दपत्य दाखविले आहे. त्या दपत्याच्या पोटीच विसाजीपताचा जन्म झाला. कोल्हटकर हे घराणेही अत्यत पराक्रमी असेच होते 'रत्नागिरीजवळ नेवरें येथें रामाजीपंत कोल्हटकर नावाचा एक कोकणस्थ ब्राह्मण राही त्याला कोन्हेरराम व भास्कर‌राम असे दोन पुत्र होते त्यानें पुढें वाई प्रातात पाडवगड येथें वतन संपादन केले पाडवगडाहून नेवऱ्याला येण्याची वाट कोयना काठानें दक्षिणेस वहिरवगडापावेतों जाऊन तेथून पश्चिमेला चिपळूण-वर उतरत असे वहिरवगडाच्या खालीं बापूजी, साबाजी व परसोजी हे भोंसले बंधु रहात असून त्याच्या घरीं रामाजीपताचा मुक्काम होऊन उभयताचा परिचय जडला एकदा जजिरेकर हबशानें वहिरवगडावर स्वारी करून भोसल्याना कुटुंबा-सह पकडून जजिऱ्यावर नेऊन ठेविले तेंव्हा त्याच्याबद्दल तीन हजार रुपये दड रामाजीपतानें पदरचा भरून भोसल्याची सुटका केली त्यावरून भोंसल्यानी आपले उपाध्येपण रामाजीपताच्या वंशाला कायमचे लिहून दिलें'. असे इतिहास सांगतो शाहू महाराजाकडेही रामाजीपताचा प्रवेश असल्यानें भोसलेबधु महा-राजाना मिळाले विठ्ठल कान्हो ठोसर म्हणून महाराजाच्या लोभातील एक गृहस्थ साताऱ्याला होता, त्याला महाराजांनीं आपली वाकनिशी दिली होती ह्या विठ्ठल-पंताची एक मुलगी महाराजापाशीं वाढलेली होती, तिचा विवाह महाराजानीं रामाजीपंताचा मुलगा कोन्हेरराम याच्याशी करून दिला होता रामाजीपंताचे दोन्ही पुत्र पराक्रमी होते पण त्याच्या पराक्रमाचा उपयोग पेशव्याच्या व मराठ-शाहीच्या हितशत्रूना पोषक अर्थात् पेशव्याना व त्याच्या राज्यकारभाराला मारक असाच झाला तो ऐतिहासिक वृत्तान्त पुढें ओघाओघानें पेशवाईवरील कादबऱ्यां-तून येईलच

आला होता शिवाय दारिद्य ही अशी विचित्र नापदायक पण प्रभावशाली शक्ति आहे कीं, त्या शक्तीच्या उदरीं दुःखाचा जन्म होऊन तीं दु.खें जरी लोकाना फार गाजतात, तरी त्या दुःखाच्या आचेमुळेंच जवळजवळची समदुःखी माणसे जी आपल्या चालत्या काळात कोणी कोणाला विचारण्याला तयार नसतात तीही पडत्या काळात एकमेकाविषयीं सहानुभूति दाखवूं लागतात गोविंदपत आणि बळिराम, कृष्णराव ह्या दोन्ही घराण्याना निसर्गाचा हा नियम बहुतांशीं लागू पडण्याजोगा होता जेव्हा नेवरे येथे त्या दोघाचाही चालता काळ होता, तेव्हां दोघानींही एकमेकाना फारसें विचारले नाही पण पडता काळ प्राप्त होताच परदेशीं जाऊन नशीब काढण्याची कल्पना प्रथम गोविंदपताच्या डोक्यात आली व ती त्याने बळिराम आणि कृष्णराव याजपाशीं स्नेहभावाने बोलून दाखविली, तेव्हा सर्वानाच ती रुचली त्यानीं आपल्या परिवारासह आपल्या मायभूमीचा त्याग करून वरघाटाचा रस्ता गाठला प्रथम गोविंदपताने बाजिरावाच्या सासुरवडीकडून नेवऱ्याच्या बऱ्याोमार्फत वशिला लावून पेशव्यां पाशीं शागीर्दाची नोकरी मिळविली व मग स्वतःच्या ओळखीनें बळिरामालाही पेशव्याचे पूर्वींचे राजाज्ञा आणि कथानकाच्या काळीं पेशव्याशीं विरुद्ध होऊन कोल्हापूरकराच्या प्रधानमडळात सामील झालेले चिमणाजी दामोदर मोघे याच्याकडे पुजाऱ्याची नोकरी लावून दिली बळिरामाने पुजारीपणा करता करता थोड्याच दिवसात पाकशास्त्रात पारगतता मिळवून आपल्या धन्याच्या पदरं आचाऱ्याची बढतीची जागा पटकावली कृष्णरावाला गोविंदपताच्याच ओळखीने बाजिरावाच्या पदरी शागीर्दाची नोकरी मिळाली. अशा प्रकारे त्या दोघाही भावाची अन्नान्नदशा टळली.

गोविंदपंत काय, बळिराम काय किंवा कृष्णराव काय, तिघेही झाकलीं माणके होते तिघेही शरिरानें धट्टेकट्टे, धाडसी, शूर व निस्सीम स्वामिभक्त होते. त्यात य त्यात गोविंदपत व कृष्णराव याच्या शौर्याची, धाडसाची व स्वामिभक्तीची तारीफ करावी तितकी थोडीच होती. ह्या अलौकिक गुणाचा सुदर मिलाफ त्या दोघाच्या. ही ठायीं झाला असल्यानें त्याना आपल्या धन्याची मर्जी सपादन करून नशीब काढण्याचा राजमार्ग सुलभ झाला होता. गोविंदपंत व कृष्णराव याचा पहिला मार्ग जरी शागीर्दपेशाचा होता, तरी बाजिरावांनीं त्याचे गुण ओळखून त्याच्या कमरेला तरवार बाधून त्यांना लढवय्येगिरीचा पराक्रमाचा मार्ग मोकळा करून दिला होता.

बळिराम जरी आजदेखील मोध्याचा आचारी होता, तरी त्यालाही आपल्या धन्याच्या कृपेने मधूनमधून मर्दुमकी गाजविण्याची संधी लाभे, व त्यात त्यानें कित्येकदां शौर्य गाजविल्यामुळे धन्याकडून त्याला बारगिरीही मिळाली होती पण पाकशास्त्रांतील त्याचे नैपुण्य वाखाणण्याजोगें असल्यानें मोघे त्याला नेहमीं रणांगणावर नेण्याऐवजी आपल्या मुदपाकखान्यावर ठेवीत असत

चिमणाजीपंत मोघ्याच्या घरात त्याच्या चुलतबहिणीची एक मुलगी होती. राधेची आई गरिबाच्या पदरी पडल्यामुळे व त्यातही अकाल वैधव्य तिच्या वाट्याला येऊन लगेच देवाघरचे बोलावणे आल्यामुळे राधेचे पालनपोषण करण्याला कोणीही घरचें माणूस उरले नाही व ईश्वरी योगायोगानुसार चिमणाजीपंतावरच राधेच्या पालनपोषणाची जबाबदारी येऊन पडली राधा लहानपणापासूनच चोकस, बुद्धिमान्, सशक्त व नाकाडोळ्यांनीं ठसठशीत अशी होती तशात ती अनाथ म्हणून काहींशी परकेपणानेच मोघ्याच्या घरात बाळपणापासून वागविली गेल्याने तिला दळणकांडण वगैरे अवघड काम याचीही सवय होऊन त्या सवयीचा तिच्या शरीरसवर्धनाकडे चांगलाच उपयोग झाला होता वास्तविक तेव्हाच्या देशकालपरिस्थिती प्रमाणे राधेचे लग्न तिच्या वयाच्या सातव्या अगर आठव्या वर्षींच व्हावयाचे, पण तिच्यात जन्मतःच एक वैगुण्य होतें- तिच्या शरीरावर गळ्याखालीं श्वेतकुष्ठ होते, त्यामुळे तिच्या लग्नात अडथळे येत. पुढें बळिराम मोघ्याकडे नोकरीला राहिला तेव्हा त्याला राधा देऊन टाकावी असा मोघ्यानीं एकदा बेत केला होता. पण घरच्या शागीर्दाला ही मुलगी देणे मोघ्याच्या घरच्या मंडळीला कमीपणाचे वाटले त्याच वेळी कृष्णराव पेशव्याकडे नोकरीला होता त्याला राधा द्यावी असे सर्वानुमत ठरले देवकीबाईला—कृष्णराव व बळिराम याच्या आईलाही ही सून मान्य झाली, याचे कारण तिच्या पडत्या काळात तिला एरव्ही एवढ्या थोरामोठ्याचा अशा प्रकारचा आश्रय कोठला लाभावयाला ! दुसरे असे कीं, प्रथमच मुलाला मुलगी सांगून आली ती लक्ष्मीच चालून आली, तिला मागें परतविणे योग्य नाही, असाही विचार देवकीने केला व ह्या संबधाला मान्यता दिली आता, लहान मुलाचे लग्न ठरले व मोठा मुलगा लग्नाचा राहिला म्हणून देवकीला वाईट वाटले पण परिस्थितीसमोर ती तरी काय करणार ! आणखी एक गोष्ट हा राधा कृष्णाचा शरीरसंबंध जुळण्याला कारण झाली ती अशी कीं, देवकीची रुक्मिणी नावाची एक पुतणी अत्यंत रूपवान होती व तिच्या कुंडलीवरून

मोघ्याच्या विश्वासातील रामाजीपंत ऊर्फ रामशास्त्री कोल्हटकर या नावाच्या एका ज्योतिष्यानेच तिच्या दैवीं राजयोग असून तिचें ज्याच्याशीं लग्न होईल त्याला त्या राजयोगाचा लाभ होईल असें भविष्य वर्तविलें होतें रामशास्त्री हे शाहूमहाराजांच्या लोभातील असल्याने त्याच्या शब्दाला सर्वत्र फारच मान होता शिवाय ते ज्योतिषी! राधेच्या पालनपोषणाचा भार जसा योगायोगानुसार मोघ्यावर येऊन पडला, तसाच रुक्मिणीच्या पालनपोषणाचा भार देवकीवर येऊन पडला असल्यानें रुक्मिणीच्या लग्नाची जबाबदारीही तिच्यावरच येऊन पडली अशी रूपसुंदर व भाग्यशाली मुलगी आपल्या घरात पडावी, आपल्या एकुलत्याएका बळवंतराव नावाच्या पुत्राची पत्नी व्हावी अशी चिमणाजीपंताना इच्छा झाली कोल्हटकर शास्त्रीबुवानी कोन्हेरराम आणि भास्करराम आपल्या ह्या दोन्ही पुत्राचा भाग्योदय मोघ्यासारख्या मातबराच्या हातून करून घ्यावा ह्या अर्थलाभाच्या अपेक्षेने देवकीपाशीं चिमणाजीपंत मोघ्याची थोरवी गाऊन बळवंतरावाला रुक्मिणी द्यावी असे तिचें मन वळविलें त्यासाठी मोघ्याना सांगून राधा कृष्णरावाला देऊ केली व गोमती-बाईनेही आनदाने ह्या उभयविवाहाबद्दल मान्य केला दोन्ही वधूवराच्या पत्रिका पाहून जमवून देण्याचे कार्य रामशास्त्र्याच्या खास नेतृत्वाखालीं पार पडल्यावर हे सर्व जुळून येण्याला कितीसा उशीर! ह्या निमित्तानें झाल्या त्या गोष्टी सर्वांच्याच मनाजोगत्या झाल्या फार काय, राधेचें नशीब किंवा कृष्णरावाचें नशीब म्हणावे पाहिजे तर! इतके जोरावर की, नेमकेच एका साधूनें राधेला आपले उपचार केले, त्यांनीं तिचा कुष्ठरोगही पार गेला देवकीला आपल्या घराण्याचा संबंध मोघ्यासारख्या मातबराच्या घराण्याशी जुळला व त्यामुळे आपल्या घराण्याचा भाग्योदय होण्याचा मार्ग मोकळा झाला म्हणून संतोष, अप्सरेसारखी सुंदर व अत्यंत भाग्यशाली सून आपणाला मिळाली आणि आपल्या पदरची अनाथ राधा गरीब पण पराक्रमी कृष्णरावाच्या पदरीं पडली म्हणून मोघ्याना संतोष, आणि हे दोन लग्नसंबंध जुळवून आणण्याचे श्रेय पदरीं पडले म्हणून रामशास्त्र्याना संतोष! रामशास्त्री मोठे धोरणी व पाताळयंत्री होते त्यानीं ह्या निमित्तानें परहिताच्या पांघरुणाखालीं आपलाही स्वार्थ साधून घेतला आपल्या दोन्ही पुत्राचें कल्याण त्यानीं ह्या निमित्तानें साधलें, मोघ्याच्या वतीने कोल्हापूरकर छत्रपतींकडे व पेशव्याच्या वतीनें सातारकर छत्रपतींकडे याप्रमाणें दोन्हीकडे आपल्या दोन्ही पुत्रांचा चांगला जम त्यांनी जमवून देऊन त्याच्या भाग्योदयाला योग्य अवसर मिळवून दिला

पुढे कालांतराने सृष्टीच्या नियमाप्रमाणे रामशास्त्र्यांचे दोन्ही पुत्र आपापल्या परीनें पुढे येऊ लागले त्या दोघांही बधूच्या स्वभावांतील विशेष सांगावयाचा तो हा की, त्याचा ओढा प्रथमपासून कोल्हापूरकराकडे म्हणजे शाहूमहाराज व पेशवे यांच्या प्रतिस्पर्ध्यांकडे होता व त्यांची वृत्ति नेहमींच दुर्योधन शकुनीसारखी नाग मोडीची असे कोन्हेररामावर शाहूमहाराजांचा व म्हणूनच बाजीराव पेशव्यांचाही लोभ, म्हणून तो बाह्यतः जरी ह्या पक्षाला चिकटून राहिला होता, तरी त्याने आपल्या अंगच्या चतुराईने शाहूमहाराज व पेशवे ह्या उभयतांच्याही अतःपुरापर्यंत आपला जम बसविला होता पेशव्यांच्या राजस्त्रियांचा तर कोन्हेररामावर एवढा जबरदस्त विश्वास बसला होता की, त्याचे त्याच्याशिवाय पानही हालत नसे इतका शाहूमहाराजांच्या व पेशव्याच्या अत पुरांत त्याचा जम बसण्याला त्याला त्याच्या बायकोचा फारच उपयोग झाला होता ती शाहूमहाराजाच्या आश्रिताची मुलगी असल्याने व महाराजाच्या शिफारशीनेच ते लग्न झाले असल्यानें ती महाराजाची धर्मकन्या व कोन्हेरराम हा त्याचा जावई असे नाते ओघानेंच जुळले होतें पेशव्यापाशीं कोन्हेररामाला व त्याच्या बायकोला जो थोडाफार मान मिळे, तो यामुळेच कोन्हेररामाची बायको कावेरीबाई फारच चतुर व पाताळयंत्री स्त्री होती तिने पेशव्याच्या अतःपुरात येताच प्रथम काशीबाईचे कान फुंकून सवतीमत्सराचें पिशाच तिच्या डोकाडीं बसविले, व त्या पिशाचाला आपल्या अंगच्या चतुराईनें चांगलेंच वश करून घेऊन काशीबाई आणि मस्तानी यांना परस्पराच्या वैरिणी बनवून सोडलें मस्तानी व काशीबाई यांच्यातील सवतीमत्सर जोपासून काशीबाईवर तिनें आपली चांगलीच छाप ठेविली होती, आणि इकडे कोन्हेररामाने बाजीराव आणि चिमाजीअप्पा यांची मर्जी संपादन करून मस्तानीसमोरही वारवार गोंडा घोळण्याचा क्रम अव्याहत सुरू ठेविला होता पण ह्या दंपत्याचें अतरंग एक व तोंही जसे दिसे त्याहून अगदीं निराळें होते ते किती व कोणत्या परीनें निराळे होतें याचा कोणालाही थांगपत्ता नव्हता कोन्हेररामाने मस्तानीच्या बाबतींत बाजिरावांचा असा ग्रह करून दिला होता की, आपण मस्तानीचे खरे हितचिंतक असून अंत.पुरांतील बखेडे मोडण्यासाठीं जिवापाड झटत असतांना इकडे मस्तानी व तिकडे काशीबाई वगैरे मंडळी आपणाविषयीं उगाच संशय घेतात! ‘बायकांची जात संशयी असावयाचीच’ असा बाजीराव आपल्या मनाचा विरगुळा करून कोन्हेररामाचीही समजूत करीत व त्याच्या ह्या भोळ्या भावाच्या कृपाछत्राखालीं कोन्हेररामाचे डावपेंच बिनबोभाट

चालत. कोन्हेररामाचा धाकटा भाऊ भास्करराम हा पुढें बाजिरावाच्या रोषाला पात्र झाल्यामुळे पुण्यात पृथक् राहून कोन्हेररामाशीं फारसा संबंध ठेवीत नसे. पण ही झाली जनातली गोष्ट, मनात दोघेही एकच होते

कृष्णरावाचे राधेशीं लग्न होऊन तो मोघ्याचा जावई झाला, तेव्हा तो पेशव्याचा नोकर होता ह्या लग्नानंतर आपल्या जावयाचे कल्याण करावयाच्या हेतूने मोघ्यांनीं कृष्णरावाला आपल्या पदरीं आश्रय देऊ केला व कृष्णराव प्रथम ह्या मोहाला बळी पडून मोघ्याच्या पदरीं गेला त्याला वाटले कीं, आपण ज्या अर्थीं मोघ्यांचे जावई झालों आहों व आपली बहीण ज्या अर्थीं मोघ्याची सून झाली आहे, त्या अर्थीं आपणाला आपल्या मानाला धक्का न लागता मान्यता व वैभव संपादन करून सासुरवाडीच्या जिवावर नशीब काढता येईल पण लौकरच त्याचा तो निव्वळ भ्रम ठरला त्याची बहीण मोघ्याची सून झाली, ती बहीण भावंडाचें नातें विसरून कांहींशी मालकिणीच्या तोऱ्यात वागू लागली, व त्या घरात राधेला माहेरवाशिणी-चा मान न मिळतां एका अनाथ मुलीप्रमाणे तिची संभावना होऊं लागून तोच न्याय कृष्णरावाच्याही बाबतींतही लागू होऊ लागला कृष्णराव पेशव्याना सोडून मोघ्यांकडे गेला तो पेशव्याचे मन दुखवून गेला होता पण जेव्हा सासुरवाडीचा कटु अनुभव घडोघडीं त्याला येऊं लागला, तेव्हा त्याच्या मानी स्वभावाला तें सहन न होऊन तो मोघ्याचा आश्रय सोडून पुन्हा पेशव्याच्या पदरीं आश्रय मिळविण्याच्या इरादानें आपल्या मातुःश्रीसह पुण्याला आला पुण्यात त्याची ओळख-देख फारशी नव्हती, त्यामुळें मोघ्यांकडून रामशास्त्र्याना बक्षीस मिळालेल्या तेथल्या एका घरांत भास्करराम राही, त्याच घराच्या एका पडवींत कृष्णरावानें आपले बिऱ्हाड थाटले होतें ही बिऱ्हाडाची मांडामांड होईतों त्याने राधेला तिच्या माहेरीं साताऱ्यालाच ठेविलें होतें राधेला माहेरीं ठेवण्यांत त्याचा आणखी उद्देश असा होता कीं, ती गरोदर होती, तेव्हा पहिल्याच गर्भारपणांत आपल्या दरिद्र्याच्या संसारांत तिची आबाळ व्हावयाची त्यापेक्षा ती तिकडे सुस्थळीं असलेली बरी जनरूढीप्रमाणे पहातां देखील राधेचें हे पहिले बाळंतपण माहेरींच होणे रास्त होतें. बिन् ऐपतदार असे मुलींचे बाप देखील कर्ज काढूनसुद्धा हा प्रसंग आवडीनें साजरा करतात; मग मोघ्यांसारख्या ऐपतदारांनीं तसें केलें तर त्यांत कांहीं नवल नव्हतें

राधा लग्नाची होती तेव्हां भास्कररामही लग्नाचा होता. व्यंगामुळें राधा उपवर

होईपर्यंत लग्नाची राहिली तेव्हा भास्कररामही लग्नाला झालेला—नव्हे होऊन गेलेला नवरदेव होता पण भास्कररामाच्या घरची मोठीशी दौलत वाया जात होती अथवा रामशास्त्री कोणी मोठे हुद्देदार लौकिकवान् पुरुष म्हणून सर्वांत मानले जात होते अशातला काहींच प्रकार नसल्यामुळें भास्कररामाला लग्नाचा नवरदेव म्हणून ओळखण्याला समाजातील मुलींच्या बापाची फारशी तयारी नसे. त्यातूनही तो स्वत तरी रीतीनें वागणारा असता तर गोष्ट निराळी होती मग एखादा गरीबसा मुलीचा बाप त्याला आपली मुलगी देण्याला एखादे वेळीं तयार झाला असता, किंवा महाराजासारख्या मोठ्या माणसानी लोभामुळे एखाद्या मुलीच्या बापापाशी आपला शब्द खर्च करून ते लग्न जुळवून आणले असते. कोन्हेर रामाचें लग्न महाराजानी असेच जुळवून दिले होते पण सज्जनाना अशी सहानुभूति वाटण्याजोगे भास्कररामाचे गुण कुठे वड होते? आपले लग्न होत नाही असें त्यानें पाहिले, तेव्हा व तो उपवर झालेल्या राधेलाही पहात होता त्याची इच्छा तिच्याशी लग्न करण्याची होती राधा तेव्हाच्या काळाच्या मानानें तेव्हा गळ्याला लागलेली घोडनवरीच होती चौदा वर्षांच्या वयाच्या मानानें तिला समाजाच्या अंतरंगाची ओळख तेव्हा फारशी झाली नसली तरी संसार व संसारातील विविध नातीं ती चांगली ओळखू लागली होती तिच्याबरोबर किंवा तिच्या नंतर जन्म पावलेल्याही बऱ्याच मुलींचीं लग्ने होऊन त्यांचे सासरमाहेर सुरू झालेले व त्या नवसौभाग्या-च्या तोऱ्यात वागू लागलेल्या पाहून राधेला वाटे कीं, आपल्याच कपाळी हे सुख नाही, व ते आपल्या ठायीं जन्मजात रोगाचे वगुण्य आहे म्हणून राधेला ह्या मनाच्या टोचणीबरोबरच जनाची टोचणीही सहन करावी लागत होती अपमान, उपहास व विटंबना तिला तेव्हा घरात व घराबाहेरही किती सहन करावी लागे याला अतच नव्हता त्या सर्व दुर्भोगाचा इत्यर्थ तिनें एवढाच घेतला होता की, 'आपणा-ला आजन्म अविवाहितपणाच्या अज्ञातवासात कुजत पडावे लागणार! फुकट आपला जन्म!'

राधा आवडली म्हणूनच केवळ नव्हे, तर लग्नाच्या बाबतींत हरघडी निराशा पदरीं पडल्यामुळे भास्करराम राधेशीं लग्न करण्याची इच्छा करू लागला त्याच्या दृष्टीनें ही निवड काही चुकली नव्हती राधेला पति मिळेना व त्याला पत्नी मिळेना, मिळून दोघेही समदु खीच होती त्यानें आपला हा विचार राधेच्या मनावर कसा बिंबविला, नकळे! पण लग्नाच्या आशेला आलेल्या

राधेला तो विचार बराच पटला. यौवनानें उमललेलीं अंतःकरणे अशा वेळीं क्षुल्लक जातिभेदाची थोडीच पर्वा करतात ! पण त्यांनी पर्वा केली नाहीं तरी इतर वडील मंडळी अनुकूल असल्याशिवाय त्यांचें काय चालणार ! सुदैवानें राधा व भास्करराम यांचा हा प्रेमसंबंध आणखी कोणाला माहीत होण्यापूर्वीच रामशास्त्र्यांना माहीत झाला. त्या दोघांच्या वर्तणुकीतील कांहीं लक्षणे रामशास्त्र्यांना ठीक दिसलीं नाहींत, त्याबरोबर त्या धूर्त म्हाताऱ्यानें नानापरीच्या घालमेली करून राधेचें कृष्णरावाशीं लग्न जुळवून दिलें व अखेरपावेतों आपणाला ह्या गोष्टीचा सुगावा होता अशी ओझरती जाणीव देखील कोणाला होऊं दिली नाहीं. याप्रमाणे राधा कृष्णरावाची धर्मपत्नी झाल्यावर लगेच तिची मनोवृत्ति बदलली व त्या दिवसापासून ती भास्कररामाला आपल्या वडील भावाप्रमाणे मानू लागली. मूळपासून ती आचारविचारांनी बहकलेली नव्हतीच. भास्कररामाशीं तरी ती जी लग्न करावयाला तयार झाली होती ती केवळ मोठ्या वया पर्यंतही लग्न होईना ह्या लाजेमुळे, व भास्करराम तेव्हा तरी तिला बराच सज्जन वाटे म्हणून. यांत तिनें मोठासा अन्याय केला होता असें नाहीं. आता, भास्कर रामाला सज्जन मानण्यात ती प्रथमच फसली होती खरी. पण तिच्या परिस्थितीत दुसरी कोणी एखादी कुमारिका असती तर तीही तशीच किंवा त्याहूनही जास्त फसली असती. मात्र राधेचें भास्कररामाशीं लग्न न होतां कृष्णरावाशीं झालें व त्यानंतर भास्कररामाचें खरें स्वरूप तिला कांहींसें जनापवादांतून व कांहीं स्वानुभवावरून कळून आलें. राधा ती स्वतः परस्त्री होताच भास्कररामाला आपला सख्खा भाऊ मानू लागली, पण भास्कररामाच्या ठायीं परस्त्रीचा अभिलाष न करण्या-इतकें सौजन्य कोठें होतें ! त्यानें राधेविषयींची पापवासना मुळींच सोडली नाहीं. इतकेंच काय, पण राधा आपल्या पतिव्रताधर्माला अनुसरून त्याचा प्रतिकार करूं लागली तेव्हा तो तिच्यावर शक्य त्या राक्षसी उपायांनीं सूड घ्यावयालाही तयार झाला. राधेचें लग्न झाल्यावर थोड्याच दिवसांनी रामशास्त्र्यांच्या खटपटीनें भास्कररामाचेंही लग्न झालें, पण त्याची राधेविषयींची पापवासना कांहीं दुरावली नाहीं. त्याच्या दुष्ट वासनांचा बोभाटा होतां होतां इतका झाला कीं, राधेच्या माहेरची मंडळीही तिच्या वर्तनाविषयीं भलभलते संशय घेऊं लागली. हा बोभाटा थांबविण्यासाठीं राधेनें हस्तें परहस्तें हे गाऱ्हाणें गुप्तपणें बाजीराव पेशव्यांच्या कानीं जाईं असें केलें, व तेव्हांच भास्करराम शत्रूंना फितूर असल्याचा

पुरावा बाजिरावांना सांपडला, म्हणूनच त्यानी त्याला देशत्यागाची शिक्षा ठोठावली होती त्या शिक्षेचे परिमार्जन करून घेऊन भास्कररामाने स्वतःचा कसा बचाव केला हें आपणाला पूर्वीच माहीत झाले आहे त्यानतर रामशास्त्री वारल्यावर पुण्याला येऊन कायमची वस्ती करून राहू लागला व भास्करराम राधा या विषयावर तात्पुरता पडदा पडला. पण त्या निमित्तानें आजवर त्या विषयाच्या पार्श्वभूमीवर जी कुटिल कारस्थानाची उभारणी एकवार झाली होती ती त्या पडद्यामागें झांकली गेल्यामुळे दिसेनाशी मात्र झाली, ती कायमची नष्ट झाली नाहीं तो पडदा कोणी जरा बाजूला सरकविताच तेच भयाण दृश्य साऱ्या जगाला दिसणें शक्य होतें, व असला अधमपणा करण्याला न कचरणारा भास्करराम राधेच्या कमनशिबाने हयात होता

असे असता कृष्णराव जो पुण्याला आला तो भास्कररामाच्याच आश्रयाला आला याचे कारण एक तर त्याला वरील प्रकाराची गधवार्ताही नव्हती व दुसरें, तो जरी रागारागाने सासुरवाडीहून पुण्याला पेशव्याच्या आश्रयाला म्हणून निघून आला, तरी पण पेशव्यानी त्याला आश्रय दिला पाहिजे ना ! बाकी, पेशव्याकडे कृष्णरावाला आश्रय मिळणें फारसें अवघड नव्हते तो म्हणजे पेशव्यांशीं भांडून अगर नालायक ठरून निघून गेला होता अशांतली गोष्ट नाहीं त्याला सासुरवाडीला जावेसें वाटले व पेशव्यानीं त्याला आडकाठी केली नाही, इतकाच त्याचा अर्थ आता त्यानें भास्कररामामार्फत कोन्हेररामाला दोन शब्द सागवून कोन्हेररामाच्या मध्यस्थीने पुन्हा पेशव्याच्या पदरीं आश्रय मिळविण्याचा उद्योग चालविला होता व कोन्हेररामाने आज दसऱ्याच्या सुमुहूर्तावर त्याची श्रीमंताशीं मुलाखत करून देण्याचे ठरविलें होतें. कृष्णराव एरव्हीं आपण होऊन एकटाच पेशव्यांकडे गेला असता तरीही त्याचे काम खात्रीने झालें असतें, पण त्याला तशी खात्री वाटेना. याचे कारण त्याचे मन त्याला खात होतें, 'न जाणो, आपण स्वतः पेशव्याचा आश्रय सोडून सासुरवाडीला गेलो म्हणून पेशवे आपणावर रागावले तर !' पण वस्तुतः कृष्णरावाचे हें भय अगदी निराधार होते एक तर ठळकपणें त्याची आठवण पेशव्यांना रहावी इतका तो थोर नव्हता, व दुसरे, तो विश्वासाला किंवा कृपेला अपात्र ठरण्याइतका दुर्जनही नव्हता आणखी असें कीं, आज पेशव्यांना सैनिकांची अत्यत वाण भासत असल्यानें महाराष्ट्रांतील कोणत्याही धडधाकट तरुणाला सैन्यांत दाखल होता येई, तिथें कृष्णरावासारख्या पूर्वपरिचिताची दाद लागण्याला कितीसा उशीर !

पण इतका आत्मविश्वास कृष्णराव व देवकी ह्या दोघाही मायलेकराना वाटत नसल्यानें त्यानीं कोन्हेररामाच्या वशिल्यानें आपला कार्यभाग साधून घ्यावयाचें ठरविले होतें त्यांतही कृष्णरावापेक्षा देवकीलाच कोन्हेररामाच्या वशिल्याची विशेष मातब्बरी वाटत होती कोन्हेररामाच्या वशिल्यानें बाजिरावाच्या खासगीकडे कारकून, शागीर्द अथवा शिपायीप्यादा अशी बिन्‌धोक्याची नोकरी कृष्णरावाला मिळावी अशी तिची अपेक्षा होती आपल्या मुलानें पेशव्यांच्या पदरीं अशी साधी नोकरीच पत्करावी असें देवकीला वाटण्याचे कारण तिला कृष्णरावाच्या अंगच्या शौर्याची खरी कल्पना नसल्याने व लढाईत अनेक सैनिक शत्रूकडून मारले जातात एवढेच माहीत असल्याने तिचा कृष्णराव तिला सैनिक व्हावयाला नको होता दुसरे कारण असे की, कृष्णराव जरी आपल्या सासुरवाडीहून भाडून आला होता, तरी पुन्हा भास्कररामामार्फत मोघ्यांपाशी त्याच्याविषयीं गोष्ट काढून त्याला त्यांच्या पदरीं नोकरी लावून देता येईल व मोघ्याच्या कृपाछत्राखालीं त्याचा भाग्योदयही चागला होईल अशी देवकीला अजूनही आशा वाटत होती मोघ्यांपाशीं तोंड वेंगाडण्याचीही सधी वाया जाऊ नये याविषयीं देवकी आपल्या परीनें शक्य तितकी खबरदारी घेत होती पण आपण भास्कररामावर बिश्वास ठेवण्यात चोराच्या हातीं जामदारखान्याच्या किल्ल्या देण्यासारखी भयंकर चूक करीत आहों, याची त्या बिचारीला कल्पनाही नव्हती !

प्रकरण पाचवें

# कोन्हेरराम

"कृष्णराव ! तुझें काम सोळा आणे करून आलों" कोन्हेरराम देवकीच्या सिंहाद्वारांत पाऊल टाकतांच म्हणाला. त्याचे ते आश्वासनपूर्ण उद्गार देवकीने ऐकतांच तिच्या अंगावर जणु मूठभर मांस चढलें.

ती बाहेर येऊन मोठ्या उत्सुकतेनें विचारूं लागली, "पेशव्यांना माझ्या कृष्णाला आश्रय देण्याचें कबूल केलें का ?"

"हो ! मागतो काय तर ?" कोन्हेरराम म्हणाला, "मात्र आतां यानें एक करावयाचें, मी सांगेन त्याप्रमाणें कांहीं दिवस वागावयाचें."

"तो वागेल. तें कां ? त्याला सांगायला नको. तो तुमच्या आज्ञेबाहेर पाऊल देखील टाकायचा नाहीं. तुम्हीं त्याला घोटभर पाणी पिऊन रहा असें सांगितलें तर तो तेवढेंच पाणी पिऊन राहील. कोन्हेरराम ! तुम्हाला वाटतो तितका तो द्वाड नाहीं. पोर आहे, थोडासा हूड आहे, इतकेंच" अशी कोन्हेररामाची स्तुति करीत देवकी बळिराम व कृष्णराव यांच्याकडे वळून म्हणाली, "पहा ! कोन्हेरराम ना आमच्या नात्याचे, ना जातीचे. पण मी शब्द टाकला, त्याचा उपयोग झाला. लोक म्हणतात कीं, चित्पावन लोक मोठे स्वार्थी व धूर्त असतात, ते केवळ निःस्वार्थीपणानें कधींच कोणावर उपकार करायचे नाहींत. पण हा अनुभव पहा !" ती पुन्हा कोन्हेररामाकडे वळून म्हणाली, "मला अनेकांनीं तुमच्याविषयीं अनेक कांयाबेऱ्या गोष्टी सांगितल्या होत्या. पण माझा कांहीं त्या गोष्टींवर विश्वास बसेना. व आतां तर मुळींच बसायचा नाहीं."

"देवकीकाकू ! हें असें चालायचेंच. हें जग आहे. जग हें त्रिविध आहे, हें खरें ना ?"

"हो !"

"झालें तर ! जगाच्या तोंडाला हात कोणीं लावावा ? तुमचा आमचा इतका जिव्हाळ्याचा संबंध आहे हे अनेकांना सहन होत नाहीं. ते आमच्या स्नेहांत बिब्बा घालण्याचा प्रयत्न करतात. पण असल्या गोष्टी आपण मनावर घेतां कामा नयेत. मी सांगतों पाहिजे तर तुम्हाला माझ्याविषयीं कुणीं कुणीं काय काय

सांगितलें असेल तें तुमच्या पुतणीचें लग्न जुळवून देण्याच्या कामीं मीं व माझे वडील अशा दोघानी मिळून मोघ्याकडून पैसे खाल्ले असें तुमच्या कानीं आलें असेल ”

“ अशा कैक गोष्टी कानीं आल्या. पण मी त्यावर विश्वास ठेवीन तेव्हा ना ? ”

“ आणि बहुधा गोविंदा खेरच माझ्याविषयीं तुमच्या कानीं गरळ ओकला असेल ! खरें ना ? ”

“ उगीच नावें सांगून चुगलखोरपणाचे पाप मी कशाला जोडूं ! जे करतील ते भरतील ” देवकी कृष्णरावाकडे वळून म्हणाली, “ तुझा सारे गोविंदावर इतका भरवसा होता, पण गोविंदा कांहीं तुझ्यासाठी आजवर पेशव्याकडे फुकाचा एक शब्द देखील खर्च करू शकला नाहीं ”

“ तुम्ही पेशव्याच्या पदरीं कसली नोकरी लावून देणार ? ” कृष्णरावानें मध्येच विचारलें

“ त्याच्याशीं तुला काय करावयाचे ? मी सांगेन त्याप्रमाणे तू कर म्हणजे झालें आणि हे पहा, गोविंदा येऊन तुमच्याआमच्या लोभात बिब्बा घालण्याचा प्रयत्न करील, तर त्याला दाद द्यावयाची नाहीं हं ! आपलें आर्धी सांगून ठेवतो शक्य तो तशी निकराची वेळ कधीं येऊ नये, पण आलीच तर मी असें सांगत होतों असें माझें नाव कधींच घ्यावयाचे नाहीं ” कोन्हेरराम म्हणाला

‘ इतकें का तुमचें व गोविंदाचे वाकडे आहे ? ’ बळिरामानें विचारलें

तें कांहीं विचारू नकोस चुगलखोरपणात त्याचा अगदीं हातखंडा ’ कोन्हेरराम उत्तरला

‘ पण मला नोकरी कसली लागणार ते सांगा तर खरें ? ” कृष्णरावानें पुन्हा विचारलें.

पुन्हा तेच ! ” कोन्हेरराम अमळ नाखुषीनें चेहरा आंबट करून म्हणाला ‘ तुला त्याच्याशी काय करावयाचे आहे ? ’

याचा अर्थ काय ? नोकरी मला नाहीं तर दुसऱ्या कुणाला करावयाची आहे ? कसली नोकरी ते मला कळावयाला नको का ? ”

“ हे पहा, मी तुला सारे कांहीं सांगतो पण याची कुठेंही वाच्यता होता कामा नये नाहींपेक्षा माझ्या गळ्याला तात लागावयाची आहे का हे कबूल ? ” कोन्हेररामानें विचारलें

आहे कबूल ” कृष्णराव उत्तरला

"सर्वांना कबूल आहे का ?" कोन्हेररामाने पुन्हा विचारलें

"सर्वांना कबूल आहे" बाळिराम व देवकी एकदम उत्तरलीं.

कोन्हेरराम कृष्णरावाला म्हणाला, "तुला नोकरी मस्तानीपाशी करावयाची—"

कृष्णरावाने जरा उतावीळपणाने तिरस्कारपूर्ण स्वरात विचारलें, "ही कसली नोकरी ?"

"अरे ! पण माझें ऐकून तरी घेशील ? प्रथम मला सांग, योद्धा आणि मुत्सद्दी यांत श्रेष्ठ कोण ?" कोन्हेररामाने ऐटीने आसनमांडी घालून बसत प्रश्न केला

"असलीं डावपेचाचीं बोलणी आपणाला कांही कळत नाहीत. सरळ काय बोलावयाचें ते बोला" कृष्णराव म्हणाला.

"बळिराम ! तू सांग पाहूं ! देवकीकाकू ! तू सांग"

"मी बोलूनचालून आचारी मला यात काय कळणार !" बाळिराम भाबडे-पणानें म्हणाला

"त्याना त्यात काय कळणार ?" देवकी म्हणाली

राधा इतका वेळ आतल्या बाजूला मनातल्या मनात घुमसत बसली होती, ती एकदम दरवाजात येऊन म्हणाली, "कोन्हेरराम ! मी देते तुमच्या प्रश्नाचें उत्तर योध्द्यापेक्षा मुत्सद्दी थोर कसा म्हणून नाहीं विचारलेंत ?"

राधेचा हा आकस्मिक प्रश्न ऐकून कोन्हेरराम चमकला भास्कररामाच्या तिच्याशीं चकमकी उडाल्या होत्या त्या सर्व त्याला तेव्हा आठवल्या पण चेहऱ्या-वर त्याचा मागमूसही न दाखविता त्यानें प्रश्न केला, "तें कसें काय ?"

राधा पूर्ववत् मार्मिकपणें उत्तरली, "योद्धा सरळ वृत्तीचा असतो, व मुत्सद्या-च्या वृत्तीला नेहमींच नागमोडी वळणे घेण्याची सवय असते. योद्धा समोरच्या प्रतिस्पर्ध्याशीं उघड उघड स्पर्धा करून शस्त्राचा वार करील, पण मुत्सद्दी एखा-द्याला मित्र म्हणून त्याच्या गळ्यात गळा घालून केंसानें त्याचा गळा कापील. यासाठीच शहाण्यानें मुत्सद्याशीं मैत्री करूं नये. मुत्सद्याशीं मैत्री करणे आणि सर्पाशीं मैत्री करणें सारखें आहे. तुमचें घराणें मुत्सद्याचें आहे तुमच्या रोमरोमात मुत्सद्देगिरी मुसमुसून भरली आहे तुम्ही मुत्सद्दी, तुमचे बंधु मुत्सद्दी, तुमच्या बोलण्यातलि खाचाखोचा आमच्यासारख्या भोळ्याभाबड्या माणसाना कशा कळणार ?"

"राधे! ही तू माझी निंदा करीत आहेस की स्तुति?" कोन्हेररामाने सशयास्पद स्वरात विचारलें

"वा: ! तुम्ही तर चागले आमचें कल्याण करायला आला आहा! तुमची मी निंदा बरी करीन!" राधा किंचित् ओंठ चावीत उत्तरली

राधेच्या एकदर सभाषणाचा ओघ तोंड दाबून बुक्क्याचा मार दिल्याप्रमाणे होता तिचा प्रत्येक शब्द नागमोडीचा असून त्या नागमोडीच्यामागे अत्यत गूढ असा अर्थ भरलेला होता देवकीला तें आवडले नाहीं ती म्हणाली, "सुनबाई! आपण मध्यें असें बोलू नये"

राधा सासूच्या शब्दाला मान देण्यासाठी गप्प राहिली कृष्णरावालाही तिचा राग आला होता व तिला तो काहीं तरी टाकून बोलणार असे त्याच्या हलणाऱ्या ओंठावरून दिसत होतें पण देवकीच्या शब्दाने तो कार्यभाग झाल्यामुळें त्याला बोलण्याचें कारण पडलें नाही त्याने कोन्हेररामाला विचारले, "बरें, आता तरी सागा, मीं मस्तानीच्या पदरी नोकरी कसली करावयाची?"

"खरें सांगू?" कोन्हेररामानें गालातल्या गालात जरा हसत विचारलें.

"खरेंच सागा" कृष्णराव म्हणाला

"खरे सागायचें तर असल्या बडया माणसाच्या पदरी आमच्यासारख्या पोशाखी नोकराना काहीच काम नसते उलट इतर दुय्यम दासदासी आपली सेवा करावयाला उपयोगी पडतात नोकरी केवळ नावाची असते खुशाल ऐषआरामात दिवस कठावे"

"पण मी ऐषआराम भोगण्यासाठी हपापलेला नाही मला नोकरीवर नशीब काढावयाचें आहे त्यासाठीं कितीही यातना भोगाव्या लागल्या तरी त्या भोगण्याला माझी तयारी आहे"

"तुला नशीब काढावयाचे आहे, व मी मेलेले अन्न खाऊन जगण्यासाठीं जन्माला आलो आहें असे तुला वाटते की काय?" कोन्हेरराम किंचित् स्वाभिमानपूर्वक म्हणाला, "बाबारे! माझ्या महत्त्वाकाक्षा एवढया जबरदस्त आहेत की, त्याच्या भरारीपुढें गरुडाची भरारीही अपुरी पडेल. भिक्षुकीचा पिढीजाद पेशा सोडून मी नोकरपेशा पत्करला, व नोकरी पत्करली तीही एका गुलजार छेलछबेलीची, यात माझा कांहींच हेतु नसेल का? शौर्य-धैर्य-वीर्य माझ्याही अंगीं आहे, व मी शिपायीबाणा पत्करला तर रणमर्दांच्या मालिकेत प्रवेश

करण्याला मला मुळींच अवघड जावयाचे नाही असे असता मी मस्तानीचीच नोकरी पत्करली, ती त्यात माझा काही विशेष हेतु असल्याशिवाय थोडीच पत्करली ? एवढे खरे की, ऐतखाऊपणाने ऐषआराम भोग् इच्छिणाऱ्या लोकांसाठीच अशा नाजूक नोकऱ्या असतात, व असेच लोक अशा ठिकाणीं बहुधा टिकतात. तसेच आयुष्य तुला कठावयाचे असते तरीदेखील ही नोकरी काहीं वाईट नव्हती पण तू तसा मनुष्य नाहास, हे मला माहीत आहे तुझ्या महत्त्वाकांक्षा मी जाणतों, व त्या महत्त्वाकांक्षांना योग्य वाव करून देण्यासाठींच मी आज माझ्या जागी तुझी वर्णी लावून देत आहे'

म्हणजे ? तुम्ही ती नोकरी सोडली कीं काय

'हो ! सोडली —सोडली नाही तरी सोडणार

का बरें ? "

'कारण असे की, एकतर माझे काम आता झाले आहे मला माझ्या भावी हिताकडे जेवढा त्या नोकरीचा उपयोग होण्याजोगा होता तेवढा मीं करून घेतला आहे आता मला मस्तानीसमोर गोंडा घोळण्याचे काही कारण उरलेले नाही मला जे ध्येय गाठावयाचे आहे, त्या ध्येयमंदिरात मी पायरीपायरीने चढून प्रवेश करीत आहे पेशव्याच्या पदरीं नोकरी करून त्याखाली एक पायरी चढलो यापेक्षा त्यात महत्त्व नाही यापुढेही मला मस्तानीच्या नोकरीत राहून माझा हेतु साधता आला नसता असे नाही पण काहीं गोष्टी अशा घडून आल्या, की आता मस्तानीचा व म्हणून पेशव्याचाही माझ्यावर पूर्वीसारखा विश्वास बसणे शक्य नाही मस्तानीच्या मनांत माझ्याविषयी संशय उत्पन्न झाला आहे, व ती मला नोकरी सोडावयाला लावील असा रंग आजपासूनच दिसू लागला आहे"

असे होण्याचे कारण काय ? "

" असे पहा, मस्तानी ही कशी झाली तरी बाजीराव पेशव्याची रक्षा ती स्वतःला मारे पेशव्याची धर्मपत्नी म्हणविते व पतिव्रताधर्माचा टेंभा मिरविते पण ज्यांना ज्यांना तिचा पूर्वेतिहास माहीत आहे त्यांना त्यांना तिला एवढा मान मुळीच देववत नाहीं काशीबाईसाहेब तर तिला मुळींच मानीत नाहींत कारण तिने आजकाल पेशव्यांना इतके नादी लावलें आहे की, पेशव्यांना आताशा आपल्या लग्नाच्या बायकोचीही आठवण होईनाशी झाली आहे अशा बाईविषयी मला का आदर वाटावा ? "

"आणि मग मला तरी का वाटावा ? "

"खरेंच ! तुलाही तिच्याविषयीं आदर वाटण्याचें कांहीं कारण नाहीं "

"तरीही मी तिची नोकरी करूं ? ज्याचें अन्न खावयाचें, त्याच्या घराचे वांसे मोजावयाची ही खाशी युक्ति तुम्हीं मला सांगितली म्हणावयाची ! "

"आता खरें सागू का ? " कोन्हेररामानें जरा गौरवून विचारलें.

"आणि इतका वेळ सांगितलेत तें खोटें वाटतें ? " राधा जीभ चावीत म्हणाली.

"तसें नव्हे काही गोष्टी फार महत्त्वाच्या असतात, त्या नेहमींच बोलावयाच्या नसतात आता सागतोच, एरव्हीं तुमची समजूत पडावयाची नाहीं " कोन्हेरराम कृष्णरावाच्या कानाशीं तोंड नेऊन फक्त तेथल्या मंडळीला तेवढें ऐकूं जाईल इतक्या हळू म्हणाला, " सागण्याजोगे बरेंच आहे. पण तुम्ही कोणापाशीं बोलणार नाहीं तर सागतों "

"सागा तर खरें काय तें ! " कृष्णराव म्हणाला

"पण तू माझ्या शब्दाला मान देऊन मस्तानीकडे नोकरी करावयाला तयार असशील, तर ह्या गुरुकिल्लीचा तुला व मला उपयोग ! "

सर्वांनाच आता कोन्हेररामाचा सशय येऊ लागला. देवकीचा इतका वेळ त्याच्यावर भरंवसा होता, पण आतां तिचा भरवसाही क्षणोक्षणीं उडूं लागला असल्या माणसाची संगत नसावी हें उत्तम असें सर्वांनाच वाटूं लागलें पण त्याबरोबर त्याचे कावे काय काय आहेत हें जाणण्याची सर्वांना उत्कंठा होती म्हणूनच त्याला ती 'गुरुकिल्ली' सागण्याला सर्वांची भर मिळाली. कृष्णरावानें त्याच्या होला हो ठेवून दिली आपली छाप या मडळीवर चांगलीच बसली असें पाहून कोन्हेरराम पूर्ववत् हळू म्हणाला, "मी एथे मस्तानीची किंवा पेशव्याची नोकरी करण्यासाठीं राहिलों नसून राजकारण करण्यासाठीं राहिलों आहें या राजकारणाच्या यशस्वितेवर माझें पुढील सारें भवितव्य अवलंबून आहे. वस्तुतः मला बाजीराव, मस्तानी अथवा काशीबाईसाहेब यांपैकीं कोणाचीच पर्वा नाहीं मात्र माझ्या ध्येयाच्या सिद्धीसाठीं मी कधीं पेशव्याच्या बाजूनें बोलतों, व कधीं मस्तानीपाशीं काशीबाईसाहेबांची निंदा तर कधीं काशीबाईपाशीं मस्तानीची निंदा करून जशी वेळ येईल तशी साजरी करून घेतों "

"पण एवढ्या उलाढाली करून तुम्हांला असें कोणतें राजकारण साधावयाचें आहे ते तरी आम्हांला कळू दे ! " कृष्णराव म्हणाला.

" ते तुला पुढे कळेल प्रथम तू नोकरीवर तर रुजू हो ! तूर्त तू एवढेच करावयाचें, मस्तानीच्या महालात व इतरत्र पेशव्याचीं काय काय खलबतें चालतात याची मला वेळोवेळी खबर द्यावयाची जर एवढें काम तू केलेस, तर तेव्हा ! नशीब काढशील "

" हे बातमीदाराचे काम बाहेर राहून करता यायचे नाही वाटतें ! " राधेनें मध्येंच विचारले

" बाहेर राहून कसें करता येईल ? आपला मुख्य उद्देश बाजीराव काय काय खलबतें करतात—" कोन्हेरराम मध्येच थाबून म्हणाला, ' पण तुम्ही कोणी पेशव्यापाशीं याची चुगली करणार नाहीं ना ? "

" छे ! छे ! त्याची तुम्हाला काळजीच नको पेशव्यानी आम्हाला आजवर असे काय हत्ती घोडे दिले आहेत, ती त्याच्याविषयी आम्हाला इतकी आपुलकी वाटेल ? " राधा मिस्किलपणानें खालचा ओंठ चावीत म्हणाली

" असे पहा, फुललेल्या कमळाजवळ भुंगा आला कीं, त्याचें गुंजन सुरू होतें. तशीच अवस्था पेशव्याचीही आहे ते मस्तानीजवळ आले, कीं त्याच्या अतःकरणाची कळी उमलते व त्यातून निरनिराळ्या महत्त्वाच्या बातम्याचा सुगध सर्वत्र दरवळू लागतो "

" त्या बातम्या मग मीं बाहेर फोडावयाच्या, होय ना ? " कृष्णरावाने विचारलें

" काहो भावजी ! " " राधेने मध्येच खोचिकपणे बळिरामाला उद्देशून हसत विचारले, " ज्या ज्या ठिकाणी अतिशय सुगध असतो, त्या त्या ठिकाणीं विषारी नाग असतील नसतील तेथून धावून येऊन वरती करतात असे म्हणतात ते खरें का ?"

राधेच्या ह्या प्रश्नातील आशय बळिरामाच्या तेंव्हाच ध्यानीं आला पण तो काहीं बोलला नाहीं. त्याने एकवार राधेकडे व पुन्हा कोन्हेररामाकडे मात्र पाहिले. कोन्हेररामाचेंही तिकडे लक्ष्य होतेंच. पण त्यानें राधेचा प्रश्न ऐकूनही न ऐकल्यासारखे करून कृष्णरावाला म्हटले, " तू जो प्रश्न आता विचारलास, त्यावरून तुझ्या स्वामिभक्तीच्या वेडगळ कल्पना तुला असें करूं देणार नाहींत असें मला वाटतें. "

" छे ! कसला स्वामि आणि कसली स्वामिभक्ति तुम्ही घेऊन बसला ? " कृष्णराव आपल्या मंडळीकडे पाहून किंचित् हसत म्हणाला. त्याच्या हंसण्याचा

अर्थ त्या मंडळीच्या तेव्हाच ध्यानी आला. त्यानीं आपल्या समतिदर्शक चर्यांनी त्याला तसें दर्शविलें. बाळिराम तेव्हाच रावेला एकीकडे म्हणाला, "रावे ! तू जो बाण फेकलास, तो राजश्रींना चांगलाच झोंबलेला दिसतो."

कृष्णरावाचेही मन कोन्हेररामाविषयीं शुद्ध राहिलेलें नाहीं, आपण कोन्हेररामाला टोमणे दिलेले त्यालाही आवडतात, असे पाहून रावा पुन्हा कोन्हेररामाला म्हणाली, "पण काहो ! तुमचा हा कावा मस्तानीबाईसाहेबांना कळून आला, म्हणून तर त्यानीं तुम्हाला अर्धचंद्र दिला नाहीं ना ?"

देवकीला रावेचे शब्द आवडले नाहीत. रावा पुन्हा मर्यादा सोडून बोलू लागली असें तिला वाटलें. तिनें तिला डोळ्यानें खूण करून तसें न करण्याची सूचना दिली. कृष्णराव व बळिराम याना मात्र तें आवडलें. कृष्णराव तर थोड्या वेळापूर्वी आपणाकडून रावेचा अपमान झाल्यामुळे ती हिरमुष्टी झाली असल्यास तो हिरमुष्टीपणा दूर करण्यासाठीं तिच्या बोलण्याला समतिदर्शक असेच कोन्हेररामाला म्हणाला, "आणि असें पहा कोन्हेरराम ! तुमचें ठीक आहे. तुम्ही मोठे लोक पडला. तुम्हीं असें काहींही केलें तरी तोलून धरण्याजोगें आहे. आजवर नाहीं का तोलून गेले ! तुमच्या वडिलांचा शाहूमहाराजापाशीं वशिला, तुमच्या बंधूचें तुम्हाला पाठबळ, शाहूमहाराजाचे तुम्ही जामात, तुमचें शासन मस्तानी तरी काय करणार व पेशवे तरी काय करणार ? पण माझें तसें नाहीं. मीही तुमच्यासारखाच वागू लागलों तर मला अर्धचंद्र मिळावयाला अवकाश लागावयाचा नाहीं. मग—"

कोन्हेरराम किंचित् ओठ चावीत आत्मविश्वासपूर्वक म्हणाला, "ती तुला तरी काय अर्धचंद्र देते म्हणा ! माझी तर गोष्टच निराळी. तू पहाशील कीं, वेळ आली म्हणजे मीच तिला पेशव्याकडून अर्धचंद्र मिळण्याला कारण होईन. पण त्याच्याशी तुला सध्या काय करावयाचें आहे ? तू आपला आजच्या आज नोकरीवर रुजू हो कसा ! तेवढी मी तुझी शिफारस पेशवे व मस्तानी ह्या उभयतापाशीं पूर्वीच करून ठेविली आहे. आणि आता मी नोकरी सोडणार म्हटल्यावर जे अधिकार आजवर मला होते व जें वैभव मी भोगीत होतो, ते अधिकार व तें वैभव आता तुलाच मिळणार."

"पण ह्या अधिकार वैभवाऐवजीं भलतेंच काहीं नाहीं ना मिळायचें ? तुमच्या वशिल्यानें तिकडे जायचें आहे, म्हणून विचारतें." रावेनें चौकसपणानं विचारलें.

"जशी इच्छा, तसें फळ !—" कोन्हेरराम रागानें उत्तरला.

देवकीनें राधेला पुन्हा एकदा पूर्वीपेक्षाही तीव्र नजरेचें भय दाखविलें राधेला भय वाटलें कीं नाहीं नकळे, पण ती भय मानून तेवढ्यापुरती गप्प मात्र झाली

" पण हे पहा, मला ती नोकरी मुळीच नको आहे " कृष्णराव स्पष्टपणें बोलला

" तर मग काय तू आजन्म असाच भिकारी राहून रस्त्यातल्या उनाड बेवारशी कुत्र्याप्रमाणे आपले आयुष्य वाया घालविणार ? असल्या विचारानीं तू तर देशोधडीला लागशीलच —लागशील का ? आजच लागला आहेस, त्यातच आणखी दुर्दशा तुझ्या वाट्याला येईल व तुझ्या आईला, तुझ्या बायको पोराना तुझ्या नावाने हाका माराव्या लागतील "

राधेला आता मात्र चीड आली इतका वेळ ती व्याजोक्तीने बोलत होती ती आता उघड उघड म्हणाली, " आणि तुमच्या उपदेशाने तिकडे वागावयाचें झाल्याने आम्हाला तुमच्या नावानें नाहीं का हांका माराव्या लागायच्या ? कोन्हेर राम ! 'उचलली जीभ की लावली टाळ्याला', इतके बेपर्वा माणसाने कधीं होऊ नये "

राधा रागावली ती सकारण रागावली असे देवकीलाही वाटले तिने राधेची सतप्त चर्या पाहून तिला पूर्वीप्रमाणे दाबण्याचा प्रयत्न केला नाही कोन्हेररामही राधेचे सडेतोड बोल ऐकून बराच ओशाळला. आपण बोलू नये तें बोललों असें त्याला वाटू लागले पण आता त्या वाटण्याचा काय उपयोग !

कृष्णरावही राधेप्रमाणेच चिडून तशाच सडेतोडपणाने उद्गारला, " कोन्हेरराम ! मी जातीचा अस्सल कऱ्हाडा आहे हे तुम्ही विसरलां कऱ्हाडा आपल्या अब्रूसाठी व मानासाठी प्राण देईल तुम्ही एकवार बोलला तें बोलला, पुन्हा असें बोलू नका निदान कऱ्हाडयापाशीं तरी बोलू नका. कऱ्हाडयाची जात विश्वासघातानें व फंदफितुरीनें निमकहराम बनून मान धन वैभवाची अपेक्षा कधींच करणार नाहीं माणसाने पोट भरत नसेल तर पोटात कांटे भरावे, पण असली निमकहरामी कधींच करू नये."

" हे पहा, त्या कऱ्हाडेपणाच्या गप्पा मजपाशीं सांगू नकोस. तसें म्हणशील तर मोघेही कऱ्हाडेच आहेत ना ? मग ते का कोल्हापूरकरांशीं फितूर झाले ? " कोन्हेररामानें चिडून विचारलें

आतां निष्कारण शब्दानें शब्द वाढणार, असें पाहून बळिरामानें त्या वादात तोंड घातलें तो म्हणाला, " कोन्हेरराम ! अशा एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या

काढण्यात पुरुषार्थ नाही" तो कृष्णरावाकडे वळून म्हणाला, ' कृष्णा ! तू देखील आवरतें घे माणसे एका क्षणात तोडता येतात, जोडता येत नाहीत "

" हे मला कळते, म्हणूनच आता यानीं मोध्याची गोष्ट काढली तरीदेखील मी गप्प बसलो नाहीपेक्षा मोध्याच्या मनात पेशव्याविषयी काळे ओतून त्याना ज्या कोणी ठरविले त्या आगलाव्याना मी बसल्या घटकेला भनगटाला धरून दाखवून देऊ शकेन याना तरी त्यात एवढा राग का यावा ? त्यांनी सुचविलेला उपाय मला निमकहरामपणाचा वाटला, म्हणून मी त्याला कबूल नाही —"

" अरे भल्या माणसा ! " कोन्हेरराम जरा शांत होऊन वडीलपणाचा आव आणून म्हणाला, " ही हरामखोरी नाही, हे बुद्धिमत्तेचे व मुत्सद्देगेरीचे काम आहे अशा मुत्सद्दीपणा असल्याशिवाय माणसाला राजकारणाचे अवघड डाव कळता यावयाचे नाहीत मी सांगतो, हा मुत्सद्दीपणाचा श्रीगणेशा आहे, माझे ऐक —"

" आग लागो तुमच्या त्या मुत्सद्दीपणाला माणुसकीला सोडून वागणारा मुत्सद्दी माझ्या उभ्या आयुष्यात मी हाच पहिला पहातो आहे वन्याच्या अंतःपुरात कलहाग्नीचा वणवा पेटवून त्या वणव्यातील विस्तवावर सुग्रास शिदोरी शिजवून खाऊ पाहणाऱ्या तुमच्यासारख्या मुत्सद्याला कोपरापासून नमस्कार ! " कृष्णराव कोन्हेररामाला कोपरापासून हात जोडून म्हणाला

" तर मग बस कपाळाला हात लावून रडत ! ' कोन्हेरराम बाहेर जाण्यासाठी रागारागाने उठत देवकीकडे वळून म्हणाला, " देवकीकाकू ! देव देतो आणि कर्म नेतं तें हे असे ! आता माझ्याकडे काहीं बोल नाही बरे !"

" कोन्हेरराम ! असे रागावू नका असली भानगडीची नोकरी माझ्या कृष्णाला निभायची नाहीं त्यापेक्षा दुसरी एखादी नोकरी नाही का मिळण्याजोगी ? " देवकीनें अत्यंत नम्रपणे विचारले तिच्या वाणीत इतकी करुणा साठविली होती कीं, राधा व कृष्णराव यांच्या उपमर्दकारक खोचक बोलण्याने कोन्हेररामाच्या अंतःकरणाला ज्या जखमा झाल्या होत्या त्या त्यामुळे बुजून निघाल्या तो शांत झाला असे पाहून देवकी पुन्हा म्हणाली, " मला वाटते कोन्हेरराम ! तुम्ही पेशव्यांकडे कृष्णरावाला नोकरी लावून देण्यापेक्षा शाहूमहाराजांच्याच पदरी त्याला आश्रय मिळवून द्या महाराज तुम्हाला आपले जावई मानतात, तुमच्या शब्दाचा त्यांच्याकडे खास उपयोग होईल."

"महाराजान्या पदरी तरी नोकरी करण्याचा कृष्णरावाचा मानस आहे का ?" कोन्हेररामानें विचारलें

"का असणार नाहीं ? महाराजान्या चरणापेक्षा श्रेष्ठ असें आम्हाला ह्या दुनियेंत दुसरें काय आहे ?" बळिराम म्हणाला, ' महाराजाशी निःसीम स्वामिनिष्ठेने वागावयाचें हा आमचा हेतु, म्हणून तर आम्हीं मोघ्यांची इतराजी संपादन करून हा वनवास पत्करला" असे म्हणून बळिरामाने आपला सर्व वृत्तान्त कोन्हेररामाला निवेदन केला कृष्णराव मधूनमधून त्याला तजवेने जास्त वहात न जाण्याबद्दल इषारा देत होता, पण तिकडे त्याचे मुळीच लक्ष्य गेले नाही त्याच वेळीं गोविंदपंत बाहेरील बाजूला येऊन उभा राहिला तिकडे तर कोणाचेच लक्ष्य नव्हते

कोन्हेरराम बळिरामाची कर्मकहाणी ऐकून म्हणाला, "बळिराम ! तू जसा खुल्या दिलाने माझ्याशीं बोललास, तसाच मीही आता बोलतो मी जो पेशव्याच्या पदरी आहे, तो महाराजाचा बातमीदार या नात्यानेच आहे पेशवे अलीकडे दिवसेंदिवस जास्तजास्त शिरजोर होऊन महाराजाचे राज्य बळकावू पहात आहेत एथला शनवारवाडा तुम्हीं पाहिलाच असेल तो तुम्हाला काय सांगतो ?"

राधा पुन्हा म्हणाली, "वाडा बिचारा निर्जीव पडला निदान आमच्यासारख्या मूढ माणसाना तरी तो निर्जीवच भासतो त्याचे बुरुज, भिंती व भुई यातून काय उद्गार निघतात हे आम्हाला कसें कळणार ?" ती आणखीही काहीं बोलली असती पण देवकीने तिला डोळ्याच्या खुणेनें गप्प केलें

राधेच्या बोलण्यात खोच असली तरी ती कोन्हेररामाच्या ध्यानीं आली नाही तो तिचे बोल हसावारी नेऊन म्हणाला, "खरेंच, राजवटीच्या माणसाचे कोणाचे काय कावे आहेत हे देखील जिथे याना कळत नाहीं, तिथे राजवटीच्या इमारतींची भाषा याना कोठून कळणार !"

"ती भाषा तुमच्यासारख्या मुत्सद्यानींच ओळखावी" कृष्णराव कावेबाजपणाने बळिरामाकडे पहात उद्गारला बळिरामाने ते बोल ऐकले, पण त्यातील खोंच त्याच्या काही ध्यानी आली नाही राधा मात्र ते बोल ऐकून त्यांतील खोल अर्थ ओळखून की काय, गालातल्या गालात हंसली पण तिला हसताना कोणींही पाहिले नाहीं

"तू बरोबर बोललास ती भाषा मुत्सद्यांनींच ओळखावी ती भाषा महाराज

ओळखतात व मीही ओळखतो ती भाषा अशी की, पेशव्यांना पुणे ही आपली राजधानी करावयाची आहे व साताऱ्याचें सारें राजवैभव लुटून या राजधानींत आणून सोडावयाचें आहे पेशव्यांची दानत आताशा पालटली आहे दाभाड्यां विरुद्ध मोहीम सुरू करण्याची पेशव्यानीं जी एवढी घिसाडघाई आरंभिली आहे, ती तरी एवढ्याचसाठीं कोल्हापूरकर जे आज महाराजाविरुद्ध झगडत आहेत, त्यांचाही दात खरा पेशव्यावरच आहे एरव्हीं त्यानीं दाभाडे व पेशवे याच्या झगड्यात मोघ्याना आपल्या वतीने दाभाड्याच्या कुमकेला का पाठविलें असतें ? दाभाड्यानींदेखील उत्तरेकडे जी झुंज माडली आहे, ती पेशव्याच्या मगरमिठीतून महाराजाची सटका करण्यासाठीच दाभाड्याच्या ह्या पवित्र अंगीकृत कार्यात आपण सर्वांनीं जर त्याना मदत केली, तर त्यांत पर्यायाने आपणाला महाराजांची सेवा केल्याचेच पुण्य लाभणार आहे मीं आता तुला जे मस्तानीच्या पदरीं नोकरी करावयाला सागितलं, त्याचा अर्थदेखील हाच पेशव्याचीं सारीं कारस्थानें अलीकडे मस्तानीच्या महालात रचून चालतात तेथली खिनबातमी जर तुझ्या माझ्यासारख्यानी नेमकी वेचून दाभाड्याना कळविली, तर त्यात दाभाड्यांचे तसेंच महाराजाचेंही हित आहे, व त्या दोघाच्या बहाल मर्जीत आपणा सर्वांचें हित आहे आता तरी हा माझा युक्तिवाद तुम्हाला पटतो का ? ”

कृष्णराव यावर कांहीं उत्तरणार, तोंच सर्वांना बाहेरून घरवन्याचा भास्कररामाचा शब्द ऐकू आला, “ गोविंदा ! तू असा आडवशाला उभा का ? ”

“ मी उभा नाहीं, मी हा आताच आलो ” असें म्हणत गोविंदपत घरांत आला त्याच्या मागोमाग भास्कररामही निघून गेला गोविंदरावाला पाहतांच कोन्हेरराम पाण्यात पडलेल्या मिठाच्या खड्याप्रमाणें जणु विरघळून गेला इतका वेळ त्याच्या वाणींत व नजरेत खेळणारें चापल्य एका क्षणात लयाला जाऊन जणु त्याची दातखिळी बसण्याची वेळ आली तो काहींसा अडखळत गोविंदपंताला म्हणाला, “ पेशव्यापाशीं तू कृष्णरावाची शिफारस केलेली मीं ऐकली, ती आनंदाची बातमी ह्या मडळीला कळविण्यासाठीं मी लगबगीने इकडे आलो होतों त्याच कामासाठीं तू देखील आला असशील ! ”

“ हो ! असेंच कां म्हणाना ! पण माझें काय तुम्हीं केलेंच म्हणतां, तेव्हां मला बोलावयाचें काहीं उरलेच नाहीं बाकी, मी मात्र केवळ तेवढ्याचसाठीं आलों असे नाहीं. मी तुमच्या शोधार्थच आलों आहें ”

" माझा शोध करावयाला मी कुठे पळून गेलो होतो ? " हे शब्द कोन्हेररामानें गोविंदपताच्या बोलण्याला उद्देशून जोरानें उच्चारले खरे, पण त्याची चर्या तेव्हां सागत होती कीं, तो मनात अतिशय घाबरला आहे पुढें त्याने गोविदपतांना विचारलें, " मला कोण बोलावतें आहे ? "

" मस्तानीबाईसाहेब " गोविंदपत उत्तरला

मस्तानीचे नाव ऐकताच तर कोन्हेररामाची चर्या पार उतरली " बरे आहे मी तिकडे जातो देवकीकाकू ! तुम्ही कृष्णरावाला दोन समजुताच्या गोष्टी सागून आपला आतांचा वेत तरी त्याला रुचतोसा पहा पेशव्याच्या पदरीं त्याला रहावयाचे नसले तर महाराजाच्या पदरीं त्याची सोय लावून देता येईल " असे म्हणून कोन्हेरराम तेथून निघून गेला

" का रे गोविंदा ! कोन्हेरराम मस्तानीसाहेबाचा निरोप ऐकताच इतका थिजला तो कां ? " देवकीनें कोन्हेरराम बाहेर गेलासे पाहून विचारले गोविदपत तिला हाताच्या खुणेने 'जरा थांब, मग सांगतो' असे सुचवून कोन्हेरराम दूर जाईतों दरवाजांत उभा राहून वाकून पहात होता

कोन्हेररामाने बाहेर जातां जाता गोविदरावाला जरा बाजूला घेऊन त्याच्या कानात कायसे सागितले व लगेच कृष्णराव वगैरे मडळीचा निरोप घेतला, " मी आता जातो, हा गोविदा सागेल त्यावर तरी तुमचा सर्वांचा विश्वास बसेल ना ? त्याप्रमाणे करा म्हणजे झाले "

कोन्हेरराम बाहेर निघून गेला, तो दूर गेलासा पाहून गोविंदराव देवकी वगैरे मंडळींशी बोलू लागला बळिरामाला आलेला पहाताच प्रथम त्याने कोल्हापूरकडील चौकशी केली बळिरामाने मोघ्याच्या घरच्या जाचाचा सर्व वृत्तान्त निवेदन केला तो ऐकून गोविदपताला अत्यत हळहळ वाटली पण त्यानें सौम्य व धीराच्या शब्दानीं त्या मडळीची समजूत केली, " देव काहीही करतो तें आपल्या बऱ्यासाठींच करतो मोघ्याची दानत आजकाल फारच बिघडली आहे त्यांचा आश्रय सोडण्याची बुद्धि तुम्हाला झाली, ती सुबुद्धीच झाली म्हणावयाची ! "

" तें आता अनुभवावरून ठरवायचें ! " राधा म्हणाली

बराच वेळ त्या मडळीचे जिव्हाळ्याचें सभाषण चालले होते नंतर कृष्णरावाला घेऊन गोविदपंत पेशव्यांकडे जाण्यासाठीं तेथून बाहेर पडला

प्रकरण सहावें

# वाटाघाट

कान्होजी/कान्हेरराम कृष्णरावाला फितविण्यासाठीं देवकांच्या बिऱ्हाडी गेला तेव्हां इकडे पेशव्याच्या गोटात मोहिमेच्या पुढील योजनेविषयीं काय वाटाघाटी चालल्या होत्या, ते आपणाला आता पहावयाचे आहे सेनापति दाभाड्याना आणखी एक-वार खलिता पाठवून सलोखा करण्याची संधी द्यावी असा उपाय बाजीराव पेशव्यानी जो शोधून काढला, त्याची चिमाजीअप्पानी प्रथम कांहीशी हेटाळणी केली व त्या निमित्तानें बाजिरावांच्या पदरी स्त्रीलुब्धतेचा दोष बांधला, हा त्याचा केवळ विनोद झाला एवढा विनोद तरी चिमाजीअप्पाना त्या वेळी सुचण्याचें कारण पेशव्यानी मोहिमेचा पुकारा केल्याबरोबर त्यान्या हाकेला ओ द्यावयाला हजारो मराठे मावळे आपण होऊन धावून आले होते व येत होते हे होतें मोहिमेला पुरेसा पसा पेशव्याच्या हाती तेव्हा नव्हता, पण त्याची तात्पुरती गरज त्याचे गुरु ब्रह्मेंद्रस्वामी यानीं भागविण्याचे कबूल केले असून स्वामी ते द्रव्यसाह्य थोडयाच दिवसात पाठवून देणार होते शिवाय पेशव्यानीं निरनिराळ्या ठिकाणी मुलुखगिरीवर गेलेल्या मराठे सरदारापाशीं पशाचा मागणी केली होती, त्या मागणीलाही अनुकूल उत्तरे अनेकांकडून आली होतीं चिमाजीअप्पाना दाभाड्याच्या अरेरावीची इतकी चीड आली होती की त्याचे पारिपत्य करता करता जोहार करण्यालाही त्यानीं मागे पाय घेतला नसता इतकी दाभाड्याच्या पारिपत्याची तहान लागलेल्या चिमाजीअप्पाना आपल्या बाजूला मनुष्यबळ व द्रव्यबळ याची इतकी अनुकूलता आहे असे आढळताच कधीं एकदा मोहीम सुरू होते व कधी एकदा आपण त्या मदांध सेनापतीचें पारिपत्य करतों असे वाटावें यात नवल नाहीं दाभाडे छत्रपतींचे, पेशव्याचे व अर्थात साऱ्या मराठशाहीचे अनन्यापराधी होते हे तर खरेंच पण त्याच्या अपराधाची चीड पेशव्यापेक्षांही चिमाजीअप्पाना जास्त आली होती याचें कारण उत्तरेकडे गुजराथ माळव्यात मराठशाहीचा विस्तार करण्यासाठी चिमाजीअप्पानीं आपल्या सहस्रावधि सैनिक बांधवासमवेत आपले स्वतःचे रक्त साडलें होते.* तें रक्त वाळण्यापूर्वीच दाभाडयानीं आपल्या

* गुजरात-माळव्यांत पेशव्यानीं जो दिग्विजय केला, तो मुख्यतः त्यांच्या वतीनें व इतर पराक्रमी साहाय्यकांच्या साह्यानें चिमाजीअप्पांनींच केला, याला इतिहासाची सबळ साक्ष आहे.

हस्तकांसह ते प्रांत बळकावून तेथली पेशव्यांची सत्ता नामशेष करण्याचा सपाटा चालविल्यावर तें चिमाजीअप्पांना कसें सहन व्हावें !

पण कोणत्याही तत्कालीन राजकीय घडामोडीचे जे बरे किंवा वाईट परिणाम साऱ्या मराठशाहीवर घडावयाचे, त्यांची खरी जबाबदारी बाजीराव पेशव्यांच्या शिरावर असल्याने त्यांनीं दाभाड्यांशीं सलोख्याचें बोलणें पुन्हा एकवार करण्याची जी युक्ति काढली होती, ती त्यांच्या मतें अत्यंत इष्ट अशी होती. त्यांच्या त्या इच्छेला शाहूमहाराजांचा पूर्वीपासून तर पाठिंबा होताच; पण शिवाय त्या दिवशीं नारायणजी ढमढेरे मुद्दाम साताऱ्याहून महाराजांकडून दसऱ्याचा पोशाक व पत्र घेऊन आला, त्या पत्रांतही महाराजांनीं पेशव्यांना आज्ञा केली होती, "शक्य तोंवर दाभाड्यांशीं सलोखा करण्याकडेच तुमचा कल असावा. सामोपचारांनीं हें प्रकरण मिटण्यासारखें असल्यास उगाच रक्तपात करण्यांत अर्थ नाहीं. आम्हीं दाभाड्यांस स्वतंत्रपणे ताकीदपत्र दसऱ्याच्या पोशाकाबरोबर पाठविलेंच आहे, तुम्हीही तसेच करावें. त्याचाही कांहीं उपयोग होत नाहीं अशी तुमची खात्री झाल्यास मग मात्र दाभाड्यांस शत्रु समजून त्यांचें पारिपत्य करणें अवश्य आहे."

बाजीराव, चिमाजीअप्पा व मस्तानी शनवारवाड्याकडून माघारीं आलीं व त्या दोघां बंधूंच्या या बाबतीत वाटाघाटी सुरू होत्या, त्या दरम्यान् महाराजांचें आज्ञा-पत्र हातीं पडतांच त्या आज्ञापत्राची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी एकट्या बाजिरावांच्याच काय पण चिमाजीअप्पा, नारायणजी ढमढेरे व आवजी कवडे वगैरे त्यांच्या सहकाऱ्यांच्याही शिरावर येऊन पडली. पण बाजिरावांइतकी महाराजांच्या आज्ञापत्रानुसार सामोपचाराने वागण्याची तयारी इतर कोणाच्याही मनाची दिसेना. अखेर जो काय निर्णय ठरावयाचा तो आपल्या सर्व सहकाऱ्यां-च्या एक विचारानें झालेला बरा, असा पोक्त विचार करून बाजिरावांनीं आपल्या सर्व सहकाऱ्यांना एकत्र जमविलें व त्यांच्यापाशीं महाराजांच्या आज्ञापत्राची गोष्ट काढून विचारलें, "यावर आपणां सर्वांचें काय मत आहे ?"§

---

§ नारायणजी ढमढेरे, आवजी कवडे वगैरे कैंक देदीप्यमान रत्नें पेशवाईच्या कारभारांत प्रामुख्यानें चमकून गेलीं आहेत, व त्यांच्या पराक्रमांनींच पेशवाईचा इतिहास बनविला आहे. ह्या रत्नांचा व त्यांच्या पराक्रमरूपी तेजाचा तेवढा इतिहास व तोही ओझरता उपलब्ध आहे. पण तीं रत्नें कोणत्या खाणींत केव्हां निपजलीं

प्रथम त्या मंडळीत आपसांत महाराजांच्या पत्रावर व त्यांच्या एकंदर राज्य-कारभाराच्या धोरणावर बरीच टीका झाली त्या मंडळीचे मत चिमाजीअप्पानीं त्या भर बैठकींत जाहीर केले, " महाराजांचें एकंदर धोरण नेहमींच धरसोडीचें असतें जुने मोडू नये व नवें करू नये हे महाराजाचे ब्रीदवाक्य, व त्या ब्रीद-वाक्याला अनुसरून महाराज नेहमींच 'रामाय स्वस्ति, रावणाय स्वस्ति' या न्यायानें वागत असतात पण आपल्या एकंदर धोरणावर कोटमाप हिंदु रयतेचें भवितव्य अवलंबून आहे, ही वस्तुस्थिति जर महाराजांच्या मनात सदैव जागृत असती, तर त्यांनीं इतके मवाळपणाचे धोरण कधीच स्वीकारलें नसतें "

बाजिरावानी यापूर्वी खासगी रीत्या चिमाजीअप्पाची समजूत करण्याचा प्रयत्न केला होता तेव्हाच ह्या योजनेला अप्पाची पूर्ण नापसती असल्याचे बाजिरावांना कळून चुकले होते त्याची व्यक्तिशः समजूत पाडता येणे कठीण, असे पाहूनच बाजिरावाना इतर अनुयायाच्या पाचा मुखी परमेश्वराच्या मुखातून महाराजाच्या आज्ञापत्राला मान्यता मिळवावयाची होती त्या प्रयत्नाला खो घालण्याजोगी भाषा अप्पानी आपण होऊन भर बैठकीत बोलावयाला सुरवात केली, ते बाजि रावाना आवडले नाही ते अप्पाना जरा रागाने म्हणाले, " अप्पा ! मलादेखील थोडेसें राजकारण कळते आपण कितीही पराक्रमी झालो तरी महाराजाचे सेवक आहोत हे आपण विसरता कामा नये "

" पण त्याबरोबरच महाराजानी देखील हें विसरता कामा नये की, आपण जी कोणतीही गोष्ट बोलतो किंवा करतो, तिचा साऱ्या मराठशाहीवर-नव्हे, साऱ्या हिंदु दुनियेवर परिणाम होत असतो, यासाठी कोणतीही योजना ठरवितांना ती जरा विचाराने ठरवावी " आवजी कवडे बाजिरावाकडून चिमाजीअप्पाचा जरा पाणउतारा झाला असें पाहून आपण होऊन म्हणाले

आवजीच्या मागोमाग नारायणजी ढमढेरे उठले व म्हणाले, " श्रीमतानीं आता महाराजाविषयीं पूज्यभाव दाखविला तें योग्यच झाले. आमचीही महा राजाच्या चरणी तशीच अनन्यसामान्य भक्ति आहेच पण प्रजेने जसें कर्तव्य-

---

वगैरे त्याचा कुलेतिहास उपलब्ध नाहीं तरी पण ह्या ब्राह्मण वीराचे पराक्रम कैक क्षत्रिय वीरांनाही लाजविणारे आहेत हें सिद्ध करण्याला आजचा उपलब्ध इतिहासही पुरेसा आहे.

पालन करावयाचे असते, तसेच राजालाही कर्तव्यपालनाचे बधन असतेंच महा-राजावर निस्सीम निष्ठा ठेवून वागणे हे आम्हा महाराजांच्या प्रजाजनांचे कर्तव्य आहे यांत सशय नाही पण राजकारणाच्या घडामोडी करताना महाराजानीं आम्हा राजवटीच्या सर्व कार्यकर्त्या माणसांची सल्ला घ्यावयाला नको का? हेच पहा, गुजराथ-माळव्यात आम्ही व आमच्या सैनिक बाधवानीं रक्त साडून महा-राजाची सत्ता तेथें स्थापन केली सेनापति झाले तरी आमच्यासारखेच महा राजांचे सेवक आम्हीं राजवटीची जी घडी बसविली ती विस्कळित करण्याचा अधिकार नैतिक दृष्ट्या पाहूं गेले असता महाराजांनाही नाहीं हा! त्यांना अधिकार आहे, पण तो केव्हा? त्याच्या व आम्हा कार्यकर्त्या माणसाच्या एकविचारानें असुक एक गोष्ट करावयाची ठरेना व त्यामुळे राजवटीला धोका पोचण्याचा सभव आहे, अशा वेळी महाराजानी त्या। जरूर मन घालावे —"

बाजीराव मध्येच म्हणाले, "पण नारायणजी! अगोदर मला सागा, आपल्या कारभारात महाराजानीं तरी अशी ढवळाढवळ आजवर कधी केली आहे? उगाच महाराजाना दोष देण्यात अर्थ नाहीं"

बाजिरावांच्या ह्या समर्थनाचें सर्वांना हसू आले त्यावरून त्यातला एक शब्दही तेथल्या मडळींपैकी कोणाला रुचला नाही, असे पाहून बाजिरावाच्या गुलाबी गालांवर विस्मयाचे स्मितहास्य झळकू लागले सर्वजण एकमेकाच्या तोंडाकडे पहात क्षणभर गप्प बसलेले पाहून बाजिरावानी सर्वांना उद्देशून विचारले, "का? विचार कसला चालला आहे? मी गैरशिस्त बोललो का?"

चिमाजीअप्पा किंचित विषादानें हसतमुख करून म्हणाले, "झोंपी गेलेल्याला कोणीही जागे करील पण जागयाला जागे कोण करील? दादा! आपल्या हातीं पेशवाईची सूत्रें आल्यापासून आपला व आमचा उत्साहभग महाराजानीं केला अशीं उदाहरणे मोजावयाचीच म्हटल्यास तीं शेकडयांनीं मोजावयाला सापडतील —हेंच पहाना! प्रतिनिधींना शिरजोर कोणी बनविले! खरें पहाता प्रतिनिधींनीं आजवर एवढे अनर्थकारक अन्याय केले आहेत कीं, दुसरा एखादा शहाणा व कार्यदक्ष राजा महाराजांच्या जागीं असता तर त्यानें त्याना देहान्त प्रायश्चित्तही दिलें असतें निजामासारख्या परक्या शत्रूच्या गोटांत शिरून फितूर होऊन त्याच्याकडून जहागिरीची लाच मिळविण्यासाठीं अलम् मराठशाहीला मारक होईल असा तह त्याच्याशीं करण्याला प्रतिनिधींनींच महाराजांना भाग पाडलेंना!

आपसांत फूट पाडण्यासाठीं देशस्थ कोंकणस्थ हा अनिष्ट वाद तरी त्यांनींच उत्पन्न केला ना ? "¶

" आणि कोल्हापुरावरील सध्याच्या मोहिमेंत तरी श्रीमतांनी जर स्वत.कडे लहानपणा घेऊन अग्रपूजेचा मान प्रतिनिधींना दिला नसता, तर आज हेच प्रतिनिधि मोंध्याप्रमाणेच स्वराज्याच्या शत्रूच्या मालिकेंत प्रामुख्यानें चमकतांना आपणा सर्वांना पहावयाला मिळाले असते " आवजी कवडे म्हणाले.

" एक प्रतिनिधीचसे काय, मराठशाहीचे जेवढे जेवढे म्हणून शत्रु आज प्रबळ झालेले दिसतात, तेवढे सारे महाराजाच्या प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष कृपाछत्रा खालींच पोसून प्रबळ झालेले आहेत." नारायणजी ढमढेरे म्हणाले

चिमाजीअप्पा म्हणाले, " इतकेंच काय, महाराजांची वर्तणूक नेहमींच राजवटीच्या कर्त्या माणसाना मारक व स्वार्थसाधु, बेवकूब आणि परके शत्रु याना उपकारक अशी असते. फत्तेसिंग भोसले, गायकवाड, पवार वगैरे मंडळी जी पेशव्याच्या सत्तेला पायबंद लावण्यासाठी नेहमी धडपडत असते, ती महाराजाची त्याना फूस असते म्हणूनच निजाम आज जो इतका शेफारला आहे, आणि इतर बादशाही सुभेदार दिवसेंदिवस उत्तरेकडे धुमाकूळ घालीत आहेत, त्याला कारण महाराजच आजपर्यंत कंक वेळा निजामाचा नीमोड करण्याच्या सुवेळा आपणाला लाभल्या पण त्याचा मोड झाल्यास बादशाही सत्तेला शह बसल्यासारखे होऊन आपण बादशहाशी बेइमान झाल्यासारखे होईल, ह्या भयाने महाराजानींच श्रीमताचे हातपाय बांधून टाकले, हें खरे ना ? "

चिमाजीअप्पाचा प्रश्न सडेतोडपणाचा असला तरी त्यात पुष्कळच सत्यांश आहे हे बाजीराव ओळखीत होते त्यांचे स्वत.चे मनही त्याना तशी स्पष्ट ग्वाही देत होतें महाराजाशीं त्याचे अशाविषयीं अनेकवार खटकेही उडाले होते त्याना आतां महाराजांची बाजू घेऊन बोलण्याला तोंडच नव्हतें साऱ्या मंडळीचा मानस धडाडीचें धोरण पत्करण्याकडे आहे हें पाहून त्याना मनांतून अत्यंत समाधान होत होतें. इतकें करूनही त्याना महाराजांच्या आज्ञापत्राची अवज्ञा करावयाची नव्हती, व दाभाडयांसारख्या राजवटीच्या पराक्रमी पुरुषाशीं स्पर्धा करण्याचा

¶श्रीपतराव प्रतिनिधींच्या अशा प्रकारच्या घरभेदेपणाचें विवेचन पेशवाईवरील यापूर्वीच्या कादंबऱ्यातून बारंवार साधार करण्यांत आलें असल्यानें येथें त्याची द्विरुक्ति करणें मुतराम् अवश्य नाहीं.

प्रसग शक्य तोंवर टाळावयाचा होता पण तो प्रसग टाळणे अगर साधणे आत। सर्वस्वीं त्याच्या हातीं उरले होतें अशातली गोष्ट नाहीं पदरच्या ज्या चार पराक्रमी मडळीवर त्याचा विश्वास, ती मडळी इतकी निकरावर येऊन शत्रूचे दात पाडण्याला उत्सुक झाली असता त्याना आवरणे सोपे नव्हतें. आता ह्या मडळींशीं युक्तिवाद करून त्याना आवरून आपल्या बाजूला वळवून घेतल्याशिवाय गत्यतर नाहीं असे पाहून बाजीराव हसतमुखानें म्हणाले, " हें सारे जरी खरें, तरी मला वाटते, महाराजाच्या आज्ञेप्रमाणे एकवार दाभाडयाना शुद्धीवर येण्याची सधी द्यावी जर त्यानीं यापुढे तरी सामोपचाराने वागण्याचे मनावर घेतले, तर आपल्या हिंदुपद पादशाहीच्या ध्येयाला त्याचा चागलाच हातभार लागेल यात सशय नाहीं माणसाना तोडता फार लौकर येतें, पण माणसें जोडावयालाच फार श्रम पडतात आहेत हेच शत्रु आपणाला अपुरे पडले म्हणून आणखी नवे शत्रु करावयाचे कीं काय ? आज आपल्या राजवटींत कर्तबगार पुरुषाना वाव नाहीं, पण त्या सर्वांच्या कर्तबगारीला एकमुखी कसे बनवावे एवढ्याचीच वाण आहे दाभाडे काय, गायकवाड काय किंवा पवार भोसले वगैरे आमच्याशी बाकून वागणारे इतर लोक काय, कर्तबगार नाहींत असे तर तुमचे म्हणणे नाहीं ना ? "

" तसे कोण म्हणतो ? " चिमाजीअप्पा म्हणाले, " पण शहाणीं व दूरदर्शी माणसें कधींच शत्रूच्या कर्तबगारीची तारीफ करीत नसतात "

" शत्रूच्या कर्तबगारीची तारीफ केली नाहीं, तरी ती कर्तबगारी विचारात न घेण्यासारखा अविचारीपणा दुसरा नाहीं तारीफ करण्यासाठीं नव्हे पण त्याच्याशीं सामना देण्याची आपली तयारी करण्यासाठीं म्हणून तरी आपणाला शत्रूच्या बलाचा अचूक अदाज असणे अवश्य असतें आज दाभाडे बरेच प्रबळ आहेत, त्याना गायकवाडासारखे हस्तक मिळाले आहेत, तेही प्रबळ आहेत त्याना जर आपण मुद्दाम जास्त डिवचले व ते उघड उघड आपले शत्रुत्व करू लागून चद्रसेन जाधवाप्रमाणे मोगलाना सामील होऊन मराठशाहीच्या नाशासाठीं झटूं लागले तर बादशाही सत्ता आज जी विस्कळित झाल्यामुळे कमजोर होऊन मावळण्याच्या पंथाला लागली आहे, ती पुन्हा प्रबळ होईल, व तिच्याशीं टक्कर देता देता मराठशाहीचे मस्तक छिनून जाऊन मराठशाहीच्या उदरीं उगवलेली आपली हिंदुपदपादशाहीची कल्पना उदरांतल्या उदरात ठार मरून जाईल. महाराजानीं तरी दाभाडयाच्या बाबतींत इतके सलोख्याचे प्रयत्न चालविले आहेत, ते लोकसंग्रहाच्या

हेतूनेच " बाजीराव जरा थांबून पुन्हा म्हणाले, " आणखी असें कीं, कोणतीही गोष्ट करावयाची ती सर्व बाजूंचा विचार करून करावी समजा, आपण आज दाभाड्याविरुद्ध एकदम उचल खाल्ली आणि दुर्दैवाने त्याच्या अफाट सैन्यबला-समोर आपला टिकाव न लागून पराजय आपल्या पदरीं आला, तर आपलें केवढे हसें होईल बरें !"

" आणि दाभाडे सामोपचाराच्या गोष्टी ऐकेनासे झाले–तसें होणार हे निश्चितच– व त्याच्याविरुद्ध आपणाला शस्त्रग्रहण करावे लागून त्यात पराजय आपल्या पदरीं आला तर ? " नारायणजी ढमढेऱ्यानी विचारलें विचारता विचारता त्यानीं एक-वार चिमाजीअप्पा व आवजी कवडे याच्याकडे पाहून असा चेहरा केला की, यात बाजिरावाना चिडवण्याचा व त्याचा हेतु स्पष्ट झाला

पण बाजीराव न चिडता म्हणाले, " नारायणजी ! माणसानें नेहमी प्रयत्नवादी असावें, व अखंड प्रयत्नाच्या अखेरीला परमेश्वरी कृपेची अपेक्षा करावी तुम्हीं सर्वांनीं या भानगडीचा जरा शात चित्तानें विचार केला, तर तुम्हालाही माझ्या-प्रमाणेंच वाटू लागेल पेशवे आणि प्रतिनिधि अथवा पेशवे आणि सेनापति याच्या-तील तेढनाव उभयपक्षी लौकिकाला कारण होतो असे का तुम्हाला वाटते ? सारा देश आज हे झगडे पाहून आम्हाला हसत आहे व मोंगलासारख्या परक्या शत्रूना आपल्या सत्तेची निघडलेली घडी पुन्हा बसवण्याच्या कामीं आमच्यातल्या दुहीचा पुरेपूर फायदा घ्यावयाला सापडून आमच्याच डाव्या हाताने उजवा हात तोडून टाकण्याची भेदनीतीची कला साधता येत आहे. वेळ अशी आहे की, आज निजामदेखील दाभाड्याना सामील होईल आम्हा सर्वांच्याच अंगी प्रतिपक्षाचे हे डाव ओळखण्याइतका शहाणपणा पाहिजे "

" हो ! पाहिजे हे खरें पण तो नाहींना ? एका हाताने काहीं टाळी वाजत नाहीं." आवजी कवडे म्हणाला, " हे सारे उपाय आम्ही गुजराथ–माळव्याकडे करून थकलों आहों " ते चिमाजीअप्पाकडे वळून म्हणाले, ' , जितक्या आपलेपणानें आम्हीं त्या प्रातात आमचा संचार सुरू केला होता, तितकाच आपलेपणा जर सेनापतींच्या सचारात असता, तर हा मुलुख आपल्या कमाईचा व हा पेशव्याचा, असा आपपरभाव त्याना सुचलाच नसता."

" पण पेशव्याचा मुलुख याचा अर्थ काय ? पेशवे काय किंवा सेनापति काय, एकाच छत्रपतींच्या गादीचे सेवक ना ? महाराजानीं कारभाराचा उरक व्हावा म्हणून

हाताखालच्या भिन्न भिन्न लोकाना भिन्न भिन्न प्रांतीच्या मुलुखगिऱ्या वांटून दिल्या, म्हणजे ते ते लोक त्या त्या प्रांताचे वतनदार झाले असे नाहीं कांहीं! बरें, राज्याची सुव्यवस्था लावण्यासाठी आम्ही सेनापतींच्या झेंड्याखालचा थोडा मुलुख आमच्या झेंड्याखालीं आणला व आमच्या झेंड्याखालचा काही मुलुख सेनापतींच्या झेंड्याखाली दिला, यांत आम्ही आमचा स्वार्थ साधला किंवा सेनापतींचा स्वार्थ बुडविला असे काही होत नाही!" बाजीराव म्हणाले, "इतका दूरदर्शीपणा सेनापतींच्या ठायीं अवश्य हवा होता."

"तेवढा दूरदर्शीपणा असता, तर गोष्टी आल्या त्या थराला आल्याच नसत्या. गुजराथ माळव्यात आम्हा मराठ्यांचा चांगला दरारा बसलेला असताना त्याचें अभंगत्व राखण्यासाठीं आमच्याच पक्षाच्या सेनापतींवर स्वारी करण्याचा प्रसंग मग आमच्यावर येताना तेव्हा जर सेनापति आमच्याशीं सलोख्याने व आपण सर्व हिंदूनीं मिळून हिंदुपदपादशाही स्थापन करण्यासाठी झटावयाचे अशा राष्ट्रैक्य भावनेने वागले असते, तर आमचे व त्यांचे पराक्रम एकमेकाना पूरक होऊन तेवढ्या उत्तरेकडील टापूत आम्ही बादशाही सत्तेचें चिटपाखरूंदेखील फिरकूं दिले नसतें, आणि मग प्रत्यक्ष दिल्लीच्या राजवाड्यावर हिंदुपदपादशाहीच्या बलाढ्य शक्तीचा निदर्शक असा भगवा झेंडा फडकविण्याचे पवित्र राष्ट्रकार्य आमच्या हयातीत देखतडोळा पार पडलें असतें" एवढें बोलल्यावर चिमाजीअप्पाच्या कंठीं गहिंवर दाटून आला ते क्षणभर थांबून दोनतीन उसासे सोडून पुढे म्हणाले, "पण ईश्वराची तशी इच्छा नाही, म्हणून आम्हाला एकीनें वागण्याची सुबुद्धि सुचत नाहीं असेंच म्हणावयाचें! दुसरें काय?"

"एकीचें एवढे माहात्म्य आहे हें तरी तुम्हाला कबूल आहे ना?" बाजिरावानीं विचारलें.

"हो! एकीचें महात्म्य कोण नाकबूल करील? पण एकीच्या गोष्टी ऐकून घ्यावयाला प्रतिपक्ष तयार असेल तेव्हाच्या गोष्टी!" चिमाजीअप्पा उत्तरले.

बाजीराव यावर गंभीर स्वराने म्हणाले, "अप्पा! सदिच्छा, दृढश्रद्धा व सतत प्रयत्न ह्या तीन शक्ति एकवटल्यावर त्याची अशी अमोघ महाशक्ति निर्माण होते कीं, त्या महाशक्तीचें कोडकौतुक पुरविण्यासाठीं साक्षात् परमेश्वरालाही आपलें सिंहासन सोडून यावें लागतें तुम्ही सारेजण आपण अजूनही दाभाड्यांना ताळ्यावर आणूंच आणूं अशा निश्चयानें व एकीच्या शुद्ध भावनेनें कधीं प्रयत्न

केले आहेत, ते मी योजिलेल्या प्रयत्नाना तुम्ही नांवें ठेवतां ? कोणत्याही गोष्टींत आपला भाव अगदीं शुद्ध–गंगाजलाप्रमाणें निर्मल असावा. उत्तरेकडे दाभाडयांनीं तुमच्या मुलुखगिरीला अडथळा केला, ही चूक त्यानीं हेतुपुरःसर केली असाच तुम्ही आपला ग्रह का करून घेता ? त्यात त्याचा गैरसमज झाला नसेल कशा-वरून ? तो गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न तुम्हीं कधींतरी केला आहे का ?"

" आम्ही एक प्रयत्न केला नाहीं, पण महाराजानीं व तुम्हीं आजवर काय थोडे थोडके प्रयत्न केले ? तुमची एक गोष्ट राहो, पण महाराजाचा शब्द तरी दाभाडयानीं मानावयाला नको होता का ? आता तुम्ही म्हणाल कीं, प्रयत्न केल्याने पाषाणालाही पाझर फुटतो, तर आम्ही साफ सागतो, परोपरींचे अपमान व उपहास सहन करूनही दाभाडयाची मनधरणी करण्याइतके आम्ही साधूही नाहीं व नेभळटही नाहीं. ज्याना तें काम साधेल त्यानीं ते खुशाल करावें" असें चिमाजीअप्पा बोलून गेले पण लगेच त्यांचें मन त्याना खाऊ लागलें कीं, आपण आपल्या वडील बंधूना हें काय बोलून गेलों ! त्यानीं जीभ चावली पण एकवार तोंडावाटे शब्द निघून गेला, तो माघारा थोडाच घेता येतो ?

बाजीराव त्या शब्दानीं न चिडता पूर्ववत् शांतपणाने म्हणाले, " मी नेभळट आहें, बावळट आहें असेंही पाहिजे तर म्हणा, पण सेनापतींशी सख्य करण्याचा अखेरचा प्रयत्न करून पहाणें हे माझें कर्तव्य आहे, व तें कर्तव्य मी जातीनें पार पाडणार तें कोणाला मान्य असो अथवा नसो"

इतका वेळ त्या विषयाचें चर्वितचर्वण झाल्यावर देखील बाजीराव आपला विचार सोडावयाला तयार नाहींत. असे पहाताच सर्वांना त्यांच्यासमोर हात टेंकण्याची पाळी आली

" माझा विचार तुम्ही सारेजण मान्य करणार, कीं दाभाडयांनीं जशी महा-राजांची देखील अवज्ञा केली तशी तुम्हीही माझी अवज्ञा करणार ? " बाजिरावानीं जरा थाबून पुन्हा करारीपणाने विचारलें

बाजिरावांचा हा प्रश्न सर्वांच्या जिव्हारीं जाऊन झोंबला सर्वजण त्या वेगा-सरसे उठून उभे राहिले व बाजिरावांना हात जोडून विनम्रपणें म्हणाले, " आपली अवज्ञा करावी अशी दुर्वासना आजवर कधीं आमच्या मनाला शिवली नाहीं व पुढेंही शिवणार नाहीं. उलट आपली व महाराजांचीही अवज्ञा दाभाडयांनीं केली,

म्हणूनच आम्ही एवढे निष्ठुर बनून त्या अरेरावाला त्याच्या अरेरावीबद्दल प्रायश्चित देण्याला उत्सुकलेले आहों "

" तर मग माझी योजना तुम्हा सर्वांना मान्य आहे असेंच मी धरून चालूं ना ? "

" होय पण श्रीमतांनी एक तरी करावें, ही कामगिरी पार पाडण्यासाठीं कोणाही योग्य माणसाला दाभाड्याकडे पाठवावें स्वतः काहीं जाऊ नये " नारायणजी ढमढेरे म्हणाले.

" श्रीमतांनीं काहीही म्हणावें, पण आमची एवढी तरी विनंति ऐकावी. आम्हाला सेनापतींच्या स्वभावाचा पूर्ण परिचय आहे. आपल्याकडील खाशा मंडळींला विश्वासघातानें जगावेगळें करतां आले, तर तेवढें करावयाला सेनापति कधींच मागेंपुढें पहाणार नाहीत म्हणून म्हणतो, बळी घेण्याची दुर्वासना त्यांना सुचलीच तर एखादें प्यादे बळी पडावें, मोहऱ्याला धक्का लागू नये " आवजी कवडे म्हणाले.

" ह्या तुमच्या म्हणण्याचा अर्थ लोकांनीं आपले बळी द्यावे व यश मात्र आम्हीं आमच्या पदरीं घ्यावें, असाच ना ? असल्या अगचुकारू वृत्तीनें आमचा लौकिक चांगला वाढेल म्हणावयाचा ! पण हें खरें का ? "

गोविंदपत कृष्णरावाला घेऊन आला तो पुढें जाण्याच्या संधीची वाट पहात बाजिरावाच्या मागे बैठकखान्यात कृष्णरावासह उभा होता. तो मागाहूनच उत्तरला, " श्रीमत ! हें अक्षरश. खरें."

" तुला रे काय माहीत ? " बाजिरावांनीं मागें वळून विचारलें.

गोविंदपंत पुढे होऊन कृष्णरावाला पुढें करून म्हणाला, " असल्या कुटिल कारस्थानांत कर्ता पुरुष म्हणून भाग घेण्याचें ज्या एका बाणेदार कुटुंबानें नाकारलें, त्या कुटुंबाचा एक कर्ता पुढारी हा पहा माझ्याबरोबर आला आहे तो याला साक्षी आहे."

प्रकरण सातवें

# नाग-नागीण

“ह्याच का तुझा मनुष्य ? ” बाजिरावानीं गोविंदपंताबरोबर आलेल्या कृष्णरावाकडे पहात गोविंदपंताला विचारले

“ होय सरकार ! ह्याच माझा मनुष्य ” गोविंदपंत उत्तरले

कृष्णरावानें बाजिरावाना भक्तिपूर्वक वंदन केले

“ काय रे ! सासुरवाडीचे सुख पुरे झाले का ? ” बाजिरावांनीं विनोदानें हसत कृष्णरावाला विचारले

कृष्णरावाला बोलावयाला तोंड कुठे होतें ? तो मुकाट्यानें खालीं मान घालून उभा राहिला बाजिरावानी पुन्हा त्याला विचारलें, “ आता तरी तू निष्ठापूर्वक नोकरी करण्यासाठीं आमच्या पदरीं आला आहेस, कीं मोघ्यानीं आपला गुप्त हेर म्हणून तुला इकडे पाठविले आहे ? ”

बाजिरावानीं वरचा प्रश्न अगदीं सहजगत्या विचारला पण तो कृष्णरावाच्या जिव्हारीं जाऊन झोंबला तो वर मान करून म्हणाला, “ सरकार ! आपण थोरमाणूस पडलां, काय पाहिजे तें बोलण्याची आपणाला मुभा आहे पण असली हरामखोरी करून स्वार्थ साधावयाचा असें एकवार म्हटल्यावर मग मला सर्वस्वावर लाथ मारून व अपमान सोसून आपल्या पायापाशी यावें लागलें नसतें आपणाला वाटत असेल कीं, जसे आपले कोल्हटकर तसाच मी पण माणसा माणसात देखील फरक असतो ”

“ तू म्हणतोस तें कोल्हटकरानीं काय केलें ? ” बाजिरावांनीं विचारले

“ आपणाला माहीत नाहीं ? ” गोविंदपंतानें विचारलें

“ नाहीं. ” बाजीराव उत्तरले.

“ आपली अजून मस्तानीबाईसाहेबाशीं गाठ पडली नसेल, म्हणून आपणाला ते कळलें नाहीं पण कोन्हेररामाच्या फितुरीबद्दल व इतर उपद्व्यापांबद्दल मुद्देमाल पुरावा त्यांच्या हातीं लागला आहे, एवढे आता येता येतां माझ्या कानीं आलें आहे ” गोविंदपंत उत्तरला.

“ केव्हांचा हा प्रकार ? ” बाजिरावांनीं विचारलें

"आज सकाळींच कोन्हेररामाची ही कारवाई चवाठयावर आली यापूर्वी मी त्याच्या लीला ऐकत होतों कीं, तो काशीबाईसाहेब व मस्तानीबाईसाहेब याच्यात सवतीमत्सर वाढविण्यासाठीं झटत आहे तशीं त्याची लक्षणेही मधूनमधून दिसून येत होतीं पण तो श्रीमंताच्या गळ्यातला ताईत होता, त्याच्याविरुद्ध बोलून माझा पत्ता आला नसता म्हणून मी बोललों नाही" गोविंदपंत उत्तरला

बाजिरावाना हा प्रकार ऐकून खेद वाटला व थोडासा रागही आला ते म्हणाले, "एकूण फूट आमच्या राजकारणी पुरुषातच आहे असे नाहीं आमच्या ससारातही फूट आहे बाकी, कोन्हेरराम काहीं तशा प्रकारचा मनुष्य नाही दोघी सवतींच्या भाडणात त्याचा मधल्यामध्ये चुराडा होत असावा"

"आपणच उभयता बाईसाहेबाविषयी असे बोलू लागल्यावर जग बोलेल यात नवल ते काय? मी मात्र याचा एवढाच अर्थ घेतों कीं, कोन्हेररामाचे ग्रह जोरावर आहेत त्याने हातीं माती धरली तरी तिचें सोनें होते." गोविंदपंत म्हणाला

"इतकीं तुम्ही कोन्हेररामाला का नावे ठेवता?" बाजिरावानी विचारलें

"ते ह्या कृष्णरावाला विचारा" असे म्हणून गोविंदपंतानें कृष्णरावाकडे वळून म्हटलें, "कृष्णराव! कोन्हेरराम तुला काय काय उपदेश करीत होते तें साग पाहू!"

कृष्णराव भीत भीत म्हणाला, "मी बिचारा गरीब माणूस, कोन्हेररामासारख्या मोठ्या माणसाविषयीं विरुद्ध मी कसें बोलूं? मातीच्या भाड्यानें धातूच्या भाड्याशीं टक्कर खेळू नये"

"तुझ्याच्याने सागवत नसेल तर मी सागतो" असे म्हणून गोविंदपंतानें स्वत आडवशाला उभा राहून ऐकलेली, व नतर देवकी, कृष्णराव वगैरे मडळींकडून ऐकावयाला मिळालेली सारी हकीकत बाजिरावाना सागितली त्याबरोबरच मोघ्याकडून बळिराम का माघारा आला वगैरे हकीकतही सागून झाली ती ऐकून बाजिरावांना पराकाष्ठेचा अचंबा वाटला कोन्हेररामाविषयींचा त्याचा पूर्वीचा ग्रह पालटला, व त्याच्या तोंडून ओघानें शब्द निघाले, "एकूण आम्हांला माणसाची परीक्षा नाहीं हेंच खरे."

नारायणजी ढमढेरे व आवजी कवडे इतका वेळ अगदीं स्तब्ध होते, त्याच्या जिभा आता बोलण्यासाठीं उतावळेपणानें तोंडातल्या तोंडांत चलनवलन करू लागल्या. आवजी म्हणाले, "तसे नव्हे कांहीं. पण एवढें मात्र खरें कीं, माणसाच्या अगीं

कोणत्याही गुणाचा अतिरेक झाला म्हणजे तोच दोषसा ठरतो. या न्यायानें आपल्या अगचा भूतदयेचा ओघ कोन्हेरराम व भास्करराम याच्यासारख्या उलट्या सुलट्या उडया मारणाऱ्या कोल्हाटयाकडे वळावयाला नको होता ''

" झाले ते होऊन गेले आता मला या प्रकरणाची कसून चौकशी केली पाहिजे तरी बरे कीं, परमेश्वराने वेळींच आम्हाला शुद्धीवर आणले '' बाजीराव उद्गारले

" परमेश्वराने नाहीं, कोन्हेररामाने शुद्धीवर आणले, याबद्दल आपण त्याचे आभार मानले पाहिजेत '' गोविंदपत म्हणाला

" कोन्हेरराम या वेळी वाडयात आहे का ? '' बाजिरावानी विचारले, " असला तर आताच आपण त्याची चौकशी करून ह्या बेदादीचा योग्य बदोबस्त करू ''

" तो इथे नसेल. मला वाटते, तो आता इतक्यात परत यावयाचा नाहीं पण मी तपास करतो बरे, ह्या कृष्णरावाला आपण आपल्या सेवेंत रुजू करून. घेतलें ना ? '' गोविंदपतानें विचारलें

" हो ! आजपासून मीं कोन्हेररामाला कामावरून दूर करून त्याच्या जागीं ह्याला मस्तानीबाईसाहेबाचा खासगी कारभारी नेमले आहे '' बाजीराव म्हणाले

नारायणजी ढमढेरे, आवजी कवडे व चिमाजी अप्पा हे तिघेही कृष्णरावाने आंत पाऊल टाकल्यापासून एकसारखे त्याच्या चयेकडे टक लावून पहात होते कृष्णराव सर्व मडळीला मुजरा करून गोविदपताबरोबर बाहेर जावयाला निघाला तेव्हां अप्पा गोविंदपताला म्हणाले, " गोविंदपत ! आज अनायासें सच्छील ब्राह्मण आपल्या पदरीं आला आहे, त्याला आज आपल्याकडेच रहावयाला सागा ''

" का बरें ? तुमचें त्याच्याशीं काहीं काम आहे का ? '' बाजिरावांनीं विचारलें.

नारायणजी ढमढेरे अप्पाऐवजीं उत्तरले, " तसे काम काहीं म्हणण्याजोगें नाहीं, पण—'' लगेच गोविंदपंताकडे वळून त्यानीं विचारले, " हा कृष्णराव तुमच्या पूर्ण विश्वासातील आहे ना ? ''

" हें काय विचारावयाला हवें ? ' गोविंदपत उत्तरले.

" झालें तर.'' नारायणजींनीं कृष्णरावाला विचारलें, " कृष्णराव ! श्रीमतांची चाकरी करून त्यांची मर्जी सपादन करावयाची तर वेळीं वखतीं श्रीमंताच्या जिवाला जीव द्यावयाची तयारी असली पाहिजे, माहीत आहे ना ? ''

कृष्णराव नम्रपणें उत्तरला, " मी इतक्या निष्ठेनें चाकरी करीन किंवा नाहीं

याचा सरकाराना अनुभव आहेच म्हणूनच सरकारांनीं मला आश्रय देण्याचें वचन देताना अशी शंकाही घेतली नाही ”

गोविंदपंत म्हणाले, “ नारायणजी ! सरकाराना तर माणसाची पारख आहेच, पण हा गोविंदाही भलत्याच माणसाविषयीं कधीं खात्री द्यावयाचा नाहीं, की कधी शिफारस करावयाचा नाहीं पतिव्रता स्त्रिया आपल्या पतीबरोबर सती जाऊन पत्नी या नात्याने आपल्या सेवाधर्माची परमावधीची सागता करून दाखवितील ; पण आमच्यासारखे सेवक धन्याप्रीत्यर्थ स्वत.चा प्राण देण्यासाठी स्वत.च्या हातानें स्वत च्या बायकोच्या कपाळींचें कुंकू पुसून पुढें येतील.”

“ त्याबद्दल माझी पूर्ण खात्री आहे नारायणजी ! तुम्ही त्याविषयीं मुळींच शका बाळगू नका ” बाजीराव म्हणाले

“ माझी तर सरकाराच्या व आपणा सर्वांच्या चरणापाशीं अशी विनति आहे कीं, त्यानीं माझा सेवाधर्म अशा कसोटीला लावून पहावाच.” कृष्णराव सर्वांना उद्देशून नम्रतेने पण स्वाभिमानानें म्हणाला “ आणि मला सरकारांनीं बैठी नोकरी न देता मर्दुमकी गाजविता येईल अशी नोकरी द्यावी ”

“ ठीक आहे ” अप्पा म्हणाले, “ आम्हाला आज अशाच स्वामिनिष्ठ सेवकाची गरज आहे तुला आम्ही तशी नोकरी देऊ ”

“ तुम्हा सर्वांच्या मनात काय आहे तें एकवार सागून टाका ना परतें ? ” बाजीराव म्हणाले त्यांना अप्पाच्या बोलण्याचा सशय आला

“ ते मी योग्य वेळीं सागेन सध्या कृष्णरावाला आज श्रीमंतांच्या पंक्तीचा लाभ घेण्यासाठीं थाबू द्या ” नारायणजी म्हणाले

गोविंदपंत व कृष्णराव पुन्हा एकदा सर्वांना मुजरा करून तेथून निघून गेल्यावर बाजीराव नारायणजी ढमढेऱ्याना म्हणाले, “ नारायणजी ! कृष्णरावाची तुम्हाला फारच कळकळ दिसते त्याच्यासाठीं तुम्हीं कांहींतरी एखादी जबाबदारीची कामगिरी योजिलेली दिसते.”

“ होय जबाबदारीची कामगिरी मीं त्याच्यासाठीं योजिलेली आहे खरी. पण ती जर त्यानें स्वीकारली, व आपणाला ती मान्य झाली, तर ! ” नारायणजी ढमढेरे म्हणाले

“ ती कोणती ? ” बाजिरावानीं विचारलें. त्यांच्या विचारविनिमयाला मस्तानीची विश्वासू दासी सुंदर हिच्या आकस्मिक आगमनानें खंड पडला. ती दासी थेट

चिमाजीअप्पांपाशीं येऊन म्हणाली, "मस्तानीबाईसाहेबांनीं आपणाला आताच्या आतां बोलविलें आहे"

"कां ? पुन्हा काय झालें ?" असें स्वतःशीं म्हणत चिमाजीअप्पांनीं त्या दासीला सांगितलें, "वहिनीसाहेबांना तू सांग कीं, मी कोन्हेररामाचा योग्य बंदोबस्त करण्याच्या विचारात आहें"

"तरी पण त्यांनीं आपणाला आताच्या आतां येऊन जाण्याला सांगितले आहे" दासी पुन्हा म्हणाली

"ह्या बायकानादेखील याच वेळीं अंतःपुरात बखेडे माजवावयाला फावले" असा त्रागा करीत चिमाजीअप्पा दासीबरोबर जावयाला उठले. बाजिरावांनीं त्यांना विचारलें, "अप्पा ! ही काय भानगड आहे ?"

"कांहीं विशेष नाहीं ते खासगी बखेडे आहेत, मी ते मिटवितों तुम्हीं त्यात मन घालण्याचें कारण नाहीं." असें म्हणून चिमाजीअप्पा तेथून निघून गेले त्याचीं दासीशीं जीं एकदोन प्रश्नोत्तरें झालीं, त्यावरून बाजिरावांनीं तर ही बाब सवतीमत्सराची असावी अशाविषयीं अचूक अटकळ केलीच होती, पण नारायणजी ढमढेरे व आवजी कवडे यानींही अंदाजानें तो प्रकार ओळखला. कारण पेशव्यां-च्या अंतःपुरातील बखेडे ही आतां कांहीं खासगी बाब उरली नव्हती पण त्या-विषयीं त्याच्यासारख्यानीं चौकशी करणें शिष्टाचाराला सोडून झालें असतें, म्हणून त्यानीं 'या कानानें ऐकलें व या कानानें सोडून दिलें' अशीच त्या बातमीची वासलात लावून तो विषय एकदम बदलला नारायणजी बाजिरावाना म्हणाले, "आपण स्वतः दाभाड्याची समजूत करण्यासाठीं जावयाचें ठरविले आहे ना ?"

"होय" बाजीराव म्हणाले, "मी जातीनें हें काम शिरावर घेणार याचें कारण असें कीं, एक तर दाभाडे फार मानी आहेत आपण कोणा दुसऱ्या गृहस्थामार्फत त्यांची समजूत करावयाची म्हटल्यास त्यात त्याना अपमान वाटेल तुमच्यापैकीं कोणाला तिकडे पाठवावें तर आधींच तुमचा व त्याचा उघड उघड बेबनाव झाला असल्यानें तुमच्या जाण्याचा कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं माझी अशी ठाम समजूत आहे कीं, दाभाड्याना आमच्या वाढत्या उत्कर्षामुळें स्वतःचा अपमान झालासा वाटतो त्याच्यासारखा बाणेदार मर्द मानापमानासाठी स्वतःची मानदेखील द्यावयाला मागेंपुढें पहावयाचा नाहीं. त्यांना मोठेपणा देऊन मी त्यांच्या भेटीला गेलों, तर त्यांचा संताप बराच शमन होईल व त्यांच्या-आमच्यांत युद्ध होण्याचा कटु प्रसंग बहुधा टळेल."

"आपणाला जर हा उपाय यशस्वी होईल असें वाटत असेल, तर आम्ही आपल्या विचाराआड येत नाही पण अजूनही आम्हाला असे वाटते कीं, आपण दाभाड्यावर इतका विश्वास टाकू नये कानीं आलेल्या ताज्या बातम्यावरून पहातां दाभाडे वेळी दगा फटका करावयालाही कमी करणार नाहीत" नारायणजी आवजीकडे वळून म्हणाले "आवजी ! मी म्हणतों हें खरे ना ?"

"अगदी खरें आम्हाला दाभाड्याकडील कारस्थानाचा जो सुगावा लागला आहे, त्यावरून मी असे खात्रीलायक सांगू शकेन कीं, दाभाडे श्रीमतांना दगा-फटका करण्याची वाटच पहात बसले आहेत" त्यात आणखी कृष्णरावाच्या हकी-कतीची ही नवी भर पडली आहे यावरून आपण योग्य तो बोध घेतला पाहिजे."

"तशी वेळ आलीच तर परमेश्वर माझा पाठीराखा आहे" बाजीराव म्हणाले.

"पण आपण जर सावधपणाने वागला, तर परमेश्वर आपली पाठ राखणार ना ! वाघ, सिंह हे बोलूनचालून क्रूर व हिंसक पशू ! त्याच्याशीं सख्य करण्यासाठीं त्याच्या गुहेत शिरणे हा काहीं सावधपणा नव्हे." आवजी म्हणाले

"तर मग हे साधावें कसे ?" बाजिरावानीं प्रश्न केला

नारायणजी म्हणाले, "युक्तीने साधलें तर सर्व काहीं साधेल"

"यावर तुम्ही तरी काय युक्ति लढविता ?" बाजिरावानी विचारलें

"काय युक्ति लढविता येते तें आपण आता पाहू. पण सर्वानुमते ठरेल त्याप्रमाणे वागण्याबद्दल आपले वचन मात्र मला आगाऊ पाहिजे आहे" नारायणजी म्हणाले.

"ठीक आहे. मी तुमच्या शब्दाबाहेर नाहीं, तुम्ही चार लोक ठरवाल त्याबाहेर मी जाणार नाहीं असें माझें वचन धरून चाला आता तरी सांगाना काय युक्ति तुम्ही लढविणार ती ?" बाजीराव म्हणाले

"अप्पांना येऊ द्या, त्याच्या आमच्या विचारें काय ठरवायचे तें ठरेल व मग आम्ही आपणाला सांगू पण त्यापूर्वी एका गोष्टीचा खुलासा आम्हाला पाहिजे आहे. आपली मोहीम एथून अशी चालूच ठेवावयाची, कीं दाभाड्याकडून तडजोडीचा निकाल लागेपावेतों इथेंच स्वस्थ बसावयाचें ?" आवजींनी विचारले

"वाः ! हे काय विचारतां ? दाभाड्यांशीं आपला समेट झाला तरी आपण दशदिशांना दिग्विजयी झालों असें नाहीं कांहीं ! बादशाहाच्या सुभेदारांनीं आपल्या माळवा गुजरार्थेतील प्रांतात जो धुमाकूळ मांडला आहे, तो शांतवून तेथें पुन्हा

आपली सत्ता प्रस्थापित करण्यासाठीं आपणाला ही मोहीम अशीच पुढें चालविलीच पाहिजे आता, दाभाडे शुद्धीवर येऊन आमच्याशीं सलोख्याने वागू लागले, तर त्याच्या कैक हजार फौजेची आपल्या फौजेला जोड मिळेल, व आपणाला ह्या एकाच मोहिमेन अभूतपूर्व असा उत्तर-दिग्विजय साधून हिंदुपदपादशाहीची आपली मनीषा थोडक्या दिवसात सिद्धीला नेता येईल दाभाडे म्हणजे काहीं सामान्य योद्वा नाही ते ह्या मोहिमेत आम्हाला सामील झाल्यावर दिल्लीची बादशहात नामशेष करण्याला कितीसा उशीर ! बरे, दुर्दैवाने दाभाडे वळले नाहीतच, तर त्याचें पारिपत्य आपणाला करावेंच लागेल यास्तव मोहिमेच्या तयारीत कोणत्याच प्रकारची ढिलाई होता उपयोग नाहीं. इतकेंच काय, पण ही तडजोडीची भाषाही आपल्या सैनिकाच्या कानी न जाईल तितकी चागली तेव्हा तुम्ही मनांत ही शंका मुळींच न धरता उद्यांच आपली तयारी जय्यत करा आज सायकाळीं आपली दसऱ्याची स्वारी जी निघावयाची, ती सीमोल्लंघन करून सगमापलीकडे तळ द्यावयाला जावयाची, व तेथून आपण उद्याच करून मजलदरमजल कूच करीत उत्तरेच्या दिशेने मार्गाला लागावयाचे ''

दाभाड्याबाबतचा एवढा विचार ठरल्यावर नारायणजी ढमढेरे व आवजी कवडे हे दोघेही त्याचा निरोप घेऊन तेथून जावयाला निघतात, तोंच गोविंदपत व कृष्णराव कोन्हेररामाला बरोबर घेऊन तेथें आले कोन्हेररामाने भीत भीत बाजिरावाकडे पाहिलें, तो त्याला त्याची मुद्रा उग्र दिसली. त्यावरून त्यानें ओळखले कीं, 'गोविंदपत व कृष्णराव यानीं आपल्यापूर्वी इकडे येऊन आग-लावालावाची आग लावली असली पाहिजे, आता आपल्या अन्यायाचा घडा भरला'

" कोन्हेरराम ! " बाजीराव म्हणाले, " तू कोणत्या गुरूचा चेला रे ? "

" म्हणजे काय ? सरकारानी काय विचारलें तें मला कळलें नाहीं " कोन्हेरराम भीत भीत उत्तरला.

" नव्हे, 'मधु तिष्ठति जिव्हाग्रे हृदये तु हलाहलम्' अशा प्रकारची तुझी वृत्ति आगचीच आहे, कीं ती अलीकडे बनली आहे ? " बाजिरावांनीं पुन्हा जास्त चिडून प्रश्न केला, " माझ्या पदरीं राहून माझ्या नाशाची तयारी तू चालवितोस काय ? आणि माझ्या अंतःपुरांत बखेडे माजवितोस ? "

" आपल्या नाशाची तयारी आणि मीं चालविली आहे ? " कोन्हेररामानें संशयी मुद्रेनें कृष्णराव व गोविंदपत यांच्याकडे रोखून पहात विचारलें.

"तें त्या कृष्णरावाला विचार" बाजीराव उत्तरले.

"हूं !" कोन्हेरराम विचारपूर्वक हंसत म्हणाला, "आतां आलें माझ्या ध्यानीं याचें कारण असें कीं, सरकार ! आता एथला माझा अन्नोदकाचा ऋणानुबंध तुटणार अशीं लक्षणें मला दिसू लागलीं आहेत —"

"म्हणून जाता जाता ही कारवाई चालविली आहेस वाटतें !"

"तसें नव्हे, सरकारानीं क्रोधवश न होता मी काय म्हणतों तें शांतपणें ऐकून घ्यावें—"

"पहिली गोष्ट,-तू माझ्या नाशाचे उपाय चालविले आहेस किंवा नाहीं, याचें उत्तर मला दे"

"पण सरकार शातपणे मी काय म्हणतों ते ऐकून घेतील तर माझ्यावर सरकाराची मोठी मेहेरबानी होईल"

"तू तसें केलेंस किंवा नाहीं ?"

"नाहीं"

"नाही ?"

"नाहीं"

कोन्हेररामानें आपल्यावरील आरोपाचा द्विवार स्पष्ट इन्कार केलेला ऐकून कृष्णरावानें त्याला सूचक अशी नुसती हांक मारली, "कोन्हेरराम !"

कृष्णरावाच्या हाकेला उत्तर न देता त्याच्याकडे नुसता एक तीव्र नेत्रकटाक्ष फेंकून कोन्हेरराम बाजिरावांना म्हणाला, "सरकार ! ही आग प्रथम कुठें कोणीं लावली हें मला कळतें आजकाल ह्या दगलबाज दुनियेंत कुणाचें भलें म्हणून करण्याची सोय नाही असे असता मी कृष्णराव वगैरे मंडळीचें बरें भलें करण्याच्या भरीं पडलों, म्हणूनच तोंडघशीं पडण्याची पाळी माझ्यावर येऊं पहात आहे"

"सरकार ! 'चोरांच्या उलट्या बोंबा' म्हणतात त्या ह्या ?" कृष्णराव चिडून म्हणाला.

"मी कृष्णरावापाशीं सरकारांविरुद्ध कांहीं गोष्टी सकृद्दर्शनीं बोललों हें खरें पण मी सरकारांचा विश्वासू सेवक आहें मी मनांत काहीं सद्धेतु धरूनच कोणतीही गोष्ट करीत असेन, असा माझ्या ठायीं सरकाराचा विश्वास नसावा, याबद्दल मात्र मला फार वाईट वाटतें सरकारांनीं असें पहावें कीं, मला जर सरकारांच्या नाशाचीं कारस्यानेंच रचावयाचीं असती, तर तीं मीं अशा बेभरंवशाच्या नवख्या माणसापाशीं कशाला रचिलीं असतीं ?"

" मग कृष्णरावापाशी तसें बोलण्यांत तुमचा उद्देश तरी काय होता ?" गोविंदपंतानें मध्येंच विचारलें

कोन्हेरराम गोविंदपताच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष्य करून पुढें बोलूं लागला, " सरकाराच्या अतःपुरातील बखेड्यांत माझ्यासारख्या क्षुल्लक भोळ्या सेवकाची विनाकारण वाताहात उडावयाची, म्हणूनच केवळ त्या बाबतींत मला काहींदेखील बोलावयाचें नाहीं सरकारानीं अशी कल्पना करावी कीं, मला मस्तानीबाईसाहेबाची अमुक एक प्रकारची वर्तणूक पसत पडली नाहीं, तरी ती पसंत नाहीं असें म्हणण्याचा मला काय अधिकार ? आता विनाकारण सरकारांच्या अतःपुरात सवतीमत्सराचा वणवा पेटून त्या वणव्यांत सरकारांच्या गृहसौख्याची राखरागोळी होऊ नये, ह्या सद्धेतूनें मी कधीं एखादा शब्द बोललो असेन, नाहीं असें नाहीं पण मी एक यःकश्चित सेवक ! माझ्या दुर्बळाच्या बोलांना चव किंवा मोल कोठून येणार ! त्याचा असा विपर्यास होणार हें मला प्रथमच माहीत होतें एवढें मात्र खरें कीं, माझ्यासारख्या भोळ्या व निस्पृह माणसाचा सध्याच्या परिस्थितींत आपल्या पदरीं टिकाव लागावयाचा नाहीं म्हणूनच मी आपण होऊन 'झांकली मूठ सव्वा लाखाची' राखण्यासाठीं ह्या नोकरीवर पाणी सोडावयाचा विचार करूनच कृष्णरावाकडे गेलों —"

" पण हा कृष्णराव सागतो याला तुझें उत्तर काय ते तर सांग ना !" बाजिरावांनीं त्रासिक स्वरात दरडावून विचारलें

कोन्हेरराम हळू स्वरात साळसूदपणें उत्तरला, " सरकार ! पराचा पारवा व राईचा पर्वत करून माझा सत्यनाश करण्याच्या हेतूनेच जिथें प्रत्येक कारस्थान रचिलें जात आहे, तिथें माझ्या प्रत्येक सद्धेतूचा असा अनर्थकारक विपर्यास व्हावयाचाच " तो कृष्णरावाकडे दबा धरून बसलेल्या जखमी सर्पाप्रमाणें टवकारून पहात म्हणाला, " कृष्णराव झाला तरी माझ्या लोभातील माणूस आहे. त्याचें कल्याण व्हावें हीच माझी इच्छा केव्हांही असणार पण तो मोघ्यांचा जांवई आहे व मोघे आज आपल्या अहितावर टपून बसले आहेत, हा संबंध ध्यानीं घेऊन मीं त्याचा प्रामाणिकपणा आजमावून पहाण्यासाठीं त्याच्यापाशीं दुटप्पीपणाची भाषा केली हें खरें. मला त्यात त्याच्या मनाचा अंत पहावयाचा होता. दाभाडे, मोघे, कोल्हापूरकर, निजाम वगैरे मंडळीच्या हेरांचा आज सर्वत्र इतका सुळसुळाट झाला आहे कीं, सरकार ! स्वतःच्या लग्नाच्या बायकोवर, पाठच्या सख्या भावावर किंवा पोटच्या

पोरावरही विश्वास टाकणे आजकाल अत्यत मुष्किलीचें झाले आहे मला कृष्णरावाला आपल्या पदरीं नोकरी लावून द्यावयाची होतीच पण त्यापूर्वी त्याच्या विश्वासूपणाविषयीं स्वत ची खात्री करून घेणे हे माझें कर्तव्य होते तो जर पुढें मागे वावगा वागला असता, तर तो दोष माझ्या माथीं आला नसता का ? ”

गोविंदपत इतका वेळ स्वस्थ होता, तो आता म्हणाला, “ कोन्हेरराम ! सरकार कृष्णरावाला ओळखनात. त्याला नीट वागविणारे व त्याच्या हातून अपराध घडला तर त्याबद्दल त्याचा जाब विचारणारे अनेक लोक आहेत ती पाळी तुमच्यावर कधीच यावयाची नाही मात्र तुम्ही आता हेराविषयींची गोष्ट बोलला ती लाखातली गोष्ट बोलला तुमच्याआमच्यासारखे बाहेरून साळसूद दिसणारे लोकच शत्रूचे हेर असण्याचा फार सभव आहे ”

“ मग काय, मी शत्रूचा हेर आहें असे तुमचें म्हणणे ? ” कोन्हेररामानें चिडून विचारलें

“ तसें लोक म्हणतात, मी काहीं म्हणत नाहीं ” गोविंदपंत उत्तरला, “ आणि पाचामुखीं परमेश्वर अशी म्हण आहे हें तुम्हालाही माहीत आहे ”

“ सरकार ! माझ्यावर हें निव्वळ कुभाड रचण्यात आलें आहे ” कोन्हेरराम रागाला येऊन म्हणाला, “ मला नोकरीची पर्वा नाही शाहूमहाराजाचें राज्य आहे तोपर्यंत आम्हांला कशाचीही उणीव नाहीं. मी स्वतःच नोकरी सोडण्याचा माझा मनोदय मघाच स्पष्ट केला आहे पण श्रीमत पेशवेसरकाराच्या अमदानींत प्रत्यक्ष त्यांच्या घरात एवढी अधाधुदी माजावी, याचे मात्र मला आश्चर्य वाटतें ”

“ मलादेखील तें आश्चर्यच वाटतें. पण तुम्हाला काय किंवा मला काय, दोघांनाही वास्तविक त्यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. तुम्हाला तुमच्या स्वत.वरुन जगाची पारख चांगलीच करता येईल जशी तुम्हीं आमच्या घरात अंदाधुंदी चालविली आहे, तशीच इतरही चालवीत असतील, त्यात आश्चर्य तें कसलें ? बरें, माझ्याविषयीं म्हणाल तर दोन महिन्यांपूर्वी भास्कररामाची दगलबाजी माझ्या नजरेला आली, तेव्हाच मीं वास्तविक तुमच्या दगलबाज वंशाचीं पाळेमुळें देखील खणून काढलीं पाहिजे होतीं. विषाच्या वेलीला अमरवेलीसारखें उदंड आयुष्य असतें असें म्हणतात; विषवेलीचा बारीकसारीक अकुर राहूं दिला तरी तो पुन्हा आजूबाजूंच्या वेलींच्या मुळांतून रस शोषून घेऊन फोंफावतो व फोंफावल्यावर त्याच वेलींना आपल्या विषदाहानें दग्ध करतो घातकर्म्या दुष्ट

माणसांचे असेंच आहे हें माहीत असतांही मला तेव्हा भास्कररामाला क्षमा करण्याची बुद्धि झाली तुम्हीही त्यांचे भाऊ! मीं बायकाच्या बोलाना मानून तुम्हाला एवढ्या पदाला चढविले सर्पविंचवाच्या विषारीपणाची ओळख जगजाहीर असतांही मी जर त्याना लडिवाळपणे माझ्या अंगाखांद्यावर खेळू दिले, तर ते आपल्या गुणावर गेल्यास त्यात आश्चर्य कसलें! पण याउपरही तुम्हीं एवढे लक्षात ठेवावयाला हवे होते कीं, जशी सर्प विंचवाना जोपासण्याइतकी भूतदया, तशीच लायेच्या एका ठोकरीखालीं त्याना रगडून टाकण्याची ताकदही माझ्या ठायीं आहे. शाहूमहाराजाचे भय कोणाला घालता? मला?"

"नाहीं सरकार! मीं आपणाला भय घातले नाहीं माझी चूक झाली, मला क्षमा करा" कोन्हेरराम अगदी गोगलगाय होऊन बाजिरावाच्या पाया पडून डोळ्यात आसवे आणून म्हणाला, "तोंडून उच्चारले जाऊ नयेत ते शब्द माझ्याकडून उच्चारले गेले खरे निरपराधी माणसावर भलभलते आरोप हकनाहक शाबीत होऊ लागले की, त्याला भान नाहींसें होऊन तो असा त्रागा करावयाला तयार होतो"

"पण निरपराध्याच्या त्राग्यापेक्षा अपराध करण्यांत निर्ढावलेल्या बेरडाचा कांगावाच जास्त जोराचा असतो, हेंही मला कळतें म्हणूनच मी तुम्हाला तुमच्या अपराधाबद्दल तोफेच्या तोंडीं—"

बाजिरावाच्या तोंडून शिक्षेचा उच्चार होण्यापूर्वीच एक स्त्री मागाहून घाई घाईने धावत पुढें आली व बाजिरावासमोर गुढगे टेकून, पदर पसरून व काकुळतीला येऊन विनवू लागली, "सरकारानीं माझ्याकडे—माझ्या कुंकवाकडे पाहून तरी त्याना क्षमा करावी शाहूमहाराजानी मला आपली धर्मकन्या मानले आहे, व सरकारानाही महाराज पित्याच्या ठायीं पूज्य आहेत. सरकारानीं आपल्या ह्या बहिणीला चुडेदान द्यावें"

ती स्त्री कोन्हेररामाची बायको कावेरीबाई होती, हें वाचकानीं ओळखलें असेल. तिची प्रार्थना ऐकून बाजिरावाचें मन द्रवलें ते अंमळ शांत होऊन कोन्हेररामाला म्हणाले, "जा! तुम्हाला मी तुमच्या बायकोच्या कुंकवाकडे पाहून जीवदान देतो मात्र तुम्हीं आज सूर्यास्ताच्या आंत पुणें सोडून गेलें पाहिजे. ह्या हुकुमाची तामिली झाली नाहीं, तर मात्र तुम्ही आमच्या क्रोधाला बळी पडाल, याद राखून रहा!"

अगदीं प्राणावरच बेतलें होतें तें हद्दपारीवरच निभावलें, यांतच कोन्हेररामाला हायसें वाटलें. तो खालीं मान घालून मुकाटपणें तेथून बाहेर पडला. कावेरी त्याच्या मागोमाग गेली हें सांगावयाला नकोच कोन्हेररामाच्या प्रत्येक कारस्थानांत कावेरी त्याच्या उजव्या हाताप्रमाणें वावरे हें एका गोविंदपंताशिवाय दुसऱ्या कोणालाही माहीत नसल्यानें त्या सर्वांनीं मनांतून तिची कींव केली गोविंदपंत मात्र त्या दोघांना बाहेर जातांना पाहून स्वतःशीं म्हणाला, "हें नाग-नागिणीचें जोडपें आज दुखविलें गेले आहे, तें मनात दावा धरील यात संशय नाहीं"

# प्रकरण आठवें

## डोहाळेजेवण

कृष्णराव आता येईल, मग येईल, म्हणून देवकी, बळिराम व अर्थात् राधाही त्याच्या वाटेकडे चातकाप्रमाणें डोळे लावून बसलीं होतीं योगायोगानुसार आज तीनही मुले सणाचीं अचानक एकत्र जमलेलीं पाहून देवकीच्या आनंदाला भरती आली होती आणि त्यातल्या त्यांत आज कृष्णराव रोजगारी होणार असल्यानें तर तिच्या आनंदाला सीमाच उरली नव्हती सभोंवार असें आनंदाचें जिवंत वातावरण उत्पन्न झालें, कीं माणसाचें मन साहाजिकपणेंच उष कालीं उमलणाऱ्या पुष्पाप्रमाणें प्रफुल्ल होऊन त्यातून परमानंदाचा सुवास दशदिशाना दरवळू लागतो देवकीचें आज तसेंच झाले होतें जितकें तिला सर्व मुलें एकत्र जमल्याने व कृष्णरावाला पेशव्यांच्या पदरीं नोकरी लागणार असल्यामुळे कौतुक वाटत होतें, तितकेंच— किंबहुना त्याहीपेक्षा जास्त कौतुक तिची सून गर्भवती झालेली पाहून वाटत होतें. स्त्रीजातीला निसर्गत.च मुलाबाळांचा हव्यास फार स्वतःच्या पोटासाठी गोळाभर अन्न घरात नसलें तरी त्या उपासमारींतही त्यांची अपत्यलालसा कधींच मरत नाहीं, इतकेंच काय पण मलूलही होत नाहीं 'स्वतःच्या पोटाला मिळत नाहीं, आणि पोरे बाळें कशाला हवीं?' असें स्त्रियाना कोणीं म्हटलें तर तेंही त्याना खपत नाहीं. आतां, आजच्या विसाव्या शतकातील प्रकार काहीं निराळा असेल, शिक्षणामदिरा पिऊन त्या मदिरेचा अंमल डोळ्यावर चढलेल्या आजकालच्या कांहीं स्त्रियांना अपत्यवती होणें ही मोठी अडचण कदाचित् भासत असेल. पण ज्या काळची ही गोष्ट आहे,त्या काळीं तरी कोणाही स्त्रीला तसें वाटत नव्हते,व देवकी त्या सर्वसामान्य स्त्रीसमाजाला अपवाद नव्हती अठरा विस्वे दारिद्र्यातच तिचा जन्म झाला, बाळपण- ही तसेंच गेले तिचें लग्न तशाच स्थितींत झालें, व ती अपत्यवती झाली तीही तशाच स्थितींत. असा सारा जन्म तिनें काबाडकष्टात काढून आपल्या अपत्यांचें संगोपन केलें होतें. परमेश्वरानें तिच्या प्रयत्नांना यश देऊन तिचीं मुलें साभाळून लहानाचीं मोठीं केलीं, तीं मिळवतीं झालीं, तेव्हा दुसरी हुरहुर तिच्या मनाला लागली कीं, माझ्या मुलाचे दोन हातांचे चार हात एकदाचे कधीं होतील ? परमेश्वरानें तिची तीही हाक ऐकली व तिची इच्छा अर्धवट का होईना पण पूर्ण केली. वडील मुलगा बळिराम लग्नाचा राहिला तरी धाकट्या कृष्णरावाचें लग्न झालें

व तिच्या घरांत दिवा लागला. सून घरीं आल्यावर ओघानेंच देवकीच्या अपेक्षेनें आणखी एक पायरी गांठली. देवकीला चिंता पडली कीं, देव मला नातू केव्हां देईल ! ती देवकीची इच्छाही आतां सफल व्हावयाच्या रंगाला आली होती. राधा गर्भवती आहे असें कळतांच तिने हर्षभरित अंतःकरणानें 'देवा ! माझ्या सूनबाईला मुलगा होऊं दे' असें देवाला आळविण्याला सुरुवात केली होती. आपली ही हांकही देव ऐकेल असा तिला पूर्ण भरंवसा वाटत होता.

आज राधा घरीं आल्यावर देवकीच्या मनांत पहिला विचार जर कोणता आला असेल तर तो हा कीं, आतां सूनबाईचें बाळंतपण आपण घरींच करूं. पण कृष्णराव आतां पेशव्यांबरोबर नोकरीवर जाणार, तो सूनबाईच्या डोहाळेजेवणाला व ती बाळंत होईल तेव्हांतरी माघारा परत येईलच अशी खात्री नसल्यानें आजच्या दसऱ्याच्या सुमुहूर्तावर तिने सूनबाईच्या डोहाळेजेवणाचाही सोहळा उरकून घ्यावयाचें ठरविलें. हा सुंदर विचार देवकीच्या मनांत यावयाला एक क्षणाचाही विलंब लागला नाहीं. पण डोहाळेजेवण करावयाचे म्हणजे त्याला कांहीं खर्च लागतो; तो ती बिचारी कोठून करणार ? पण देवकीनें तो खर्चाचा प्रश्नही चुटकीसरसा सोडविला. साऱ्या जन्मांत कवडी कवडी सांठवून तिनें एक मोहोर जवळ केली होती. तिच्यावर वैधव्याचा दुर्धर प्रसंग येण्याच्या पूर्वीपासून ती मोहोर तिच्याजवळ होती. त्यानंतर तिने अन्नावांचून कैक दिवस काढले असतील, पोटच्या पोरांना अर्धपोटीं जेवूं घालून स्वतः उपाशीं राहिली असेल; पण ती मोहोर कांहीं तिनें मोडली नव्हती. ती मोहोर तिनें आज मोडून त्यावर आजचा सण साजरा करावयाचें ठरविलें व ती बळिरामाच्या स्वाधीन करून त्याला बाजारांत पाठविलें. बळिरामानें हौसेनें ती कामगिरी पार पाडली. राधा हें सारें पाहात होती, व संकोचित नम्रपणानें 'इतका त्रास आपण घेऊं नका' असें देवकीला वारंवार सांगत होती. पण देवकी तिचें थोडेंच ऐकते ! उलट तिनें त्या दिवशीं राधेला घरांतील कांहींदेखील काम करूं दिलें नाहीं.

त्या सास्वा-सुनांच्या नाना प्रकारच्या गप्पागोष्टी चालल्या असतां हां हां म्हणतां दुपार झाली. भोजनाची सारी सिद्धताही झाली. पण कृष्णरावाचा पत्ता नाहीं. दोघीही सास्वासुना त्याच्या वाटेकडे चातकाप्रमाणें डोळे लावून बसल्या होत्या. अखेर त्यांनीं बळिरामाला कृष्णरावाचा शोध करण्यासाठीं पाठविलें. अंमळशानें कोन्हेरराम व कावेरीबाई भास्कररामाच्या घरीं आल्याचें त्यांना कळलें, तेव्हां देवकी व

राधा यानी मोठ्या आशेने त्याच्याकडे जाऊन कृष्णरावाविषयीं चौकशी केली पण त्या चौकशींत त्यांना फारच कडू अनुभव आला कृष्णराव केंव्हा येईल अथवा कां आला नाहीं, याबद्दल काहींच बातमी न मिळतां उलट त्या दोघींना कोन्हेर-राम व कावेरी ह्या दोघांच्या तोंडच्या शिव्याशापाचा अग्निवर्षाव मात्र सहन करावा लागला त्या शिव्याशापात गोविंदपत व बाजीराव हे दोघेही वांटेकरी होते. तें खव्याळ जोडपे त्या मंडळीला नुसत्या शिव्या देऊनच थांबले नाही, त्या दोघानींही तेंव्हाच त्या मंडळीवर सूड घेण्याचीही प्रतिज्ञा केली बळिराम तेंव्हां घरात होताच. त्याला हा प्रकार सहन झाला नाहीं व प्रकरण हातघाईवर आलें. ते भांडण देवकीला मध्यें पडून कसेबसें मिटवावें लागलें पण देवकी, राधा व बळिराम याच्या जिवाला त्या क्षणापासून एक नवी बोंचणी लागून राहिली कीं, हीं चवताळलेलीं नवराबायको काय करतील व काय नाहीं नकळे!

'बुडत्याला काडीचा आधार' या न्यायानें वरच्याप्रमाणे खटका उडाल्याबर भास्करराम बाहेरून घरात आला घरधनी या नात्यानें देवकीचा अजूनही त्याच्या-वर बराच विश्वास होता हा विश्वास अनेक दिवसाच्या निकटसहवासानेंही उत्पन्न झालेला असेल कदाचित्, पण कोन्हेरराम व कावेरी याच्यापासून आपणाला कांहीं उपसर्ग पोंचणार नाही अशी तजवीज भास्कररामामार्फत करण्याचे देवकीनें ठर-विलें पण राधेनें तिचा तो विचार ऐकला तेंव्हाच तिला बजावले की, भास्कररामा-चा या कामीं काहींच उपयोग व्हावयाचा नाही, उलट त्याच्यामुळें काहीतरी अपकार मात्र होईल

देवकीला राधेचे बोलणें रुचले नाही तिने तिला उपदेश केला "सूनबाई! मुगी होऊन साखर खावी व हत्ती होऊन लाकडे मोडावीं तुला अजून कळत नाही आपला आज पडता काळ आहे, आपण ज्याच्या त्याच्याशीं जरा नमूनच वागायला हवे"

राधा देवकीच्या ह्या उपदेशावर काही प्रतिशब्द बोलली नाहीं प्रतिशब्द न बोलताही तिला देवकीची भास्कररामाविषयीं समजूत करून देता आली असती, लग्नापूर्वीच्या तिच्या आयुष्यातील भानगडींचा इतिहास भास्कररामाचे खरे स्वरूप कोणालाही कळविण्याला पुरा पडला असता पण त्या भानगडींत स्वत राधाही काही अशीं दोषी होती भास्कररामाच्या अगावर चिखल उडविण्यासाटीं तिनें सत्यकथनाचा दगड त्या चिखलात फेंकला असता तर त्या चिखलानें ती स्वतःच थोडीफार माखून

निघाली असती स्त्रियाचें आचरण गंगाजलाप्रमाणें निर्मल असलें तरी खोट्या नाट्या अपवाद कर्दमानें ते गंगाजल तेव्हाच गढूळ होऊं शकतें, हें कळण्याइतकी राधा प्रगल्भ बुद्धीची असल्यानें तिनें त्या भानगडी आजवर अगदी गुप्त ठेवल्या होत्या. भास्कररामही स्वतःच्या अब्रूच्या भयानें तो प्रकार गुप्त ठेवण्याविषयी राधेइतकीच खबरदारी घेत होता पण तो कसा झाला तरी पुरुष माणूस होता तसला प्रकार चवाठ्यावर आल्यानें त्याच्या नागड्या पिचणार नाहीत, पण आपली मात्र सर्वत्र बदनामी होऊन आपणाला जन्मातून उठावें लागेल, हें ओळखून राधा लग्नापूर्वीपासून आजवर अत्यंत भिऊन वागत होती ह्या भिऊन वागण्याचें पथ्य फार अवघड होतें नुसता त्या गोष्टीचा उच्चार न करण्यानें तें यथातथ्य पाळलें जाईल असें नाही, त्याबरोबरच आपण भास्कररामाविषयी कारणासाठी अथवा कारणाशिवायही काही अप्रिय बोलता कामा नये, ही आपणावरील जबाबदारी ओळखून ती पूर्णपणे पार पाडण्यात राधा नेहमी चूर असे आज ती देवकीच्या शब्दावर प्रतिशब्द बोलली नाही ती तरी यामुळेच

काही वेळानें भास्करराम घरी आला, तो आपण होऊनच देवकीनें बोलावण्यापूर्वी तिच्याकडे आला देवकीला वाटलें कीं, हा किती सज्जन माणूस आहे ! आपण न बोलावता आपल्या घरी आला देवकीला तसें वाटणें साहजिक होतें आज इतके दिवस ती भास्कररामाच्या घरात बिऱ्हाड करून रहात होती, तरी तिनें आपण होऊन भास्कररामाच्या घरीं जावें तेव्हा त्यानें तिच्याशीं चार शब्द बोलावे तो कधी आपल्या बिऱ्हाडी येत नाहीं म्हणून देवकीलाही वाईट वाटत नसे 'आपण गरीब माणसें, भास्करराम आपल्यासारख्याच्या बिऱ्हाडी कशाला येतील ! आपणच त्याच्या घरीं जाणे योग्य' अशी देवकी आपल्या मनाची समजूत घालून आजवर वागे तोच भास्करराम आज आपण होऊन भेटावयाला आलेला पाहून देवकीला आनंद तर वाटलाच, पण त्याबरोबर एक प्रकारच्या नसत्या मोठेपणाचे वारे तिच्या अंगात शिरलें आपला मुलगा आता पेशव्याचा आश्रित होणार व तो दिवसेंदिवस मोठा माणूस होत जाणार, हें पाहून भास्करराम आजपासूनच त्याच्याशीं बरोबरीच्या नात्यानें वागू लागला असला पाहिजे, अशी तिची समजूत झाली तिनें राधेपाशीं हळूच दोन शब्दांत तसें बोलूनही दाखविलें

राधेची कल्पना मात्र सकृद्दर्शनीं अगदींच निराळी झाली कोन्हेररामाशी आपलें थोड्या वेळापूर्वी जें भांडण झालें, त्या भांडणाचा जाब विचारण्याचें निमित्त

करून जुन्या उखाळ्यापाखाळ्या उकरून काढण्यासाठीं भास्करराम आला असावा असे तिला वाटून तिच्या मनाला तेवढी हुरहूर उगाच लागून राहिली

पण सकृद्दर्शनी तरी अनुभव अगदी निराळा आला देवकीची कल्पना तिच्या कल्पनेबाहेर खरी ठरली व राधेचा संशय कल्पनातीत खोटा ठरला

" देवकीकाकू ! " भास्करराम तेथे येताच देवकीला प्रेमळ शब्दाने हाक मारून म्हणाला, " तुम्हाला वाटल असेल कीं, मी माझ्या भावाची बाजू घेऊन तुमच्याशीं भांडावयाला आलो, होय ना ? " नंतर मध्येच राधेकडे पहात पुढे म्हणाला, " तर ती तुमची शंका फोल आहे भाऊ व भावजय माझी झाली तरी गैरशिस्त वागतीत मी त्याची कड कधींच घेणार नाही मनुष्याच्या रागाला डोळे नसतात, रागाच्या सपाट्यात मनुष्य बोलू नये ते बोलून जातो पण मागाहून त्याला पश्चात्ताप होतो घरी आल्यावर मला सारा प्रकार कळला, त्यावरून हा केवळ समजुतीचा घोटाळा आहे अशी माझी खात्री आली मी कोन्हेररामाची व कावेरीवहिनींचीही समजूत घातली व त्याची समजूत पटली आहे आता तुम्ही त्याच्याविषयीं कांही किल्मिष मनात ठेवू नका असे सांगावयाला मी आलो आहे "

भास्कररामाचे हे बोल देवकीला व राधेलाही अत्यंत सज्जनतेचे वाटले राधेचा ग्रह पूर्वीच्याहून बराच म्हणजे पुष्कळच पालटला जशी सासूबाईची तशीच आपलीही माफी त्यानं मागितली असाच तिने त्याच्या बोलाचा अर्थ घेतला व म्हटले, ' आम्ही गरीब माणसे, मनात किल्मिष ठेवून आमचे कसे चालेल ? तुमच्यासारख्या थोरानाच आमच्यासारख्या गरिबाविषयीं मनं उदार ठेवून मेहेर-नजर ठेवायची असते "

राधेच्या बोलण्याचा गर्भितार्थ देवकीला समजला नाहीं, पण भास्कररामाला समजला तो समाधानपूर्वक म्हणाला, ' राधे ! झाले गेले सारे विसरून जर आपण सारीं जणें वागलों, तर किती चांगले होईल ! "

राधा पुन्हा म्हणाली, " तसे वागणें आम्हा गरिबाच्या हातीं, पण वागवून घेणें तुम्हा मातबराच्या हातीं असतें "

देवकी म्हणाली, " एकूण कोन्हेरराम व कावेरीबाई यांच्या मनातला आमच्या-विषयीचा राग आता तरी दूर झाला ना ? "

" हो ! झाला मी त्याची समजूत घातली " भास्करराम उत्तरला

" तर मग मी त्या दोघाना पुन्हा एकवार भेटणार आहें." देवकी म्हणाली.

भास्करराम हसून म्हणाला, "पण ती दोघेंही बाहेरगावीं निघून गेलीं !"

"अशा सणवारीं घर सोडून निघून गेलीं ?" राधेनें विचारलें

"हो ! त्याना जाणे भागच पडलें पेशव्यानीं त्याना हद्दपारीची शिक्षा दिली; एकदा धन्याचें मन विथरल्यावर तो काय करील व काय नाहीं याचा कोणीं नेम सांगावा ! आधींच पेशव्याच्या मनांत माझ्याविषयी वितुष्ट आहे. तशांत त्याच्या दृष्टीने गुन्हेगार ठरलेला माझा भाऊ जर आजचा दिवस तरी माझ्याकडे राहिला असता, तर सुक्याबरोबर ओलेही जळून गेले असते म्हणून मीच त्याला सांगितलें की, तुम्ही नवराबायको प्रथम पाडवगडावर स्वतःच्या वतनदारींत निघून जा"

"तुम्हीं केले तेही एका अर्थी बरें केलें उगाच संशयाला जागा कशाला हवी !" देवकी म्हणाली

"बरें, मी आज आणखी अशासाठीं आलो आहे कीं, आज तुम्ही सगळ्याजणाना आमच्याकडे जेवावयाला आले पाहिजे बायकाकडून तुम्हाला रीतसर आमंत्रण मिळेलच, पण मीही सांगतो" भास्करराम राधेकडे पहात देवकीला म्हणाला, "राधा तुमच्या घरात पडली, याला आम्हीच कारण आहों मी तिला माझी पाठची बहीण मानतो ती त्या माहेराला मुकली तरी माझे घर हेंही तिचें माहेरच आहे तुम्हाला आता नातू होणार, हें ऐकून मला खरोखर आनंद झाला कितवा महिना तिला हा ?"

"दुसरा" देवकी उत्तरली तेव्हाच राधेने लाजून खालीं मान घातली देवकी पुढे म्हणाली, "पण भास्करराम ! आज सणवारी—"

"मला सारें समजते" भास्करराम म्हणाला, "म्हणूनच मी प्रथमच सांगितलें कीं आमचें घर हे राधेचे माहेर आहे तुम्ही आम्ही कोणी परकी नाहीं माझा शब्द खाली पडता कामा नये"

"पण आज मीं सूनबाईला डोहाळेजेवण—"

देवकीला पूर्णपणे बोलू न देता भास्करराम म्हणाला, "दुसरा महिना लागला नाहीं, तों कसले डोहाळेजेवण करता ? माहेरवाशिणीला पहिल्या गर्भारपणीं डोहाळेजेवण करण्याचा मान माहेरच्या माणसाचा असतो"

इतक्यात ताराबाई-भास्कररामाची बायको तेथे येऊन म्हणाली, "देवकीबाई, आम्हीच आज राधेला डोहाळेजेवणच करणार आहों तुम्ही सर्वांनीं आमचा शब्द मानला पाहिजे"

"पण आमच्या घरात अन्न शिजलेलें आहे त्याची मग काय वाट ?" देवकी म्हणाली

"ते आमच्याकडे आणा, सर्वजणे एकत्र बसून जेवू मग तर झाले ?"

याप्रमाणे होय नाहीं करता करतां अखेर देवकीला त्या आमंत्रणाचा स्वीकार करणे भाग पडले तेवढ्यात बळिरामही कृष्णरावासह तेथे आला त्या दोघांनाही त्या आमंत्रणाचा अव्हेर करता आला नाहीं देवकी व राधा यांच्यामार्फत कोन्हेररामाने उत्पन्न केलेल्या नसत्या कलागतीची बातमी त्या दोघांच्या कानावर जाण्यापूर्वीच भास्कररामानें 'अस्वलाच्या पूर्वी दरवेशाची बोंम्ब' या न्यायाने त्यांना सारा वृत्तांत निवेदन करून जशी देवकी व राधा यांची, तशीच त्या दोघांचीही समजूत केली, आणि त्या सरळ वृत्तीच्या उभयता बंधूंची तेव्हांच समजूत झालीही कृष्णरावाने पेशव्यांच्या पदरी आपणाला नोकरी लागल्याची वार्ता सर्वांना निवेदन केली व ती सर्वांना आनंददायक वाटली व पहिल्या आनंदात ह्या नव्या आनंदाची भर पडली

॰ ॰ ॰

पाण्याच्या पोटी अग्नि असतो, पण पाण्याने अग्नि विझतो त्याप्रमाणेच भास्कर-रामाच्या पोटी जरी द्वेषाग्नि पूर्वीपासून पिचत असला, तरी बाह्यात्कारीं तरी त्याने राधा, कृष्णराव व बळिराम यांच्या मनातील द्वेषाग्नि आपल्या लाघवी वृत्तीच्या जलसिंचनाने पार विझवून टाकला तो दसऱ्याचा सण सर्वांनीं मिळून हसून खेळून साजरा केला राधेच्या डोहाळेजेवणाचा सोहळाही त्याच दिवशीं थाटाने पार पडला भास्कररामानें त्या सोहळ्याचा बराच थाट केला होता राधेला एक जरीकाठी हिरवागार शालू व रेशमी जरीकाठी हिरवा खण ताराबाईच्या हातून त्याने लेववला राधा नको नको म्हणत होती तरी सर्वांच्या आग्रहा-वरून तिला तसे करणें भागच पडले. तिच्या साऱ्या आयुष्यात इतक्या भारी किंमतीच्या वस्त्राचा असा आजच पहिल्याने तिच्या शरीराला स्पर्श होत होता. तो स्पर्श तिला किती सुखप्रद झाला असेल याची कल्पनाही कोणाला करता यावयाची नाहीं तिच्याप्रमाणेच तिच्या नातेवाईक मंडळीलाही भास्कररामानें निर्मल बंधुप्रेमाने आपल्या मानलेल्या बहिणीची एवढी अपूर्वाईने संभावना केलेली पाहून परम संतोष वाटला त्यांनीं असलीं उंची वस्त्रें आजवर केवळ दृष्टीनें पाहिलीं मात्र होतीं, पण तीं वस्त्रे भास्कररामाच्या कृपेने राधेला डोहाळेजेवणाच्या निमित्तानें मिळालीं, यांत सर्वांनाच मोठी नवलाई वाटली

भोजनसमारंभ असा आनंदीआनंदात पार पडल्यावर कृष्णरावाला आपल्या नोकरावर रुजू होण्यासाठी पेशव्याच्या वाड्यात जावयाचे होतें. आज दसऱ्याची स्वारी जी सीमोल्लंघनाला निघावयाची, ती तशीच पुढे मोहिमेवर निघावयाची, हें आगाऊच ठरलेलें असल्याने कृष्णरावाला आजच आपल्या आप्तस्वकीयांचा निरोप घेऊन निघणे प्राप्त होते. कृष्णरावाकडे कोणती सेवा येणार हें अजून ठरावयाचे होतें, पण कोणतीही सेवा वाटणीला आली तरी आपणाला आपली आई व बायको यांना बरोबर घेता येणार नाही अशी त्याची खात्री होती. कारण, मोहिमेवर जाणाऱ्या कोणत्याही माणसाने आपला कबिला बरोबर घ्यावयाचा नाही असा सर्वसामान्य नियम होता. कृष्णराव मात्र बायकोला बरोबर घ्यावयाला हपापला होता. पण घेऊ देतो कोण! बळिरामही पेशव्याच्या सैन्यात दाखल होऊ इच्छीत होता. अर्थात कृष्णरावाच्या घरची मंडळी मागे रहाणार अशी दोनच, एक त्याची आई व दुसरी त्याची बायको. त्या दोघींनाही दुसरें जवळचें माणूस कोणी नसल्याने त्यांची काय व्यवस्था लावावयाची हा कृष्णरावासमोर एक मूर्तिमंत पेचच उभा होता. पण भास्कररामाने आपलेपणाने त्या दोघांनाही जरूर तोवर आपल्या घरी आश्रय देण्याचें कबूल केले. पूर्वीचा तो दुष्ट व पापी भास्करराम आता उरला नाही अशी आज सर्वांची खात्री होऊन चुकल्याने व त्यात राधाही गरोदरपणामुळे अडचणीत असल्याने त्या दोघी सासवासुनांनाही भास्कररामाच्या आश्रयाला राहणेंच योग्य वाटलें. अखेर सर्वानुमतें तोच विचार कायम झाला. ताराबाईने राधेचें बाळंतपण माहेरच्या हक्काने हौशीने पार पाडण्याचें आग्रहपूर्वक सांगितल्यावर व भास्कररामाची त्याला संमति मिळाल्यावर तें कोणाला रुचणार नाही!

नंतर कृष्णराव सर्वांचा निरोप घेऊन आजच्या दसऱ्याच्या स्वारींत सामील होण्यासाठीं निघाला. जाताना त्याने आपल्या मातृदैवताला प्रेमाने वंदन करून शुभाशीर्वाद मिळविला. भास्कररामालाही त्याने नमस्कार केला व त्यानेंही त्याला मोकळ्या मनाने निरोप दिला. नंतर कृष्णराव सर्व मंडळींचा डोळा चुकवून राधा एकटीच आहे असे पाहून तिचा निरोप घ्यावयाला गेला, तेव्हा राधेने मात्र निरोप देतांना थोडे आढेवेढे घेतले. त्या आढयावेढयात विशेष अर्थ होता अशांतली गोष्ट नाही, पण दुसऱ्या दृष्टीने विचार करतां त्यांत अत्यंत प्रेमळ असा गूढार्थ भरलेला होता. आजच राधा सातार्‍याहून आली

होती, तेव्हापासून त्या पतिपत्नींना क्षणाचाही एकान्त मिळाला नव्हता सकाळी त्यांचें जे थोडेसे संभाषण झाले होतें ते तरवारीच्या खणखणाटाप्रमाणें कठोर होतें अर्थात त्याची तरुण पतिपत्नींच्या प्रेमळ संवादात गणना करता येण्याजोगी नव्हती त्या भाषणाने एकमेकाशीं गुजगोष्टी करण्याच्या आवडीची त्या पतिपत्नीची तहान भागण्याजोगी नव्हती. उलट, त्या खटकेवजा संभाषणानें त्या दोघाच्याही मनाला हुरहूर मात्र लागून राहिली होती कीं, आपण उगाच एकमेकाच्या मनाला लागण्याजोगें बोललो त्याबद्दल दोघाना-ही मनात आता पश्चात्ताप होत होता, व एकमेकाची त्या निमित्तानें क्षमा मागण्यासाठीं दोघेही थोडयाशा एकातवासाची वाट पहात होतीं तो हवा हवासा वाटणारा एकातवास यापुढें मिळणं शक्य नाहीं हे ओळखून त्यानीं जवळ आजू बाजूला कोणी नाहीं असे पाहून मिळाला तेवढाच एकात साधला कृष्णरावानें सर्व मंडळी भास्कररामाच्या घरात गोष्टी बोलत बसली आहे अशी संधी साधून राधेला आपल्या बिऱ्हाडात येण्याबद्दल डोळ्याने खूण केली, व राधेनें त्या खुणेला नेत्र-संकेतानेच मान्यता दिली. प्रथम कृष्णराव व त्याच्या मागोमाग राधा कसल्या-तरी निमित्ताने आपल्या बिऱ्हाडाकडे निघून गेलीं ही त्याच्या खुणावणीची भाषा इतर मंडळीपैकीं देवकीला मात्र कळली. कारण त्या दोघाची नेत्रपल्लवी चालली होती तेव्हा राधा देवकीजवळच उभी होती पण देवकीनें मुद्दाम तिकडे काणा-डोळा करून आपला वडीलपणाचा मान राखून घेतला व त्या दोघाना एकाताची संधी दिली



प्रकरण नववें

# अपशकुन?

"राधे! माझ्या सकाळच्या बोलण्याचा तुला राग आला का?" कृष्णरावाने आपल्या बिऱ्हाडात येताच तेथें राधा एकटीच आहे असें पाहून तिच्या अणकुचीदार हनुवटीला हात देऊन + + + स्मितहास्यपूर्वक विचारलें

"राग येण्याजोगें माणसाने बोलल्यावर राग येणारच! मी तरी सकाळी काय वावगें बोलले?" राधा पूर्णपणे कृष्णरावाच्या अंकित होऊन म्हणाली, "पण ज्या वेळचे त्या वेळीं आता त्याचे काय? मी तेव्हा जरा चिडून बोलले खरी, पण मी तरी बाणेदार पतीचीच पत्नी आहेमा?"

"हो! तें मला माहीत आहे—"

"माहीत आहे तर सकाळींच बरा त्याचा विसर पडला होता!"

"रागाच्या भरात एकवार चूक होऊन गेली, त्याबद्दल मी तुझी मनापासून क्षमा मागतो, मग तर झाले ना?"

"क्षमा मागायला नको काहीं! आधी लाथ मारायची व मग नमस्कार करायचा ही विद्या इकडच्या अंगी पुरीपुरी बाणलेली आहे हे मला माहीत आहे"

"तू बोललीस त्याचा माझ्या मनावर एक मात्र अत्यन्त इष्ट परिणाम झाला"

"तो काय?"

"वाइटातूनच चांगले निपजते असे म्हणतात तें काही खोटे नव्हे मला तेव्हा वाटलें कीं, मी गरीब, मानमान्यता व वैभव ही दोन्ही परमेश्वराने मला दिलेलीं नाहीत, आणि तू थोरामोठ्याची माहेरवाशीण आपणा उभयतामधला हा भेद स्पष्टपणें माझ्या नजरेला आणण्यासाठींच तू तेव्हा इतके टाकून बोललीस असें माझ्या मनाने घेतले, व त्याच क्षणाला मीं परमेश्वराला स्मरून मनोमय शपथ घेतली कीं, कांहीं पराक्रम करून मानवैभव कमवीन तेव्हाच जगाकडून धन्य धन्य म्हणून घेत माघारा येईन, तसे साधले नाही तर तसाच रणांगणात मरून जाईन, पण आहे या स्थितींत तुला परत कधीही तोंड दाखविणार नाहीं."

"माणसाला अशी ईर्षा हवीच मात्र त्या ईर्षेला आपण कारण सांगितलें तें

माझ्या कानाना कसेंसेंच वाटते  माझ्यासाठीं असा त्रागा आपणाला करावा लागला, एरव्ही काही आपणाला एवढे धाडस करवले नसतें, असेच ना ? "

" मी त्रागा केला असे नाहीं  राधे ! मी काय म्हणतो ते नीट ऐकून घे उगाच गैरसमज करून घेऊ नकोस "

" आपण काय म्हणता ? "

" मी असे म्हणतों की, तुला सकाळी बोल सुचले ते सुवेळी सुचले ईश्वराने तेव्हा तुला सुबुद्धि दिली "

" ईश्वराच्या अगाध लीला कोण नाकबूल करील ? पण माझे वेडीचे आपणाला एक सागणे आहे,–आपण ऐकणार असाल तर सागते ' राधा कृष्णरावाच्या स्कधावर हात ठेवून लडिवाळपणाने म्हणाली

" तुझे सागणे आणि मी ऐकणार नाहीं, असे कधी झाले आहे । " कृष्णरावाने तिच्या हनुवटीला हात लावून पुन्हा × × × विचारले

" म्हटले, मी काही नवी नवरी नाही मी आजच लग्न होऊन आपल्या घरात आलें आहें असे नाही "

" मग काय ? आपले लग्न झाल्यापासून मी तुला त्रासच दिला असे तुझे म्हणणे ?"

" पहा ! हे पहा ! " राधा जरा भुवया चढवून जरा हसून उद्गारली, " आपल्या सतापाला व समाधानाला मेरवार नाहीं असे मी वारवार म्हणते, त्याचे हें ताजे प्रत्यतर पहा ! आपण मला त्रास दिला असें मी कधी म्हटलें ? पण माझें आपण ऐकता हे मात्र खोटे "

" बरे, आता यापुढे तरी नक्की ऐकत जाईन, मग तर झाले ? "

" द्वापारातले श्रीकृष्ण त्याच नावाने नव्या जन्माने अवतरले आहेत जसे काही !"

" द्वापारातला श्रीकृष्ण नेहमींच राधेच्या चरणी लीन असे त्याला कधीं राधेने नांवें ठेवलीं नाहीत आणि तू—"बोलता बोलता कृष्णरावाने राधेच्या चर्येकडे पाहिले, तेव्हा तिचा चेहरा अनुरागाने लालावत असलेला त्याला आढळून आला त्याबरोबर तो म्हणाला, " पण नको त्या द्वापारातील राधेची प्रहरन् प्रहर मनधरणी करावयाला त्या श्रीकृष्णाला रिकामा वेळ होता, म्हणून तो प्रथम चिडवून चिडवून रुसवी व मागाहून तिची मनधरणी करकरून तिला हसवी पण ह्या राधेची मनधरणी करावयाला मला तितका वेळ कुठें आहे ? तेव्हा तू जीं नावे ठेवशील तीं मला मुकाट्यानें सहन केलीं पाहिजेत बरे, तू मला काय बरें मागणार होतीस ? "

' पण 'मोठा आजीबाईचा आव आणते आहे' अशी आपण माझी थट्टा नाहीं ना करणार ? "

"थट्टा करणे हा श्रीकृष्णाचा धर्म आहे, व त्याला वेळोवेळीं हिताच्या गोष्टी सागून ता/यावर आणणे हा राधेचा धर्म आहे"

"असे मला हरभऱ्याच्या झाडावर चढवू नये गडे ! मी जे आजवर सागत आले तेच आणखी एकवार सागणार आहे, व तेंही जगात नवे काहीं सागणार आहे असे नाहीं आपण जे आता म्हणाला, की ईश्वराने मला सकाळी तसें बोलाय-ची सुबुद्धि दिली, ते खरे पण मनुष्याची विवेकबुद्धि इतकी परावलंबी असणे बरे नाही माणसाचा देवावर विश्वास असावा, पण त्यापूर्वी आत्मविश्वासही अवश्य असावा व्यक्तिमात्राच्या देवात ज्याप्रमाणे ईश्वराचे अधिष्ठान असते, त्याप्रमाणें प्रयत्नातही असते प्रयत्नानी ईश्वर आपलासा करून घेतला की, तो दैवाच्या रूपानें प्रसन्न होतो यासाठी आपण दैवावर हवाला टाकून वागण्याचें सोडावे व प्रयत्ना-ची कास धरावी आपण जर पेशव्याच्या पदरी नोकरी मिळविण्याचा प्रयत्न केला नसता, तर दैव काय करू शकले असते ? मी आता आपणाला हें मुद्दाम सांगते आहे याचे कारण आपणाला नशीब काढण्याची संधि ईश्वरकृपेने लाभली आहे, आता आपण विजयश्रीला वरून नशीब काढण्यासाठी आपल्या प्रयत्नाची शिकस्त केली पाहिजे पटते का आपणाला माझे म्हणणे ? "

"हे काय विचारतेस ? मात्र मला वेळोवेळी अशी सावधगिरीची सूचना देण्यासाठी तू माझ्याबरोबर पाहिजे होतीस मी पेशवेसरकाराना विचारू का तुला बरोबर घ्यावयाची परवानगी ? "

"मी बरोबर आले असतें पण ह्या अशा स्थितीत कशी येऊ ? "

"का बरे ? नऊ महिन्याच्या गरोदर बायकादेखील घरींदारीं व शेतात देखील राबताना आपण पहात नाहीं का ? "

"तें खरें, पण सासूबाई काय म्हणतील ? "

"आई काय म्हणणार ? मी तुला बरोबर नेणार असें म्हटल्यावर व तुझी येण्याची इच्छा असल्यावर ती थोडीच आड येणार आहे ! तू बरोबर असलीस म्हणजे मला अशी वेळोवेळीं सल्ला देशील व मलाही मग मागची कसलीही चिंता करावी लागणार नाहीं "

"चिंता कसली ? सासूबाई व मी इथे सुखाने राहू बरोबर आल्यानें माझी

सल्ला आपणाला वेळोवेळी पटेल की नाही याचा काय नेम ? उलट आपणांला पाय-बेडी पडल्यासारखें व्हायचें बायकोची बेडी फार अवघड असते ती तुटता तुटत नर नाहींच, पण तिने जखडून गेलेल्या माणसाला तिची अडचणही होत नाही. बायकोचा मोह मोठा कठीण असतो त्या मोहात गुरफटून गेलेल्या माणसाना वेळीं मर्दुमकीचाही विसर पडतो रणांगण म्हणजे काहीं रगमहाल नव्हे! म्हणून म्हणतें, शहाण्या बायकानी पुरुष मोहिमेवर निघाले म्हणजे त्यांच्याबरोबर जाऊच नये"

"एकूण तुझीच बरोबर यावयाची इच्छा नाही असे म्हण ना? बायका बरोबर असल्यावर पुरुषाना मोह पडेल म्हणून त्या बरोबर आल्या नाहींत, तरी पुरुषाना मोह पाडणाऱ्या आणखी बायका जगात नाहीतच की काय? तसे होऊ नये, पण झाले तर मग तुला कसे बरे वाटेल?"

कृष्णरावाचा हा प्रश्न ऐकून राधेला विस्मय वाटला ती जरा रागाने दोन पावलें दूर होऊन म्हणाली, "हीच पुरुषाची दानत ना? आम्हा बायकाना असें भय पुरुष घालू लागले तर आम्हाला देखील असे भय नाहीं का दाखविता यायचें? पुरुष जर असे वागले, तर बायकानीही जशास तसे या न्यायाचे अवलबन केल्यावर मग कसे होईल बरे?"

"आणि बायका तशा वागत नसतील म्हणून तरी कोणी सागावे?"

कृष्णरावाच्या तोंडून हा प्रश्न सहज ओघासरसा निघून गेला पण राधेच्या मनावर मात्र त्याचा फारच अनर्थकारक परिणाम झाला तो परिणाम अर्थात कांहींसा विकारवशतेचा होता 'भास्कररामाच्या बाबतींत आपल्या नावाचा जो बोभाटा झाला होता, तो आपल्या पतीला पूर्वीच कळला असेल, म्हणून तर त्यानें असे सशयाचे उद्गार काढले नसतील ना,' अशी शका त्या क्षणाला दत्त म्हणून तिच्यासमोर उभी राहिली ती सशयाच्या भरांत रागाला येऊन म्हणाली, "इतका-देखील आपला माझ्या ठायीं विश्वास नाहीं ना?"

"विश्वास नाहीं असे नव्हे, पण मी जगाची रीत बोलून दाखविली"

"विश्वास आहे, तर आपण माझ्या बाबतींत असे उद्गार का बरे काढले?" राधेने डोळ्यांत आंसवे आणून विचारले

"मग तू तरी माझ्याविषयीं असा सशय कां बरें दाखविलास?" कृष्णरावानें काहींशा निस्पृहपणानें विचारले जितका राधेला आपल्या शीलाचा अभिमान होता, तितकाच त्यालाही स्वत.च्या शीलाचा अभिमान होता.

" मी बोलले म्हणजे आपणाविषयीं अविश्वास दाखविला अशातली गोष्ट नाही काहीं ! जगात अशा गोष्टी नेहमीं घडतात त्या मीं आपल्या आठवणीसाठीं बोलून दाखविल्या फार दूर कशाला ? पेशवेसरकाराचेच उदाहरण पहावे ना ? बुंदेलखंडच्या स्वारीत सरकार मस्तानीच्या मोहपाशात सापडलेच कीं नाहीं ? तशी एखादी बया आपल्या गळ्यात पडली, तर आज जसे पेशवीणबाईच्या जन्माचें मातेरें झाले आहे, तसेच उद्या माझ्या जन्माचें मातेरें व्हायचें नाही कशावरून ? "

" राधे ! हे तुम्हा बायकाच्या बाजूचे उदाहरण जसे तू दिलेंस, तशींच पुरुषाच्या बाजूची उदाहरणे मलाही देता येतील पतीच्या तोंडदेखल्या पातिव्रत्याच्या गप्पा मारणाऱ्या बायका पतीच्या डोळ्याआड कसकसे थेर करतात, हे मी तुला दाखवून देऊ का ? "

हा प्रश्न पुन्हा राधेच्या वर्मी झोंबला तिला वाटले, कृष्णरावाने हा टोमणा आपणालाच दिला हा अपमान तिला सहन होईना ती पदराने डोळे पुशीत गद्गद् स्वराने म्हणाली, " आपला हा रोंख जर माझ्यावर असेल, तर मी आपली खात्री करून देण्यासाठी पाहिजे ते दिव्य करायला तयार आहे पाहिजे तर मी भास्कररामाना आता आपल्यासमोर बोलावून आणते "

" पुन्हा तेच ! मी तुझ्याविषयीं काहीं म्हणालो का ? "

" हीं घालून पाडून बोलणी मला समजतात ! माझ्याविषयीं आपण असा भलताच संशय घ्याल, तर मी आपल्या पायाखालीं डोके आपटून प्राण देईन दुसऱ्या कोणी असले घाणेरडे उद्गार काढले असते, तर मीं या क्षणी त्याच्या नरडीचा घोट घेतला असता. आपल्या पूर्वजाची पुण्याई थोर, म्हणून माझ्यासारखी बायको आपणाला मिळाली —"

राधा वरचे शब्द बोलताना संतापातिशयानें थरथर कांपत होती तिच्या तोंडचें वाक्य पूर्ण होण्यापूर्वीच देवकी अकस्मात् तिथे आली. तिला पाहून राधा ओशाळी होऊन थबकली. तिनें तोंड फिरवून आपलीं आसवें पदरानें घाईघाईने पुसून टाकलीं व हसरा चेहरा करून एथवरच्या वादविवादावर पडदा टाकण्याचा शिताफीचा प्रयत्न केला तो तिचा प्रयत्न काहीं म्हणण्याजोगा साधला नाहीं तिने एकदा आसवे पुसलीं तरी पुन्हा ती डोळ्यावाटे वाहू लागलींच, व शिवाय पूर्वीच्या आसवाचे गालावरचे डाग तसेच होते तसेंच कोमेजलेल्या गुलाबाच्या फुलाप्रमाणें मलूल झालेला तिचा चेहराही तिच्या विरुद्ध बाजूचा साक्षीदार म्हणून उभा होता पण देवकीला वाटलें

कीं, कृष्णराव आता मोहिमेवर जाणार, त्याची आता बरेच दिवस भेट व्हावयाची नाहीं, म्हणून राधेला खेद झाला आहे. तिने राधेची समजूत घातली, " सूनबाई! असे काय? कृष्णा मोहिमेवर चालला म्हणजे काही जग सोडून चालला नाहीं! उगी रहा. सणासुदींच्या दिवशीं असे डोळ्यातून पाणी काढू नये तो सोने देण्यासाठी रात्रौ परत घरीं येईल, तेव्हा तू त्याला आरती ओवाळ" लगेच ती कृष्णरावाकडे वळून म्हणाली, " कृष्णा! गोविंदा तुला बोलावायला आला आहे"

इतक्यात गोविंदपंत तिथे आलाच. तो कृष्णराव व देवकी याना एकटीच पाहून म्हणाला, " तरी मला वाटलेच होतें की, हा घरी आला म्हणजे बायकोच्या प्रेमपाशात गुरफटणार म्हणून, तेवढ्याचसाठी मी त्याला इकडे पाठवीत नव्हतो पण देवकीकाकू! तेवढ्यात तू बळिरामाला धरणेधऱ्यासारखा पाठविलास!" गोविंदपंत राधेकडे वळून म्हणाला, " हे काय हे! राधावहिनी! सकाळी तूच आम्हाला शौर्य-धैर्याच्या गोष्टी सागत होतीस, आणि आता पतिराजाना निरोप देताना इतकी कष्टी होतेस? छे बुवा! असल्या बावळट बायका काही आपणाला आवडत नाहीत" त्याने कृष्णरावाला बाजूला विचारले, " आपण अमक्या कामगिरीवर जाणार असे तू तिला सागितलेस वाटतें? ते कोणापाशीं बोलावयाचें नाहीं असें मीं तुला सागितलें होते!"

" पण मी तिला काहीच सागितले नाही"

" तर मग ती इतकी कष्टी का होते?"

" उगाच तिला नसते सशय घेऊन रडत बसण्याची सवयच आहे त्याला कोण काय करणार?"

इतका वेळ राधा कोणाशींच काहीं बोलली नाही पण देवकीनें मात्र त्या दोघाचे सभाषण ओझरते ऐकून विचारलें, ' खरे, गोविंदा! कृष्णाला पेशवेसरकारानीं कसल्या कामगिरीवर नेमले आहे रे?"

कृष्णराव गोविंदपंताच्या कानाशी लागून हळूच म्हणाला, " पहा! इतका वेळ मीं जी गोष्ट गुप्त ठेवली होती, ती तू बाहेर फोडलीस आता तरी जास्त बहात जाऊ नकोस, नाहीपेक्षा ह्या दोघींची समजूत करणे आपणाला फार जड जाईल"

कृष्णरावाचे हे बोलणेही देवकी व राधा ह्या दोघींना ऐकू गेले. राधा यावर काहीं बोलली नाही, पण देवकीने मात्र कृष्णरावाच्या अटकळीप्रमाणे सावध

होऊन पुन्हा आग्रहपूर्वक विचारलें, "गोविंदा! अगोदर मला साग, कृष्णाला श्रीमत खासगीकडे ठेवणार आहेत कीं शिपाईगिरीवर पाठविणार आहेत?"

"पहा! मी सागितलें त्याचें हें प्रत्यतर पहा!" कृष्णराव गोविंदपतावर अमळ रागावून म्हणाला

"तू याब तर खरा! मी म्हातारीची समजूत करतो तुला त्याची काळजी नको" असें म्हणून गोविदाने देवकाला सागितले, 'देवकीकाकू! त्याच्याशीं आपणाला काय करावयाचें आहे? माझे नेहमींचे एक ब्रीदवाक्य आहे, आपण एकवार श्रीमताच्या सेवेला वाहून घेतल्यावर त्याना आपली सारी काळजी! त्यानीं सागितलेले काम करावयाचे एवढे आपणाला माहीत परमेश्वराच्या चरणीं जसा आपला दृढभाव असतो, तसाच दृढभाव धन्याच्या चरणीं ठेवला, की आपल्या स्वामिनिष्ठेचें योग्य फळ आपणाला मिळतेच मिळतें शिंदे, होळकर, जाधव वगैरे मडळी§ जी आज एवढी वैभवाला चढलेली दिसतात, ती त्याच्या अशा वर्तनामुळेच"

"पण तुम्ही कृष्णाला शिपाईगिरीवर नकोच पाठवू" देवकी पुन्हा काकुळतीला येऊन म्हणाली

"बरं आहे, मी श्रीमताना तसें सागतो असे पहा, आधी माणसाला पुढे यावयाला संधि मिळत नाही ती तुझ्या मुलाला मिळण्याचा सभव असताना तू जर नको म्हणणार, तर तिथें आमचे बोलणेच खुटले" गोविदपत म्हणाला

काय योगायोग नकळे, तेवढ्यात देवकीचा उजवा डोळा लवू लागला त्यात काहीं असो किंवा नसो, पण देवकीला तो अपशकूनसा वाटून त्याच क्षणी तिच्या मनाला चरका बसला. आपण तो अपशकुन बोलून दाखविल्यास कृष्णराव व राधा ही दोघेही नाउमेद होतील ह्या भयाने बोलून दाखविला नाहीं, पण कृष्णरावानें शिपाईगिरीवर जाणें इष्ट नाहीं असें मात्र तिच्या मनाने पक्कें घेतलें ती पुन्हा म्हणाली, "पण नकोच गोविंदा! माझ्या कृष्णाला शिपाईगिरीवर पाठवू नका

---

§ राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर, पिलाजी जाधव, वगैरे मराठे वीर इतिहासात अमरकीर्ति होऊन राहिले आहेत ते प्रथम पेशव्याच्या पदरीं हुजरे होते त्याना पेशव्यांनींच नावारूपाला आणले 'पेशवाई'मधील पूर्वीच्या व पुढील कादंबऱ्यांत त्यांचीं यशोगीतें गाइलेलीं आढळतील

असें तू माझ्या वतीनें सरकाराना विनवून साग सागशील ना ? आणि कृष्णा ! तुलादेखील माझ्या गळ्याची शपथ आहे, शिपाईगिरी पत्करशील तर '

"आणि अशा अडेलपणाबद्दल सरकारानीं त्याला नोकरी देण्याचेंच नाकारले तर ?" बळिरामाने मध्येंच विचारलें

"नाकारले तर नाकारले आपण मग भीक मागून खाऊ पण सरकार नाकारणार नाहीतच '

"बरे आहे पाहू तर खरे काय होते ते !" असे म्हणून गोविंदपताने देवकीचे तात्पुरते समाधान केले नतर ते दोघेही पेशव्याच्या वाड्याकडे निघून गेले देवकीच्या मनातली चिंता मात्र बराच वेळ कायम होती. तिने त्या बाबतींत बळिरामाचे मत घेतलें तेही गोविंदपत व कृष्णराव यान्च्या मताशी जुळते असेच होते राधेनें तर त्या गोष्टीला नुसती अनुमति दिली असे नाहीं, तिनें त्याचे समर्थनही केले तें समर्थन देवकीला इतके अप्रिय वाटले की, तिने राधेला तोंडावर 'तू निष्ठुर मागहृदयी आहेस तुला दयामाया काहीच नाही. आम्ही गरीब पडलो, आमच्या भिकार ससारात तुझे हाल होतात म्हणून तू असंतुष्ट आहेस' ह्या व आणखी अशा शब्दाची लाखोली वाहिली

थोड्या वेळापूर्वी कृष्णरावाच्या बोलण्याने राधेच्या मनात जो सशय उत्पन्न झाला होता, त्याला देवकीच्या आताच्या बोलानी पुष्टि मिळाली तिच्या मतानें तिची खात्री होऊन चुकली की, आपला पूर्वेतिहास ह्या मडळीला कळला असल्यामुळेच आपणाला याची अशीं घालून पाडून बोलणी सहन करावीं लागतात आता यातून मार्ग कोणता व कसा काढावा हेच तिला सुचेना त्यातच देवकीने तिला पाढऱ्या पायाची ठरविण्यासाठी स्वत चा उजवा डोळा लवत होता त्याचा दोषही तिच्याच माथी फोडला साराश, डोहाळेजेवण वगैरे आनदकारक प्रसंगानीं देवकीच्या घरात जे आनदीआनदाचे साम्राज्य नादू लागले होते, ते एका पाव घटकेत नष्ट होऊन तेथे मूर्तिमंत निराशा नादू लागली हा देवकीच्या अपशकुनाचा दाखला असेल का ? की भवितव्यताच तशी होती ?

  

त्या दिवशी प्रहरभर दिवसाला पेशव्याची मिरवणूक मोठ्या थाटाची निघाली. अशा प्रकारचें भाग्य महाराष्ट्राच्या साऱ्या इतिहासात पुण्यनगरीला त्या दिवशींच पहिल्याने लाभत होतें त्यापूर्वी अशा मिरवणुकी पुण्यात निघाल्या नसतील असें

नाही, अनेक निघाल्या असतील हिंदु धर्म व हिंदु समाज याचा विध्वस करण्या-चें कंकण हाती बाधलेल्या अविध सत्ताधाऱ्याच्या अधिकाऱ्यानीं एखाद्या मशिदी-च्या पायऱ्या करण्यासाठीं तेथल्या पुरातनच्या हिंदु देवालयातील मूर्ति लुचाडून नेताना अगर एखाद्या थोर कुळातील मानमान्यतेच्या हिंदूला बाटवून मुसलमान केल्यावर ह्या आसुरी विजयाचा टेंभा मिरविण्यासाठीं आजच्याहूनही मोठ्या मिरवणुकी काढल्या असतील, व नगरवासी हिंदुजनानी तेव्हा त्राहि भगवान् म्हणून लाजेने खालीं माना घातल्या असतील तेव्हाच्या सत्ताधारी मुसलमानाची मिजास व रुबाबदारी अपूर्वाईची होती यात शका नाही पण ज्या दुबळ्या हिंदु-समाजाला गाजगाजून त्यानी आपल्या आसुरी मिजासी चालवावयाच्या, त्याला त्यात कसले स्वारस्य वाटणार ! त्या बिचाऱ्या हिंदूचें तें मरणच ! नव्हे, मरणाहूनही दारुण असे मरण ते ! तात्पर्य, आजच्यासारखा सोहाळा पुणेकर हिंदूना आज प्रथमच पहावयाला मिळत होता, व म्हणूनच त्याच्या आनदीआनदाला आज पारावार नव्हता यापूर्वीही दरसाल दसरा येई, तो हिंदुजनाकडून ज्याच्या त्याच्या ऐपती-प्रमाणें साजराही होई, पण तो बेताबताचाच तसे आज नव्हते आज साऱ्या नगर-वासी जनानीं आपापली घरे गुढयातोरणानीं अत्यत सुशोभित केली होतीं. ठिकठिकाणीं देवालये व सार्वजनिक धर्मशाळा वगैरे ठिकाणेही अत्यत मनोहारि-तेने शृंगारण्यात आला होती. पूर्वी अशा हिंदूंच्या सणवारी काही काहीं कडव्या मुसलमान अधिकाऱ्यानी मुद्दाम आपल्या राजसत्तेचें वैशिष्ट्य दाखविण्या-साठी सार्वजनिक ठिकाणी गोवधासारखे अत्याचार करावे व हिंदु नागरिकानी ते मुकाटपणे पहावे, अथवा पहावले नाहीत तर डोळ्यावर कातडे ओढून डोळे मिटून घ्यावे पण आज नगरात कोठेही तसा प्रकार झाला नाही त्यासाठीं पेशव्याना आज्ञापत्रदेखील काढावे लागले नाहीं, मुसलमान लोक आपण होऊनच आज शहाणपणानें वागत होते. इतकेंच काय पण ते हिंदूच्या आनदीआनदात आवडीनें शक्य तेवढा भाग घेत होते सैन्यात दाखल होण्यासाठी दूर दूरच्या मकाणाहून आलेल्या सहस्त्रावधि सैनिकाच्या उत्साहाची नगरवासीयाच्या ह्या आनदात भर पडल्यामुळे नगरात जिकडे पहावे तिकडे शोभा व आनदीआनद मुसमुसून राहिला होता बरोबर सायकाळी तिसऱ्या प्रहराला शनवारवाड्यापासून मिरवणूक निघाली त्या मिरवणुकींतील बहुमोल शृंगारसाजानें शृंगारलेले हत्ती घोडे, हत्तींच्या पाठींवरील अबारींत श्रीमत पेशवे व त्याचा निकटचा परिवार याच्या

स्वाऱ्या बसलेल्या, बाजिरावाचा नवा विश्वासू सेवक कृष्णराव व जुना सेवक गोविंदपंत हे त्या अंबारींत बाजिरावाच्या मागें उभे राहून त्याच्यावर चवऱ्या ढाळीत उभे, सरकारस्वारीच्या मागें, पुढें व सभोंवार डौलानें मिरवत चालणारे हत्ती, घोडदळ, पायदळ वगैरे सैन्य व त्या सैन्याच्या आजूबाजूने मिरवत चालणारे नागरिकांचे प्रचंड समूह, असा अपूर्व सोहाळा पाहून रस्त्याच्या दुतर्फा आपापल्या घराच्या सज्जातून व खिडक्यातून उभ्या असलेल्या सुवासिनींनी तो देखावा पाहून–विशेषतः हा अपूर्व सोहाळा ज्याच्या धवलकीर्तीनें परिमळत होता, त्या स्वरूपसुंदर व अतुलपराक्रमी बाजीराव पेशव्याचें डोळाभर दर्शन घेऊन त्याना धन्यवाद दिले व त्याच्यावर फुलें उधळलीं

सूर्यास्ताच्या सुमाराला मिरवणूक मुळा मुठेच्या संगमावर* इच्छित स्थळी गेल्यावर बाजिरावांनी अंबारींतून उतरून शमीवृक्षाचें यथाविधि पूजन केलें त्यानंतर सोने लुटण्यांत आल्यावर मिरवणूक पुन्हा तशीच पुढें चालू झाली, ती संगमावरील नियोजित स्थळीं जाऊन पोचली तेव्हा दिवेलावणीचा समय झाला होता तेथें अपूर्व रोषणाईत पेशव्याचा दरबार भरविण्यात आला दरबारात बाजिरावानीं समयाला उचित असें थोडेंच पण स्फूर्तिदायक असे भाषण करून तत्कालीन देशस्थितीचे चित्र सर्व जनसमुदायाच्या मनावर इतक्या कुशलतेने व परिणामकारकतेनें बिंबविले कीं, त्यामुळे त्या जनसमर्दातील प्रत्येकाच्या रोमरोमात स्वदेशभक्तीचें तेज झळाळूं लागले आपल्या भाषणाच्या शेवटी बाजिरावानी सर्वांपाशीं जेव्हा ‘आपला देश व आपला धर्म याच्यासाठीं तुम्हीं सर्वजण मरायला तयार आहा काय’ असा प्रश्न केला, तेव्हा सर्वानीं एकमुखानें होकार दिला, आणि बाजिरावानीं सर्वांना हातातील सोन्याची शपथ घेऊन तशी कबुली देण्याला सांगितलें, तेव्हा सर्वांनीं तशी शपथ घेतली त्या शपथेच्या गर्जनेने दशदिशा दणाणून गेल्या. नंतर सर्व सरदारांना व मानकऱ्याना ज्याच्या त्याच्या ऐपतीनुसार बक्षिसें वाटण्यांत आलीं जे सरदार अथवा मानकरी असे मानमरातबाचे लोक नव्हते, अशा इतर हजारों सैनिकांपैकीं प्रत्येकाला एकेक नारळ देण्यांत आला पण तो मानाचा नारळ होता, त्याची किंमत बहुमोल नजराण्याप्रमाणेंच अमोल होती

❀ ❀ ❀

---

* मुळा-मुठेचा संगम आज पाहिला तर पूर्वीची ती नैसर्गिक शोभा तेथें आज थोडीच दिसणार आहे !

मिरवणूक ओसरली व गर्दी जरा कमी झाली, बाजीराव आपल्या दोघां सेवका-सह बोलत बोलत आपल्या डेऱ्याकडे निघून गेले तेव्हांच एक धट्टाकट्टा तरुण एका अशक्त म्हातारीला हाताशीं धरून त्या गर्दीतून वाट काढीत काढीत घाईघाईनें पुढें चालला होता. त्या तरुणाकडे पाहता तो त्या गर्दीतूनच काय पण सभोंवार एखादा चक्रव्यूह रचिला गेला असता तरी त्यातून देखील वाट काढून पुढे जाऊं शकला असता पण म्हातारीच्या अगीं तेवढें अवसान नव्हते, म्हणून तिला आपल्याबरोबर चालविताना त्या तरुणाची तारांबळ उडत होती सभोंवारचे लोक म्हातारीकडे पाहून आपसात तिची थट्टा करू लागले एकजण जास्त टवाळ होता तो दुसऱ्याला म्हणाला, " ही म्हातारी सैन्यात नोकरी मागण्यासाठीं पेशवे सरकारा-कडे चालली आहे कीं काय ? "

त्या तरुणाने ते शब्द ऐकले मात्र, लगेच त्याने त्या टवाळखोराची मानगुटी पकडून दुसऱ्या हाताने असा एक गुद्दा हाणला कीं, त्यासरसा तो टवाळ 'ओय् ! ओय् ! मेलों ! मेऽलों' असे ओरडूं लागला. तो प्रकार पाहून आजूबाजूचे लोक त्या परक्या तरुणावर तुटून पडले त्या तरुणाने पवित्र्यावर उभा राहून त्या सर्वांना दरडावून बजावलें, " नामर्दांनो ! छाती असेल तर पुढें या, म्हणजे हरएकाचा मुड्दा पाडतों "

झाले शब्दानें शब्द वाढला व त्या तरुणाची तेथल्या इतर लोकाशी झोंबी जुपली त्याच्या पोलादी मनगटाच्या तडाक्यानीं समोर येणारा प्रत्येक मनुष्य लोळविला जाऊं लागला, त्यामुळे तेथे मोठा गोंगाट माजून राहिला तो तरुण एकटाच एकव्या-दुकट्याशीं झगडत होता तोंवर विजयश्री त्याच्या बाजूनें त्याच्या तळपायींच्या सावलीसारखी चालत होती पण एकाला मार मिळालेला पाहून दुसरा आला, त्याचें पाहून तिसरा आला, असा चिडलेल्या लोकांचा घोळका त्या तरुणासभोंवार जमून त्याच्यावर हात टाकूं लागला, तेव्हा मात्र त्या तरुणाचा अगदीं नाइलाज झाला. तो जर्जर होऊन खालीं पडला. म्हातारी रडून ओरडून ती दंगल शांतविण्याची शिकस्त करीत होती. पण तिच्या दुबळ्या बोलांना तिथें कोण भीक घालतो ?

अखेर त्या छोटया दंगलीचें पर्यवसान व्हावयाचें तेंच झालें हा कुठचा कोण उपरा दंगेखोर येऊन दंगा करीत आहे, असें पाहून तेथल्या लोकांनीं व चौकी-वाल्यांनीं त्याला मरेमरेतों मारून झोडून मग कैद केलें. त्याच्याविषयीं अनेकांचे

अनेक तर्क चालू लागले त्यातल्यात्यात जे आपल्या मतें तल्लख डोक्याचे पहारेकरी होते, त्यानीं तर त्या तरुणाला शत्रुपक्षाचा हेर ठरविले !

एकजण म्हणाला, " याला आतांच्या आता सरकारासमोर हजर करावयाचे का ।"

दुसरा म्हणाला, " नको सरकार सध्या महालात सोने वाटण्यात गुतले असतील, त्यात व्यत्यय कशाला ? हा राहीना का आजची रात्र इथेंच ताटकळत ? त्या म्हातारीला मात्र तेथून हाकलून द्या नाहींपेक्षा उगाच ती थडींत ताटकळून गार व्हावयाची, व आपल्या माथी दोष यावयाचा "

त्या तरुणानें व म्हातारीने आपण हेर नसल्याबद्दलचा कग कर खुलासा केला पण सशयग्रस्त पहारेकऱ्याना तिकडे लक्ष्य द्यावेसे मुळींच वाटले नाही. त्यानीं त्या तरुणाला लगेच कैद करून चौकीवर बसवून ठेविले व म्हातारीला मात्र तेथून शिव्या हासडून हाकलून दिले. ती सुखासमाधानाने जाईना,म्हणून तिला त्यानीं मारावयाला ही कमी केले नाहीं ती बिचारी नाइलाज म्हणून जळफळत, रडत कढत चौकी-पहाऱ्यापासून बऱ्याच अतरावर असलेल्या एका पडक्या घराच्या ओट्यावर बसून होती. तिचा प्राण नव्हे, प्राणाचाही प्राण असा तिचा मुलगा कैद होऊन चौकी-वर ताटकळत पडला असता तिला चन कसे पडावे ?

होता होता रात्र झाली, पेशव्याच्या छावणींतील सर्व लोकांनी उदयीक मोहिमे-वर निघावयाचे म्हणून ती रात्र गाणें बजावणे व नाचरग करण्यात ऐषआरामात घालविली स्वत पेशवेही त्या रात्रीं नाना परीच्या आनदोत्साहात रगून गेले होते तो कैद झालेला तरुण व ती त्याची म्हातारी आई याना छावणीतील हा आनंददायक प्रकार दुरून दिसत होता, पण तो त्याना उलट तापदायक होत होता कारण त्या आनदात त्याना कांहीच भाग मिळाला नव्हता इतकेच काय पण रात्रौ तहान भुकेनें त्याचे प्राण व्याकुळ झाले तरी त्याना घासभर अन्न अथवा घोंटभर पाणीही कोणीं दिलें नाहीं !

  

त्या रात्रीं मध्यरात्रीच्या सुमाराला श्रीमत बाजीराव पेशवे आपल्या मडळीला बरोबर घेऊन आपल्या छावणीची हालहवाल पहाण्यासाठीं आपल्या डेऱ्याबाहेर पडले ते जागोजागचे चौकीपहारे तपाशीत ज्या चौकीवर त्या तरुणाला कैद करून ठेवण्यात आलें होतें त्या चौकीवर आले सरकारस्वारी आलेली पहातांच पहारेकऱ्यांनीं त्याना खडी ताजीम दिली व त्या कैदी तरुणाला त्यांच्यासमोर उभें केलें

"याला तुम्हीं का कैद केले ?" गोविंदपंताने खाली मान घालून जोडल्या हातानी समोर उभ्या असलेल्या कैद्याकडे पाहून पहारेकऱ्याला विचारलें

"सरकार! हा शत्रूचा हेर असावा असा आम्हाला संशय आला" असें सांगून पहारेकऱ्याने सर्व वृत्तान्त गोविंदपंताच्या प्रश्नाला उत्तरादाखल पण मुख्यत सरकारस्वारीला उद्देशून निवेदन केला

तो वृत्तान्त ऐकताना बाजीराव व गोविंदपंत हे का नकळे, कावऱ्याबावऱ्या मुद्रेने एकमेकाकडे पहात होते तेवढ्यात गोविंदपंत पहारेकऱ्याची नजर चुकवून बाजिरावाच्या कानाशीं लागून कायसे बोलले पण ते काय बोलले ते तिसऱ्या कोणालाच ऐकू गेले नाही त्यावर 'अस्से!' एवढा एकच शब्द बाजिरावानीं हसत हसत उच्चारला, व त्याच पावला मागे परतून त्या पहारेकऱ्याना आज्ञा केली, "ह्या तरुणाला आताच्या आता बंधमुक्त करा व त्या म्हातारीसह या दोघानाही सरकारस्वारीकडे पाठवून द्या"

सरकारस्वारी माघारी वळेतो त्या कैद्याने भीतीने वर मानदेखील केली नव्हती तो बंधमुक्ततेची आज्ञा ऐकताच वर पहातो, तो सरकारस्वारी पाठमोरी दहा पावले दूर गेलेली त्याला दिसली

"जा, बाबा! जा! तुझे भाग्य आज जोरावर दिसत त्या आपल्या म्हातारीला घेऊन आत जा" एक पहारेकरी त्या तरुणाला बंधमुक्त करून म्हणाला

इतका वेळ त्या मायलेकराचे जरादेखील ऐकून घेण्याला ते पहारेकरी तयार नव्हते पण आता ते आपण होऊन त्याची चाकशी करू लागले त्याना जेव्हा ती स्त्री कृष्णराव नावाच्या पेशव्याच्या नव्या नोकराची आई देवकी आहे, व तो तरुण त्याचा भाऊ बळिराम आहे असे कळले, तेव्हा त्याना त्या मंडळीच्या सुभाग्याविषयी हेवा वाटू लागला त्यातल्या एका पहारेकऱ्याने बळिरामाला विचारले, "मग हे तुम्हीं आम्हाला प्रथमच का नाही सागितले? म्हणजे आम्हीं तुम्हांला अडविले नसतें"

बळिरामानें आपल्या आईला आणावयाला जाता जाता विचारलें, "मीं पुष्कळ घसा फोड फोडून सांगितलें पण तुमचे तिकडे लक्ष्य असेल तर ना?"

"अरे, आतां एवढी कृपा कर, महाराजा! मारामारीची गोष्ट सरकारस्वारीच्या कानावर घालूं नकोस"

त्या मंडळीचा समेट व्हावयाला फार वेळ लागला नाहीं पहारेकऱ्यांनीं म्हातारीच्या पायावर मस्तक ठेवून तिची क्षमा मागितली व तिनेंही उदार अंतःकरणानें त्यांना क्षमा केली पण तिला अखेरपर्यंत एक शंका होती ती अशी कीं, हे दोन घटकांपूर्वीचे मग्रूर पहारेकरी एकाएकीं इतके नम्र कसे झाले!

प्रकरण दहावें

# मायलेंकरें

"हे श्रीमत बाजीराव पेशवे नव्हेत असे म्हणण्याची कोणाची छाती आहे?" आवजी कवडे नारायणजीना म्हणाले

"खरेंच, सरकाराना दडवावें व याला पुढें करावें इतकें दोघांत विलक्षण साम्य दिसतें आपला बेत इतका बेमालूम साधेल अशी मला कल्पना नव्हती कोणी म्हटल्या कोणीच याला ओळखूं शकलें नाहीं" नारायणजी ढमढेरे चिमाजीअप्पा-कडे वळून म्हणाले, "धाकटे सरकार! आता तरी आमच्या कारस्थानाची उप-युक्तता आपल्या मनाला पटली कीं नाहीं?"

"हो! आता पटली तुमची शाबास आहे खरी!" चिमाजीअप्पा म्हणाले

"पण ही शाबासकी खरें पाहू जाता मला मिळाली पाहिजे" गोविंदपंत हळूच समयसूचकतेनें म्हणाला, "मुळांत ही कल्पना मीं सुचविली, तेव्हा ती नारायणजी व आवजी याना सुचली"

"खरी गोष्ट आहे ह्या कल्पकतेचें सारें श्रेय गोविंदपंताचें आहे" नारायणजी म्हणाले

कृष्णराव कपडे उतरता उतरतां म्हणाला, "पण मी जर एका गोष्टींत प्रसंगा-वधान राखलें नसतें, तर हें सारें कारस्थान एका क्षणांत ढासळून पडलें असतें. मी जर कोणाशीं माझ्या नेहमींच्या आवाजांत बोललों असतों, तर लोकानीं मला तेव्हाच ओळखलें असतें मीं आवाज बदलला म्हणून बरें झालें"

"तें सारें खरें" गोविंदपंतानें त्याला विचारलें, "पण हें तूं यावेळीं काय आरंभिलें आहेस? हा पोशाक इतक्यांत उतरूं नकोस घेतलेल्या सोंगाची बतावणी नीट झाली पाहिजे. पेशवेसरकाराना भेटावयाला आता तीं मायलेंकरें पहारेकऱ्यां-बरोबर येतील, तेव्हा त्याना त्याची भेट झाली पाहिजे नाहीं तर सारें कारस्थान अवेळीं उजेडांत यावयाचें!"

"म्हणजे? मीं जसें साऱ्या दुनियेला फसविलें व फसविणार, तसेंच माझ्या जन्मदात्या आईलादेखील फसवूं की काय? नाहीं, नाहीं, मीं माझ्या आईला कधींच फसविणार नाहीं. सृष्टि उलथीपालथी झाली तरी माझ्या आईला मी

फसविणार नाही माझ्या ठायीं काहीं गुण असतील, काही पाणी असेल, तर ती माझ्या आईची मला अमोल देणगी आहे त्या परमपूज्य मातृस्थानाशीं मी कधींच बेइमान व्हावयाचा नाहीं " कृष्णराव निग्रहाने म्हणाला

" पण अरे वेडया ! " गोविंदपत किंचित हसून म्हणाला, " मी तुला तुझ्या आईशीं बेइमान व्हावयाला कोठे सागतो आहे ? आपल्या आईचे मन न दुखवितां तुला तू शिरावर घेतलेली कामगिरी पार पाडावयाची आहे ना ? "

" हो ! पण म्हणून काय मी माझ्या आईची फसवणूक करू ? नाहीं कधींही नाही ती आली म्हणजे मी तिची समजूत घालीन, तिच्या तोडून समाधानपूर्वक होकार वदवीन, तिचा आशीर्वाद घेईन, व मग मी माझ्या कामगिरीवर निघेन "

" पण देवकीकाकू तुझ्या जिवासाठीं किती जपते, हे तुला माहीत आहे ना ? समजून उमजून काळाच्या जबडयात उडी घेण्याच्या तुझ्या धाडसाला ती समति देईल का ? "

" तर ! तुला काय वाटते, ती माझ्या कर्तव्याच्या आड येईल ? " कृष्णराव विस्मयपूर्वक स्मितहास्य करीत उद्गारला " भल्या माणसा ! ती माझी आई आहे "

" तू स्वत ला असा काय समजतोस ? माणसानें कधी गर्वाने फुगून जाऊ नये " गोविंदपत म्हणाला

" पण माणसाने स्वाभिमान बाळगू नये असे तर तुझे म्हणणे नाहीना ? "

" स्वाभिमान असला तरी तो फोल असू नये बोलावयाचे शब्द प्रथम कृतींत उतरलेले असावे, तर त्या बोलण्यात शोभा, नाहींतर उगाच बोलघेवडेपणा मात्र पदरी येतो "

" वेळ आली, म्हणजे माझ्या बोलात व कृतींत किती ततोतंत मेळ आहे हें तुला आपोआप दिसून येईल "

" अरे ! पण तुम्ही एक चूक मघापासून करीत आहां ! पेशवे सरकारांशीं बोलताना अरेतुरेची सलगीची भाषा वापरता यांचा अर्थ काय ? " चिमाजी अप्पानीं मध्येच विचारले त्याचा उद्देश मुख्यतः त्या घरगुती वादाला खंड पाडण्याचा होता

" खरें आहे " गोविंदपंत कृष्णरावाची पगडी पुन्हा त्याच्या मस्तकावर ठेवून त्याला लवून मुजरा करीत म्हणाला.

" इतकी थट्टा करण्याचें कारण नाहीं " कृष्णराव जरा ओशाळा होऊन म्हणाला.

"ही थट्टा नव्हे ! हा त्या वस्त्रांचा मान आहे " कृष्णराव म्हणाला इतक्यांत देवकीला घेऊन बळिराम तेथे येऊन पोंचला आतां कृष्णराव आपली भूमिका कशी साजरी करतो इकडे सर्वांचे डोळे लागून राहिले.

देवकी व बळिराम या दोघांनींही पेशव्यांच्या वस्त्राभूषणानीं नटलेल्या कृष्णरावाला न ओळखता नम्रतापूर्वक वदन केले पण कृष्णरावानें त्या दोघांच्याही मस्तकाचा आपल्या पायांना स्पर्श होण्यापूर्वीच त्याना हातार्शी धरून उठवीत विचारलें, "आई ! दादा ! तुम्हीं मला ओळखलें नाहीं का ?"

"कोण ? कृष्णा ! तूं का तो ?" देवकीने कृष्णरावाच्या वैभवशाली भूमिकेकडे पाहिले, त्याबरोबर तिच्या कठीं गहिंवर दाटून येऊन तिला कांहीं बोलवेना ती दोन शब्द बोलून जरा थावली व लगेच कृष्णरावाला पोटार्शी धरून आपल्या प्रेमाश्रूनीं त्याला न्हाऊ घालीत म्हणाली, "माझा बाळ खरोखर भाग्यशाली आहे. परमेश्वराने माझे आयुष्यही माझ्या बाळाला द्यावें पण काय रे गुलामा ! पेशवे सरकारांनीं तुला एवढ्या वैभवाला चढविताच तू देखील आपल्या माणसांना-आपल्या जन्मदात्या आईला देखील विसरण्याइतका चढून गेलास होय ?"

"तसें नाहीं आई !" कृष्णराव सभोंवारच्या मडळीकडे पहात स्मितहास्य-पूर्वक म्हणाला, "आताच मी तुझ्या भेटीला येणार होतों "

"म्हणे आतांच येणार होतों तसा तू पक्का तोंडपुजा आहेस, मला माहीत आहे थाव, सरकाराना सागून मी तुझी खाशी कानउघाडणी करायला लावतें" असें म्हणून म्हातारीनें गोविंदपताकडे वळून विचारलें, "गोविंदा ! सरकारांची स्वारी कुठे आहे रे ?"

देवकीने बाजिरावाची चौकशी करावयाला व ते तेथें यावयाला एक गाठ पडली बाजीराव वास्तविक त्यावेळीं बाहेर यावयाचे नव्हेत. पण त्यानाही त्याच वेळीं आपल्या सैन्यात हिंडून कोण काय बोलते हें ऐकण्याची इच्छा झाली एखादे वेळीं मडळींत हिंडून मडळींचा अदाज घेण्याची बाजिरावाना सवय होती हा त्यांचा फेरफटका अगदीं खासगी स्वरूपाचा असे व अशा वेळीं आपली ओळख इतरांना पटू नये अशी ते पूर्ण खबरदारी घेत आजही ते अगदीं एखाद्या साध्या सैनिकाच्या वेषानें हिंडावयाला बाहेर पडले होते इतक्यांत त्यांना त्यांच्या एका गुप्त बातमीदारानें चिमाजीअप्पा वगैरे मडळीच्या कारस्थानाची बातमी दिली, त्याबरोबर ते तशाच वेषानें त्या मंडळीच्या मागोमाग पण कोणाला दिसणार नाहीं इतक्या

अंतरावरून हिंडत होते ते अकस्मात् तेथे आलेले पहाताच सर्व मंडळीला अत्यंत आश्चर्य वाटलें

"श्रीमंताची स्वारी अशा अपरात्री इकडे कोणीकडे ?" नारायणजींनीं ओशाळे पणानें विचारलें

बाजीराव स्मितहास्यपूर्वक उत्तरले, "रात्रीची वेळ साधून कोणी तोतया माझ्या सैन्यांत फितूर करीत हिंडत आहे अशी बातमी ऐकली, म्हणून त्याचा तपास करीत हिंडत होतों"

बाजिरावाना पाहून इतर सर्वांपेक्षा कृष्णरावाची फारच तारांबळ उडाली बळि-रामाच्याही मनात प्रथम भीतीचा उदय झाला होता, आपण श्रीमंताच्या लोकांशीं मारामारी केली याबद्दल श्रीमंत काय म्हणतील असे भय त्याला वाटत होतें पण ज्या श्रीमंताना आपण प्रथम भ्यालो ते श्रीमंत बनावट आहेत असें पहाताच त्याच्या मनातील भय कमी होऊन ते स्थान कुतूहलाने पटकावले होते देवकी मात्र बाजिरावाना भेटून आपल्या मुलाला एकदम एवढी बहुमानाचीं वस्त्रे व अधिकार दिल्याबद्दल त्याचे आभार मानण्यासाठीं उतावीळ झाली होती. तिनें बाजिरावांना पाहिले, व नारायणजींनीं त्याना 'श्रीमंत' या नावाने संबोधिलेलें ऐकलें, त्यावरून ते कोणी तरी खासे असावे अशी अटकळ तिला करता आली. पण तेच बाजीराव असतील असें मात्र तिला वाटले नाही तिने पुन्हा गोविंदपंताला विचारलें, "हेच आपले सरकार का ?"

"होय" गोविंदपंत उत्तरला

देवकीने लगेच बाजिरावाचे पाय धरले व त्याची विनवणी केली, "सरकारांनीं माझ्या मुलाला एकदम एवढी बढतीची जागा देऊन आम्हा सर्वांना साताजन्माचें ऋणी करून ठेविलें आहे इतके दिवस मला वाटत होतें कीं, माझा कृष्णा शिपायी-पेशात न शिरलेला बरा. बरें तर बरें, उगाच एखाद्या हल्ल्यांत सापडला तर कीड-मुंगीसारखा चिरडला जायचा ! त्यापेक्षा त्याला एखाद्या बिन्लढाऊ कामगिरीवर नेमा असा माझा गोविंदापाशीं आग्रह होता पण आता पहातयें तों सरकारांनीं माझ्या मुलाला सरदार-मानकऱ्यासारखी मोठ्या हुद्दयाची जागा दिली आहे !"

मध्येच गोविंदपंत म्हणाला, "देवकीकाकू ! आतां तरी तुझ्या मुलानें लढाऊ पेशा पत्करला म्हणून तुला वाईट वाटत नाहीं ना ?"

"छे ! आतां वाईट कशाला वाटेल ?" देवकी आनंदानें उत्तरली.

" पण हे मानमरातब साभाळण्यासाठीं तुझ्या कृष्णाला आतां तळहातावर शिर घेऊन लढावे लागेल ते तुला आहे कबूल ?" गोविंदपतानें पुन्हा विचारलें

" माझी परीक्षा पहातोस काय ? " देवकी हसत तितक्याच जोरानें म्हणाली, " इतके तुम्ही एकापेक्षा एक रणगाजी आहां त्यात तो एक आहे माझ्यापेक्षा त्याची काळजी तुम्हाला आहे, व तुम्हा सर्वांची काळजी परमेश्वराला आहे "

गोविंदपत म्हणाला, " आमच्या आयानीं आम्हाला आमच्या देशाच्या व धर्माच्या सेवेत राबवून घेण्यासाठी सरकाराच्या स्वाधीन केलें आहे. आम्ही विजयी होऊन नावारूपाला आलो तर आमच्या आयाना धन्यता वाटेलच, पण जर होऊ नये ते झालें, आम्हाला जर आमच्या सरकारासाठी स्वत चे प्राण खर्ची घालावे लागले, तर आमच्या आया कपाळाला हात लावून रडत बसणार नाहींत, 'देशाच्या–धर्माच्या– न्याच्या सेवेत रगून गेला असता माझा मुलगा बळी पडला, तो मरून अजरामर झाला' असे म्हणून त्या धीराने पुत्रशोक पचनीं पाडतील हेंच पहाना ! आमच्या सरकाराच्या आईसाहेब दरएक मोहिमेवर सरकार निघाले म्हणजे त्या मोहिमेत सरकाराच्या जिवाचें काय होईल याची चिंता न करता विदुला मातेप्रमाणे त्याना उपदेश करतात "

" आई ! विदुलामातेची गोष्ट तुला माहीत आहेच "§ कृष्णरावाने आपला पेहराव उतरता उतरता विचारले

" हो ! ती गोष्ट मला माहीत आहे " देवकी उत्तरली, " परमेश्वरानें जगात त्या सर्व आयांना विदुलेसारखे धैर्य व संजयासारखे पराक्रमी पुत्र द्यावे "

बाजीराव बराच वेळ अगदीं स्तब्ध होते कृष्णरावाला सर्व मडळीने आपला पेहेराव देऊन सर्वत्र कां मिरवून आणले असावें हा विचार एकसारखा त्याच्या

---

§आपला पुत्र संजय रणागणातून पळून आलेला पाहून त्याला—

" युद्धामध्यें अपलायन । धर्म हा क्षत्रियाचा जाण ॥
तो धर्म त्यागुनी प्राण । कासया तू रक्षिसी ॥
'मी मरेन' हें नाणीं मनीं । सती जैसी पडे सरणीं ॥
तैसा देह समरांगणीं । लोटिजे बा ! निःशंक ॥

असा स्फूर्तिदायक उपदेश करून पुन्हा रणागणावर पाठवून देणाऱ्या विदुला मातेची पुराणांतरींची गोष्ट कोणाला माहीत नाहीं !

मनात घोळत होता देवकी इकडे आपल्या मुलाशीं बोलण्यांत गढून गेली आहे असें पाहून त्यानीं चिमाजीअप्पाना बाजूला घेऊन 'याचा अर्थ काय' असें विचारलें तेव्हां 'त्यात विशेष कांहीं नाहीं, मडळीने एक गमत करून पाहिली' असे उत्तर अप्पानीं दिलें त्यावर बाजिरावाचा विश्वास बसेना अप्पा काय, नारायणजी ढमढेरे काय किंवा आवजी कवडे काय, मनात कांही तरी हेतु धरल्याशिवाय अशी गोष्ट करावयाचे नाहींत हे त्यांना माहीत होतें पण त्या हेतूची दाद लागू देण्याला ही मंडळी तयार नाही असे पहाताच बाजिरावांनी गोविंदपताला बाजूला घेऊन विचारलें, " गोविंदा ! याचा अर्थ काय रे ? "

गोविंदपत पट्टीचा हुजरजबाबी व प्रसगावधानी होता तो चट्कन् उत्तरला, " सरकार ! कृष्णरावाच्या भो या आईची समजूत करण्यासाठीं आम्हाला हे सोंग सजवावे लागले म्हातारी कृष्णरावाने लढाईवर जाऊ नये म्हणून हट्ट घेऊन बसली होती, व आमच्या पुढील योजनेत आम्हाला तर त्याची अत्यत आवश्यकता आहे शिवाय तो स्वत राजीखुषीनेच आपला सदेश घेऊन दाभाडयाकडे जावयाला तयार आहे तेव्हा त्याच्या म्हातारीची संमति मिळविण्यासाठी आम्हाला असे भासवावे लागले कीं, आपण कृष्णरावाला एकदम सरदार दरखदाराच्या मान्यतेला चढविलें आहे "

" वा. ! हें काय बोलणे झाले ? त्या बिचारीला असे फसवण्यात पुरुषार्थ तो काय ? उद्या तिला जर हा फसवाफसवीचा मामला कळला, तर ती माझ्या नांवानें खडे फोडील कीं ! "

" सरकार ! आपणाला तिच्या धैर्यशाली चारित्र्याची माहिती नाहीं, म्हणून आपण असे बोलता! आताच्याआता तिच्या वृत्तींत किती फरक पडला तो आपणच पहा ! " गोविंदपंत म्हणाला

" पण छे ! " बाजीराव नकारार्थी मान डोलवीत म्हणाले, " असें एखाद्याला फसवणे बरे नव्हे. तुमच्या चुकीचें प्रायश्चित म्हणून मला त्या बाईची माफी मागून खरा प्रकार तिच्या कानांवर घातला पाहिजे "

गोविदपंत बाजिरावांना हात जोडून म्हणाला, " त्यापेक्षा सरकारांनीं ह्या गोष्टींत मुळींच मन घालूं नये आमचे आम्ही पाहून घेतों "

गोविंदपंत व बाजीराव एकीकडे कांहीं बोलत आहेत हें देवकीनें पाहिलें, ते कृष्णरावाविषयींच बोलत असावे हे तिने तर्कानें ओळखलें इतकेंच काय पण तिच्या

तर्कांची भरारी फार दूरपर्यंत पोंचली गोविंदपत बाजिरावांना परोपरीनें विनवून कांहीं सांगत आहे व बाजीराव मानेनें नकारात्मक उत्तर देत आहेत, हें पाहून देवकीनें अजमावलें कीं, पराक्रम दाखविल्याशिवाय एवढा बहुमान कृष्णरावाला देणें बरें नव्हे असें बाजीराव म्हणत असावे, व गोविंदपंत कृष्णरावाच्या वतीनें बोलत असावा यात आपल्या मुलाचा म्हणजे पर्यायानें आपलाच अपमान आहे असें देवकीच्या मनानें घेतले व त्यासरशीं ती चिडून बाजिरावांसमोर येऊन म्हणाली, "सरकार ! एखाद्याला लायकीशिवाय मान्यता मिळूं नये असें आपणाला वाटत असेल व म्हणून माझ्या कृष्णाला एवढा मान एकदम देण्याला आपणाला मकोच वाटत असेल, तर मी सागतें कीं माझा मुलगा आयत्या पिठावर रेघोटया ओढून खाण्यासाठी जन्माला आलेला नाहीं तो पराक्रम करून आपली खात्री करून देईल, तेव्हांच आपण त्याला काय मानमान्यतेला चढवावयाचा तो चढवा आपण प्रेमळ व सदगुणाचे चहाते धनी आहां, असा आमचा आपल्यावर विश्वास आहे. मग तर झाले ना ?"

आपणाला देवकी जितकी कोमल व स्त्रीसुलभ दुबळ्या मनाची असेल असें वाटलें होतें तितकी ती नाही असे बाजिरावाना आता वाटू लागल, गोविंदपतानें तिची आताच जी वाखाणणी केली ती यथायोग्य केली अशी त्याची आता खात्री झाली शिवाय जी वस्तुस्थिति त्याच्या मनांतून तिला उघड करून सांगावयाची होती, ती तिला थोडया पर्यायानें का होईना पण आपोआप कळली, असें पाहून आपणावरील जबाबदारी तेवढीच कमी झाली असे त्यांना वाटलें ते देवकीला आपुलकीनें म्हणाले, "आई ! तुमचा हा पुत्र पुढें मागें चागलेंच नांव कमावील अशी मला खात्री वाटते, म्हणूनच त्याला मीं हाताशीं धरला आहे"

"आपल्या तोंडात साखर पडो" देवकी कृतज्ञतापूर्वक उद्गारली

"पण आई ! अत्यंत मोठा मान एखाद्या माणसाला मिळवावयाचा झाला तर त्याला अत्यत मोठा स्वार्थत्याग करावा लागतो, खरें ना ?" बाजिरावांनीं पुन्हा विचारले आपले बोल देवकीला पटतात असें पाहून त्यांनाही तिच्याशीं या बाबतींत जास्त बोलण्याला हुरूप आला

देवकी कांहीं अगदींच अशिक्षित नव्हती ती लिहिण्यावाचण्याला शिकली नव्हती व तिला मोठमोठया गहन विषयांवर वादविवाद करतां येत नसे हें खरें, पण ती जात्याच चतुर, चौकस व पराक्रमी होती तिनें कथाकीर्तनांतून अनेक

वीरांच्या व वीररमणींच्या रसाळ व तेजस्वी कथा ऐकल्या होत्या तिच्या बाळपणांत तिच्या मातापितरांनी-विशेषत. आजोबा व आजी यानीं तिला रोज रोज नव्या नव्या पुराणकथा सागाव्या तिच्या सौभाग्यपणात तिचा पति मुद्दाम महाभारत, रामायण अशा पुराणग्रथातील उत्तेजक गोष्टी तिला ऐकवी मुलाना देखील तें शिक्षण त्या घरात काळजीपूर्वक दिले जाई त्यामुळे मुलानाही त्या कथा पुराणातील पराक्रमी व कीर्तिमान् पुरुषाप्रमाणे आपण व्हावे असे वाटे, व देवकीलाही विदुला, गांधारी, कुंती, द्रौपदी ह्या वीरप्रसूप्रमाणे आपला व आपल्या कुलाचा लौकिक व्हावा असें वाटे. वशानुवश चालू असलेले असले सुसस्कार पिढ्यान्पिढ्या मोठे प्रभावशाली असतात देवकी बोलनचालून माताच पडली, आपले पुत्र दीर्घायुषी व सुखी व्हावे, त्यांच्या केंसालाही धक्का लागू नये, असे तिला वाटले,तर त्यात मातृहृदयाला न शोभण्याजोगे काही होते असे मुळीच नाही दुसरे असें की, पूर्वसस्कार कितीही प्रभावशाली असले तरी प्राप्त परिस्थितीचा व त्या परिस्थितीमुळें सभोंवतीं निर्माण झालेल्या वातावरणाचाही मनुष्यमात्राच्या आयुष्यावर पुष्कळच परिणाम घडून येतो अनेकदां मूळचे सुसस्कार सभोंवारच्या प्रतिकूल अथवा मोहमय वातावरणांत लुप्तप्राय होऊन जातात, व ते आवरण कोणत्याही कारणाने दूर न झाल्यास उकिरड्याच्या ढिगाऱ्यात पुरल्या गेलेल्या तेजस्वी चिंतामणींसारखी त्या सुसस्कारांची दुर्दशा होऊन जाते पण कोणत्याही कारणाने ते प्रतिकूल वातावरण दूर झाल्यास त्याचें मूळचे तेज पूर्वी इतक्याच किंवा पूर्वीच्याहूनही अधिक तेजाळतेने तळपू लागतें. कधीं मनुष्यमात्राच्या सस्कारजन्य अथवा आनुवंशिक गुणश्रेष्ठतेला प्रकाशात आणावयाला सद्गुरूची जोड लागते, तर कधीं सभोंवार निर्माण झालेली अनुकूल परिस्थितीच गुरुस्थान भूषवून तें कार्य करते. देवकीला आज जो गुरु भेटला, तो सभोंवार निर्माण झालेल्या परिस्थितीच्याच होय प्रथम ती आपल्या पुत्रानें लढाईवर जाऊ नये अशी इच्छा करीत होती, तेव्हां तिला आपले पुत्र, आपला परिवार व आपली गरिबी एवढेंच तुटपुंजे जग डोळ्यासमोर दिसत होतें. त्यापलीकडच्या जगाची यथावत् कल्पनाच तेव्हा तिला नव्हती. पण तिनें जेव्हां पेशव्यांच्या छावणींतील एकदर वैभव व त्या वैभवानें नटलेला स्वतःचा पुत्र हे देखावे पाहिले, तेव्हां तिला आपल्या डोळ्यांचें पारणें फिटल्यासारखें वाटलें. तिनें तेव्हां स्वतःच्या मनाशीं सभाषण करून ओघानें ह्या एकंदर गोष्टीचा कार्यकारणभाव ओळखण्याचा प्रयत्न केला, 'कृष्णा पराक्रमी असेल, पण त्याचा

पराक्रम पहाण्यापूर्वीच पेशवे सरकारांनी त्याला एवढा बहुमान दिला, हे त्यांचे आपल्यावर अनंत उपकार नाहींत काय ?' 'अर्थात् !' 'ह्या उपकाराची अंशतः फेड करण्यासाठीं तरी कृष्णानें आपल्या धन्याच्या जिवाला जीव देऊन धन्याच्या कल्याणासाठीं झटावयाला नको का ?' 'अर्थात झटायला पाहिजे'

एवढी कृतज्ञताबुद्धि देवकीच्या मनात जागृत झाली, त्यामुळें आपल्या मुलानें लढाईवर जाऊ नये ह्या तिच्या कोत्या विचाराचा आपोआप निरास झाला कृष्णरावाने विठुला राणीची आठवण देऊन माता या नात्यानें तिला तिच्या कर्तव्याची जाणीव करून दिली, तीही तिला पटली लगेच बाजिरावानीं 'आई' म्हणून तिला संबोधिले, त्या संबोधनाने तर तिला आपला एवढा बहुमान झालासा वाटला व बाजिरावाविषयी तिच्या अंतःकरणात इतका आदर वाढला की, त्या भरात ती स्वतःशी 'असल्या प्रेमळ व नम्र धन्यासाठीं कष्ट करणे व मरणे ही जोड मिळायला देखील पूर्वपुण्याई पाहिजे' असें म्हणाली इतकी तिची मनोभूमिका प्रसंगाला साजेशी तयार झालेली पाहूनच बाजिरावानीं तिच्यापाशी चतुराईनें वैयक्तिक स्वार्थत्यागाचा प्रश्न काढला

देवकी तें ऐकून म्हणाली, ' सरकार ! हे काय सांगायला पाहिजे ? असा स्वार्थत्याग माझ्या मुलांनीं अजून केला नाही हे खरें, पण ओघाओघाने आपणाला अनुभव येईल की, माझे मुलगे आपणासाठी सगळेही कष्ट सोसून प्रसंगी स्वतःचा बळी देऊनही आपणाला स्वामिभक्तीची पराकाष्ठा करून दाखवितील. माझी आता आपणाला अशी विनंती आहे की, जसे एका मुलाला आपण हाताशीं धरले आहे तसेंच ह्या दुसऱ्याही मुलाला हाताशीं धरा व आपल्या सेवेंत राबवून घ्या "
असें म्हणून देवकीनें बळिरामाला हाताशीं धरून बाजिरावाच्या पायावर घातलें

## प्रकरण अकरावें

# 'जग दिसतें तसें नसतें !'

"हाच कृष्णरावाचा भाऊ काय ?" बाजिरावांनी गोविंदपंताकडे वळून विचारलें.

"होय सरकार !" गोविंदपंत उत्तरला त्यानें बळिरामालाही कृष्णरावाप्रमाणेंच पदरीं आश्रय मिळण्याविषयी बाजिरावांना अगोदरच विनंति करून ठेविली होती, व तेव्हाच बळिरामाला मोघ्याच्या आश्रयाला का मुकावें लागले ते वृत्तही सविस्तर निवेदन केले होते तेव्हाच बाजिरावाच्या मनात बळिरामाविषयी आदर उत्पन्न झाला होता ते देवकीला म्हणाले, "आई ! असे बाणेदार व स्वामिनिष्ठ सेवक मिळणं हें धन्याचे महद्भाग्यच समजावयाचे. अशा सेवकाना घराबाहेर घाल विताना मोघ्यानी कांहीं विचार करावयाला पाहिजे होता मोघे काय किंवा आम्ही काय, धनी शोभतों ते अशा पुण्यवान् सेवकाच्या पुण्याईवरच विजयलक्ष्मी जी आमच्यासारख्यांच्या घरात वस्ती करते, ती अशा सेवकाच्या पुण्याईच्या छायेला राहूनच वस्ती करते असे सेवक धन्याच्या जाचाला कटाळून निघून गेले, कीं लक्ष्मीही रुसून त्याच पाऊलवाटेने निघून जाते. मी तर असें समजतों कीं,आज ह्या राम लक्ष्मणांसारख्या सच्छील व पराक्रमी बंधूच्या रूपाने परमेश्वरच माझ्या मस्तकावर कृपाछत्र धरण्यासाठीं माझ्या घरी आला आहे आई ! ह्या तेजस्वी तरुणाच्या पराक्रमाला माझ्या पदरीं पूर्ण अवसर मिळेल जसा चिमाजीअप्पा हा माझा भाऊ, तसेच हें दोघेही माझे भाऊच आहेत असें मी समजतों, तुम्ही त्यांच्याविषयीं मुळींच काळजी करूं नका"

बाजिरावाचे हे जिव्हाळ्याचे बोल ऐकून देवकीला गहिंवरून आले ती पुन्हा बाजिरावांच्या चरणांना वंदन करून गद्गद कंठानें उद्गारली, "सरकार ! ईश्वर दीनाचा साह्यकारी आहे. सचोटीनें वागणाऱ्या सर्वांवर त्याची पूर्ण कृपादृष्टि असते माझे मुलगे राम लक्ष्मणासारखे पराक्रमी आहेत किंवा नाहींत हें मी माझ्या तोंडानें कशाला सांगूं ! सरकार बोलले हा ईश्वरच त्याच्या मुखीं उभा राहून बोलला असें मी म्हणते."

देवकीची आतां पुरी समजूत पडली, कृष्णराव व बळिराम यांनीं लढाईवर

जाऊं नये हा तिचा पूर्वीचा आग्रह आता उरला नाहीं, असें पाहून गोविंदपंताला वाटलें कीं, कृष्णरावावर बाजीराव कोणत्या कामाची जबाबदारी टाकणार आहेत तें, तिला स्पष्ट करून सागावयाला प्रत्यवाय नाहीं तो म्हणाला, "देवकीकाकू ! पण सरकारानीं विश्वासानें फार मोठी कामगिरी कृष्णरावाला सागितली आहे सरकाराचा निर्वाणीचा खलिता घेऊन सरकाराचा वकील म्हणून कृष्णरावाला दाभाड्याकडे जावयाचें आहे सरकारच स्वत जाणार होते, पण न जाणो, दाभाडे पराकाष्ठेचे दुष्ट आहेत, त्यांनीं जर सरकाराना दगाफटका करावयाचे मनांत आणलें, तर मोठा कठिण प्रसग ओढवेल, म्हणून त्यांच्याऐवजी कृष्णराव तिकडे जाणार आहे"

"एवढे भाग्य माझ्या बाळाचे उदेलेले पाहून मला ते कसे बरे रुचणार नाहीं ?" देवकी गहिवरलेल्या स्वरानें म्हणाली

"खरें, पण आई ! ही जी कामगिरी सरकार तुमच्या मुलाला सागणार आहेत, तें सतीचे वाण घ्यावयाला सागणार आहेत आणि ते त्यालाच सांगणार आहेत याचें कारण हें वाण त्यानें स्वसतोषानें पत्करले आहे आमच्या पदरी इतके लोक आहेत, पण समजून उमजून धन्यासाठीं काळाच्या जबड्यांतून मार्ग काढणारा स्वामिनिष्ठ मर्द स्वयस्फूर्तीनें पुढे आला असा हाच पहिला. जसे तुम्ही आता म्हणाला, तसेच मीही म्हणतो कीं, आम्हाला आमच्या कार्यात यश मिळवून देण्यासाठी हा साक्षात परमेश्वरच पुढे आला आहे" चिमाजीअप्पा म्हणाले

"मी देखील तसेच म्हणते पुराणातरीं बळी दैत्य एवढा माजला होता, त्याचें पारिपत्य करण्यासाठीं परमेश्वरानें वामनरूप धारण केलें होतें मदाध कंसाचा मद जिरविण्यासाठीं त्याच भगवताला बालकृष्णाच्या रूपानें अवतार घ्यावा लागला होता त्याप्रमाणेच ही कामगिरी माझ्या पुत्राच्या हातून पार पाडून घेण्याचा भगवताचा मानस असेल ! भगवताची कृपा असल्यावर सरकाराना किंवा माझ्या बाळालाही कळिकाळाचें देखील भय नाही" देवकी म्हणाली

"पण प्रसगविशेषीं आमच्यासारख्या सेवकांना स्वामीसाठीं स्वत:च्या पंचप्राणाची ओंवाळणी करावी लागते अशी गोष्ट होऊ नये पण झाली, तर मागाहून मनाला धक्का बसू नये, यासाठीं आधींपासूनच मनाची तशी तयारी असलेली चांगली" कृष्णराव म्हणाला

कृष्णरावानें यावर देवकीपासून ज्या धीरोदात्तपणाच्या संमतिदर्शक उत्तराची अपेक्षा केली होती, तें कांहीं तिच्याकडून लौकर मिळेना. तो थोडा वेळ थावून

पुन्हा म्हणाला, " आई ! त्यात एवढे विचार करण्यासारखें काय आहे ? तशी वेळ येऊ नये पण आली, तर आम्ही आमच्या राष्ट्राच्या पोशिंद्यासाठीं मरणाच्या मोलाने झटण्याला तयार असावयाला नको का ? तच मला साग, मी मरणाच्या भयानें नामर्दासारखा पावलोपावलीं अगचुकारपणाने वागू लागलों व त्यामुळें सारें जग माझी छी थू करू लागले, तर ती निंदा ऐकण्यात तुला भूषण वाटेल का ? मरणाच्या भयाने मागे पाऊल घेणारा कोणता पुरुष आजवर पराक्रमी निपजून जगाच्या स्तुतीला पात्र झाला आहे ? फार दूर कशाला ? आमच्या सरकाराचीच गोष्ट घे आम्हीं जे प्रसग कधी कानानी ऐकले देखील नसतील, असले कैक प्रसंग त्यानीं आजवर अनुभवलेले आहेत त्याच्या आईने जर फाजील पुत्रप्रेमाच्या भरात सरकाराना धाडसाचे पराक्रम करण्यासाठी रणागणात उडी घेण्याला वेळो-वेळी प्रतिबध केला असता, तर आज आपल्या मायदेशाची–ह्या महाराष्ट्राची जी सुस्थिति आपणाला दिसते ती दिसली असती का ? आणि पेशव्याच्या घराण्याला आज जे मराठी रयतेचे धन्यवाद मिळत आहेत ते मिळाले असते का ? पेशवे सरकारासारखाच आपल्या पुत्राचा लौकिक व्हावा, त्याच्या पराक्रमाचा माय-देशाच्या उन्नतीला उपयोग होऊन त्याचे नाव देशाच्या इतिहासात अजरामर होऊन रहावे, असे कोणत्या आईला वाटणार नाही ? आई ! तू कल्पना कर कीं, ज्या परमेश्वराने आम्हा लेकराना तुझ्या उदरी जन्माला घातले, तो परमेश्वर साक्षात् तुझ्यासमोर येऊन उभा राहिला व जर तुला म्हणाला की, 'हीं लेकरें माझीं आहेत'. तर त्याला तू काय उत्तर देशील ? परमेश्वराच्या तोंडावर त्याची ही देणगी व जगाच्या उत्पत्ति–स्थिति–लयाचे यथान्याय नियंत्रण करणारी त्याची सत्ता तूं नाकबूल करशील का ? "

देवकीला कृष्णरावाच्या ह्या प्रश्नावर काय उत्तर द्यावे हेंच सुचेना पण परमेश्वराचे नांव निघताक्षणीं नेहमींच तिचें मस्तक परमादरानें विनम्र होई, त्याप्रमाणें ते त्यावेळींही विनम्र झालें ती नम्रपणाने खालीं मान करून मिटल्या डोळ्यांनीं दोन्ही हात जोडून मनातल्या मनात काहींसें पुटपुटली

कृष्णराव जरा थांबून पुन्हा म्हणाला, " आई ! प्रत्येक जीव हें परमेश्वराचें लेंकरू आहे, व त्याच्यावर सत्ता परमेश्वराची आहे ह्या साऱ्या सृष्टीचा उत्पत्ति–स्थिति लयकर्ता तोच एक आहे आईनें म्हणावे हे माझें लेंकरू, व ह्या तिच्या हक्क सपादणी–वर परमेश्वर मान डोलवून म्हणतो, होय. हें तुझेंच लेंकरू. पण ते मीं तुला दिलेलें

आहे. त्याच्यावर खरी सत्ता माझी आहे तुझ्या देशबांधवांच्या कल्याणासाठीं जेव्हां तेव्हां त्याची आवश्यकता लागेल, कोणाच्याही मुखीं उभा राहून मी त्याला हांक मारीन, तेव्हां त्यानें माझ्या हाकेला धावून आलें पाहिजे, व तूंही त्याला अडथळा करतां कामा नये माझी हाक मानणाऱ्या माझ्या लेंकराचा पाठीराखा मी असतों ज्यानें त्यानें आपले कर्तव्य करावें व स्वसंरक्षणाचा भार माझ्यावर टाकावा' आई ! परमेश्वराचा हा संदेश माझ्या कानीं घुमतो आहे म्हणूनच मीं माझ्या रक्षणाचा भार परमेश्वरावर टाकून माझें कर्तव्य करण्याचा निश्चय केला आहे"

देवकी क्षणभर थांबून दीर्घ उसासे सोडीत म्हणाली, "एकूण ह्या प्रसंगीं माझी व माझ्या राधेची पुण्याई कसाला लागायची आहे ह्या गंडांतरातून माझा कृष्णराव वांचला, तर—"

"आई ! 'वांचला तर' असें कां म्हणतां ? तो वांचेल तो खास वांचेल, आणि तो माझा उजवा हात–माझ्या गळ्यातला ताईत होऊन बसेल आई ! कोणींही आत्मप्रौढी गाऊं नये, पण तुम्हीं माझ्याविषयीं कुणापाशींही चौकशी केली, तरी 'सेवकाच्या जिवासाठीं जीव देणारा हा धनी आहे' असेच उद्गार निघालेले तुम्हांला ऐकूं येतील" बाजीराव म्हणाले

देवकीच्या मनांत तो एकच विचार–कृष्णराव बाजिरावाच्या वतीनें दाभाड्या पाशीं शिष्टाई करण्याला गेला तर दाभाडे त्याची काय गत करतील, हा एकच विचार एकसारखा पिंगा घालीत होता बाजिरावाच्या सज्जनतेविषयीं व कृष्ण रावाच्या स्वयंस्फूर्तीविषयीं तिला आतां पुष्कळच विश्वास वाटूं लागला होता, आणि आपण त्याच्या ह्या हेतांत खो घालणें बरोबर नाहीं असेंही तिचें मन तिला सांगूं लागलें होतें तरी पण 'मन चिंती तें वैरी न चिंती' असें म्हणतात, त्याप्रमाणें त्या प्रसंगांतून आपला पुत्र सुरक्षितपणें बाहेर येईलच अशी खात्री तिला वाटत नव्हती कृष्णरावाला अडथळा तर करावयाचा नाहींच, पण तो म्हणजे विजयी होऊन येईलच अशी दृढाशाही उराशीं बाळगावयाची नाहीं, देव काय करील तें खरें, एथवर तिच्या विचाराची परिणति झाली होती ती बाजिरावाचे आशावादी पणाचे उद्गार ऐकून किंचित् विषादपूर्वक हसून म्हणाली, "सरकार ! आपले हे बोल आपली व जगाचीही फसवणूक करणारे आहेत. माझा बाळ ह्या दिव्यांतून सुखरूप पार पडेलच अशी खात्री आपण काय किंवा दुसरा कोणी काय, कशी

देऊं शकेल ? आपण फसणार नाही, कोणत्याही गोष्टीच्या परिणामापर्यंत पोंचण्या इतकी आपली दृष्टि व कल्पनाशक्ति तीव्र आहे हे मी जाणते पण आपण माझी तरी अशी फसवणूक का करूं पहाता ? ” बाजिरावांच्या व इतर मंडळींच्याही कानांना ‘फसवणूक’ हा शब्द बराच कडू लागल्याचे दिसले सर्वांच्या चेहऱ्यांकडे न्याहाळून पाहून देवकी म्हणाली, “ हा फसवणुकीचा आरोप सरकारावर मी आपले पणानें करते आहे. सरकारानीं मला आईचा मान दिला आहे, तेव्हां आईच्या तोंडून कोणताही बरा वाईट शब्द चुकूनमाकून निघाला तरी मुलांनीं तो मनावर घेता कामा नये. आईचें अंतःकरण कोमल हळुवार असतें, तें दुखावलें जाऊ नये म्हणून सरकार असे वळणावळणानें बोलत आहेत हें मला कळते पण जगातल्या इतर आयासारखी आई मी नाहीं, असल्या फसवणुकीने मी फसायची नाही माझें एवढेच म्हणणे की, सरकाराच्या ह्या आश्वासनपर बोलानीं माझ्या व माझ्या मुलाच्या स्वार्थत्यागाला उणेपणा येत आहे ”

“ आई ! ‘जन मरो पण जनाचा पोशिंदा उरो’ याचा अर्थ तुला माहीत आहेच ” कृष्णराव म्हणाला.

“ होय ” देवकी उत्तरली

“ झालें तर ! सरकाराच्या माथा आज अलम् मराठी दुनियेच्या पालनपोषणाचा भार आहे माझ्यासारखा त्यांच्या सेवकजनातील एखादा मेला तर ह्या दुनियेत असे आणखी कितीतरी सेवक सापडतील, पण पोशिंदे सापडावयाचे नाहींत ”

“ कबूल ! मला सारें कबूल ! पण ह्या मराठी दुनियेच्या पोशिंद्याच्या पायाखालीं पोटच्या पोराच्या देहाची पायघडी पसरून त्याला सुखरूप चालवीत नेणाऱ्या आईच्या स्वार्थत्यागाची किंमत सरकारांच्या अशा बोलण्यानें नाहक कमी होते असें मला वाटतें मराठी दुनियेच्या पोशिंद्याची थोरवी मला कळते, म्हणूनच मी त्यांच्या जिवावरून माझ्या पोटच्या गोळ्यांची ओंवाळणी करायला तयार झालें आहें ” देवकी बाजिरावाकडे वळून गंभीर स्वरानें म्हणाली, “ माझे हे एक सोडून दोन्ही मुलगे मीं सरकारांच्या सेवेत अर्पण केले आहेत असें एकवार मीं सांगून सोडलें आहे. अलम् मराठी दुनियेच्या कल्याणासाठीं तळमळणाऱ्या सरकारांना त्याच्या पवित्र देशकार्यांत मी दुबळी यापेक्षां जास्त काय साह्य करूं ? जे शब्द उच्चारायला सरकारांना संकोच वाटतो, ते शब्द मी माझ्या वाचेनें उद्गारतें. माझे मुलगे स्वामिकार्याची सार्थकता करून माघारे येऊन मला भेटले तर त्यांत मला—त्यांच्या

जन्मदात्या मातेला किती आनद होईल, हे सर्वांना कळतेंच पण जरी ते स्वामि कार्यासाठी बळी पडले, तरी मी दु खी होणार नाही माणसानें जेवढी मोठी आशा करावी तेवढी मोठी निराशा त्या माणसाच्या हात धुवून पाठीला लागते, म्हणून या क्षणाला मीं माझ्या असा मनाचा निर्धार केला आहे कीं, आशा म्हणून कशी ती करावयाची नाहीं जे होईल ते होईल आता सरकाराच्या चरणापाशीं माझी हात जोडून एवढीच प्रार्थना आहे की, माझी एकुलती एक सून आणि मी ह्या दोघींनाही माझ्या मुलाबरोबर रहाण्याची मोकळीक असावी " बाजीराव जरा विचारात पडलेले पाहून देवकी म्हणाली, " सरकारांना इतकी चिंता करण्याचे कारण नाहीं जशी मी तशीच माझी सूनही—आम्ही सरकाराच्या ह्या दोघा सेवकावर मायेची पाखरछाया धरून त्यांना त्याचें कर्तव्य पार पाडण्याला हुरूप देऊ, त्याच्या कर्तव्याच्या आड येणार नाहीं " देवकीच्या तोंडून हे शब्द निघावयाला व सरकारी पहा यावर मध्यरात्रीचे बारा ठोके पडावयाला एक गाठ पडली देवकी ते ठोके ऐकून म्हणाली, " ऐका सरकार ! ऐका ! मी बोललें ते सत्य आहे सरकार ! जन्मदाती आई व जन्माची सोबतीण बायको, याच्या सद्भावाच्या प्रार्थना परमेश्वरास तेव्हाच ऐकू जातात त्याच्या प्रार्थनेच्या एकेका शब्दात सहस्र नागार्जुनाचे बळ साठवलेलें असते आपणाला ह्या बळाचा अनुभव नसेल तर एकवार अनुभव घेऊन पहा "

देवकीचे हे बोल ऐकून बाजीराव व चिमाजीअप्पा एकमेकाकडे पाहून हंसले सकाळीं मस्तानीवरून हाच विषय निघालेला त्याना तेव्हा आठवला ते देवकीला म्हणाले, " पण आई ! इथेच तुम्ही रहाल तर बरे, आमची सडळीही आहेत·—

" पण—" एवढा एकच शब्द देवकीने उच्चारला, व तिची जीभ अडखळली 'पण तिकडे कृष्णरावावर कोणत्या वेळीं कसा प्रसग ओढवेल नकळे' असें तिच्या मनांतून बोलावयाचें होतें ते अमगळ शब्द तर तिला बोलवले नाहींतच, पण मनांत अमगळ शका मात्र आली कीं, असें मला का वाटावें ?

कोणाच्याही मुखातून याप्रमाणे निघालेल्या अर्धवट शब्दांतून यथार्थ अर्थ निघण्याऐवजीं विपरीत अर्थही निघूं शकतो, व तोच कधीं कधीं अनर्थावह होऊन बसतो देवकी बोलतांना अडखळली असें पाहून बाजिरावाना वाटलें कीं, ती भास्कररामाच्या घरीं आपल्या सुनेसह रहावयाला भिते आहे. बाजिरावाच्या एकट्याच्याच मनांत ही शका आली व इतराच्या मनांत आली नाहीं याचें कारण राधेच्या

ब्राबनीतील भास्कररामाचा पाताळयंत्रीपणा दोन महिन्यापूर्वी त्याच्या प्रत्ययाला आला होता ते देवकीला म्हणाले, "आई! तुम्हाला भास्कररामाच्या घरात रहावयाचें नसेल तर राधेला घेऊन आमच्याकडे येऊन रहा मग तर काही हरकत नाहीं ना?"

"भास्कररामाच्या घरीं राहायला मला कोणतीच हरकत वाटत नाहीं" देवकी म्हणाली, "त्याचा येतु कसाही असला, तरी ते सज्जन आहेत उगाच जगाचीं भाडणे विकत घेऊन दावेदारां माजविण्याची आम्हाला गरज नाही"

देवकीच्या तोंडचे वाक्य पुरे होते न होते तोच तिच्या समोर उभा असलेला बळिराम थाम्कन शिंकला देवकीच्या ते ध्यानी आले नाहीं, पण कृष्णरावाच्या ध्यानी आले तो स्वतःशी पुटपुटला, "डावी तारी, उजवी मारी, समोर करी घात—असें का बरे व्हावे?"

कृष्णरावाचे ते बोल मनातले मनात राहिले बाजीराव पुन्हा म्हणाले, "पण राधेच्या मनातून जर तिथे रहावयाचे नसले, तर ती आमच्याकडे आली तरी चालेल"

कृष्णरावाला पुन्हा वाटले की, आपल्या नायकोंचे मनकवडे विचार सरकार इतक्या कळकळीने कल्पनेच्या जोरावर का बरे बोलून दाखवितात? पण त्याची ती शकाही मनातल्या मनात विराम पावली मात्र त्याच्या दोन्ही शकाच्या आघाताचे व्रण त्याला नकळत त्याच्या अतःकरणात कायमचे राहून गेले त्या वेळीं तो स्वतःशीं एवढेच म्हणाला, 'आपण घरी गेल्यावर राधेला याचें कारण विचारू तर खरे!'

देवकी थोडा वेळ विचार करून म्हणाली, "बरे आहे कृष्णा आपल्या कामगिरीवरून परत आल्यावर जेव्हा पुन्हा सरकारस्वारीबरोबर मोहिमेवर जायला निघेल, तेव्हा आम्हाला त्याच्याबरोबर जाता आले म्हणजे झाले तोपर्यंत घाई करण्याचे काही कारण नाहीं"

बाजिरावाच्या मनातून पुन्हा एकवार देवकी वगैरे मडळीला भास्कररामाविषयीं इषारा द्यावयाचा होता पण त्या इषाऱ्यानें उगाच नसते विकल्प उत्पन्न होतील व त्याच्या ठिणग्यानीं निष्कारण कलहाग्नि मात्र पेटेल, ह्या भयानें ते गप्प राहिले हे अगदी सहज झाले पुढें होणार त्याला अनुसरून मनुष्याला बुद्धि होते, ही कल्पनाही तेव्हा त्याच्या मनाला शिवली नाहीं

" बरें तर, आम्ही आता येतों " असा बाजीराव वगैरे मडळीचा निरोप घेऊन देवकी कृष्णराव व बळिराम याना म्हणाली, " चला रे घरी पोर एकटीच केव्हाची वाट पहात बसली असेल "

देवकी निघाली, तिच्याबरोबर बळिरामही निघाला कृष्णराव मात्र चिमाजीअप्पा, नारायणजी ढमढेरे, गोविंदपत याच्या तोडाकडे पाहू लागला त्याचें पाऊल तर उचलेना व मन तर एकसारखे घराकडे—घरातल्या राधेकडे धाव घेत होतें त्याची ही कुचबणा त्या मडळीने ओळखली, तशीच वाचकानींही ओळखावी

कृष्णराव घरी जाण्याला उतावीळ झालेला पाहून त्या मडळीचें आपमान क्षणभर खलबत झाले गोविदपतानें कृष्णरावाला जरा बाजूला घेऊन त्याच्या कानात सागितले, ' सावध रहा बरे ! गोष्ट ह्या कानाची त्या कानाला कळना उपयोगी नाहीं "

' छे ! छे ! असें कधीतरी होईल ? प्रत्यक्ष जन्मदात्या आईपाशीं देखील जर बोललो नाही, तर इतराची काय कथा ? "

" पण जन्मदात्या आईपेक्षाही शेजेची बायको जास्त प्रिय असते असा जगाचा नियम आहे "

' त्या नियमाला मी अपवाद आहे "

शेवटचे उत्तर प्रत्युत्तर बाजिरावाना ऐकू गेले त्यावरून राधा-कृष्णाच्या प्रणयाची मधुर कल्पना त्याच्या डोक्यात आली. पण ते काही बोलले नाहींत, की त्यानीं त्याबद्दल चाकशीही केली नाहीं त्यांना माहीत होते कीं घरोघर मातीच्याच चुली.

असो लगेच देवकी, कृष्णराव व बळिराम आपल्या बिऱ्हाडाकडे निघून गेलीं ती रात्र त्या कुटुबाला किती आनदाची गेली, याचे वर्णन करण्याला कोणाचीही वाणी व लेखणी असमर्थच ठरली असती त्यातल्यात्यात कृष्णराव व राधा याचा आनद तर—कल्पनाची भरारी गगनभेदी असते असे म्हणतात, पण अशा गगनभेदी कल्पनातही न सामावण्याइतका अलोट होता ती सारी रात्र त्या जोडप्यानें नानापरींचा मनोराज्ये रचण्यात घालविली कृष्णरावाला अशी खात्री वाटत होती कीं आपण स्वामिनिष्ठेची पराकाष्ठा करू व पेशवेसरकारही आपल्या स्वामिनिष्ठेचें योग्य चीज करतील, आपणाला मोठी मनसबदारी देऊन गौरवतील मोघे आजवर आपण गरीब म्हणून आपला पाणउतारा करीत आले, पण लौकरच आपल्या आयुष्यात एक असा सोन्याचा दिवस उगवेल कीं, त्याच मोघ्याना त्याच्या पूर्वकृत्या-

बद्दल पश्चात्ताप करण्याची पाळी येईल. मनुष्यस्वभावाचा असा नैसर्गिक विशेष आहे की, मनुष्य परक्याकडून लक्ष वेळा मानखंडना सहन करील पण आप्ताचा एकच अनादराचा शब्दही त्याला मरणप्राय दुःखी करण्याला पुरून उरेल. कृष्णराव व राधा यांची तशीच अवस्था झाली होती. मोध्याचीं बोटे त्याच्या डोळ्यात आपण कधी एकदा घालू असे त्याना झाले होते. मात्र कृष्णरावानें आपल्या अपमानाचा पुरेपूर सूड मोध्यावर उगविण्याची आपली प्रतिज्ञा राधेसमोर जाहीर केली, तेवढी तिला रुचली नाही. स्त्री ही निसर्गतःच कारुण्यमूर्ति असते, या निसर्गनियमाला राधाही काहीं अपवाद नव्हती. तिने तेवढ्यापुरती आपल्या माहेरची कड घेऊन 'अपकाराची फेड नेहमी उपकारानीं करावी असा उपदेश कृष्णरावाला केला. नुसता उपदेश करूनच ती थांबली नाही, मोध्यावर सूड न घेता आपल्या पराक्रमाने व सज्जनतेने त्याना लाजवून स्वस्थ रहाण्याबद्दल तिने कृष्णरावाचे वचन घेतले, व प्रियपत्नीचे प्रिय करण्यासाठी कृष्णरावानेही तिला तसे वचन दिले. पुढे कृष्णरावाने दाभाड्याकडे कामगिरीवर जाताना राधेला बरोबर नेण्याची गोष्ट काढली, व 'तुझ्याशिवाय मला मोहिमेत करमणार नाही' अशा अर्थाच्या अनेक प्रणयमधुर वचनानीं त्या योजनेचे निच्यापाशी समर्थन केले. राधा एरव्ही त्याच्याबरोबर मोहिमेवर जाण्याला आनंदाने तयार झाला असती. पण एकतर ती आपल्या गर्भस्थ अर्भकाला प्राणापलीकडे जपत होती, व शिवाय कृष्णरावाचा स्त्रैणपणा त्याच्या प्रगतीच्या मार्गांत पावलोपावली आडवा येईल असे तिला वाटले, म्हणून तिनें तेवढ्या गोष्टीला मात्र दोन प्रहरच्याप्रमाणेंच नकार दिला. कृष्णराव त्यावर निरुत्तर होऊन बसला. काहीतरी बोलावयाचेच म्हणून तो 'माझे मोहिमेवर कांही बरेवाईट झालें तर मग कसें होईल' असे काही तरी अमंगळ बोलला, व त्याचे तेवढे बोल राधेला घटकाभर रडवावयाला मात्र पुरले.

अशा त्या रात्रीं त्या दपत्यानें बोललेल्या काहीं प्रेमाच्या तर काहीं रागाच्या तर काहीं अनुरागाच्या गुजगोष्टी किती म्हणून सागाव्या! अशा गोष्टी बोलता बोलता रात्र केव्हां निघून गेली ती त्याना कळली देखील नाहीं. अखेर उजाडतें न उजाडतें तों गोविंदपंत कृष्णरावाला हाक मारण्यासाठीं आला, तेव्हां कुठें तें जोडपें आपल्या जागेपणींच्या विचारतद्रींतून जागें झालें.

त्या दिवशींचा उषःकाल त्या सर्वच मंडळीला इतका आल्हादजनक वाटला

कीं ज्याचें नाव तें मात्र तेव्हा गोष्टी बोलत बसण्याला कृष्णरावाला व गोविंद-पंतालाही वेळ नव्हता कृष्णरावाचे पाय राधेसाठीं काहींसे रेंगाळत होते, पण तें तेवढेंच आपला पति आज नशीब काढण्यासाठीं घराबाहेर पडणार, त्याला शुभ-शकुन घडावा म्हणून राधेनें त्याला देवासमोर बसवून आरती ओंवाळली व कुंकु-माक्षता त्याच्या ललाटीं लावल्या तो बाहेर जावयाला निघाला तेव्हा राधा आरती देवासमोर ठेवून जड अंत करणानें त्याला निरोप द्यावयाला बाहेर निघाली, तों तिच्या पायाचा धक्का लागून आरतींतील नीराजन उपडें झालें ! सुदवाने ते एकट्या राधेशिवाय दुसऱ्या कोणींही पाहिलें नाहीं व राधेनेही तें कोणाला सांगितलें नाहीं. पण त्या अशुभानें तिच्या अंतःकरणाला एवढा जोराचा धक्का बसला कीं त्यामुळें तिची कंबर खचली व पाय लटके पडले ती तशीच त्या अमंगळ जाणिवेला हृदयात लपवून लगबगीनें बाहेर जाते, तों कृष्णराव गोविंदपंताबरोबर निघूनही गेला होता

भास्करराम शिष्टाचाराप्रमाणें कृष्णरावाला निरोप देण्यासाठीं पुढें आला होता; तो राधा दरवाजात आलेली पाहून गालातल्या गालात हसला. तेव्हाच राधेचें दैवही कदाचित तिला हसत असेल, नाहीं कोणी म्हणावे ?—पण राधेचे तिकडे मुळींच लक्ष्य नव्हतें ती अपशकुनाचा विचार करण्यात चूर होऊन गेली होती. भास्करराम भेटला तेव्हा कृष्णरावाला बाजिरावाच्या रात्रींच्या संदिग्ध बोलाची आठवण झाली पण ती मनावर न घेता त्यानें 'घरच्या मंडळींकडे लक्ष ठेवा' असें भास्कररामाला सांगितलें, व भास्कररामानेंही ते आनंदानें कबूल केलें

उष कालची वेळ म्हटली कीं, ती मंद मंद वायूचें वाहणें, वृक्षलतांचे डोलणें, फुलांच्या ताटव्यावरील फुलांचे सुगंधी हास्य, पक्ष्यांची किलबिल अशीं अनेकविध मनोरम लेणीं सर्वांगावर चढवून चोहींकडे मिरवत असावयाची, आजही ती तशीच मिरवत होती पण मिरवता मिरवता कोणाला न कळेल अशा भाषेंत ती स्वत शीं पुटपुटत होती, 'जग दिसतें तसें नसतें '

## प्रकरण अकरावें

# हा बातमीदार कोण?

दुसऱ्याच्या दुसऱ्या दिवशीं मोहिमेवर निघावयाचा जो बेत बाजीराव व त्यांचे इतर साहाय्यक यांनीं ठरविला होता, त्या बेतांत त्यांना बदल करावयाला भाग पाडणारी एक गोष्ट त्याच दिवशी आकस्मिक रीत्या घडून आली इकडे गोविंदपंत कृष्णरावाला बोलवावयाला गेला, त्या दरम्यान सर्वांग धुळीने माखलेला व दूरवरच्या प्रवासाच्या श्रमानी अगदीं श्रांत झालेला पण हंसतमुख, सुंदर व वयानें अगदीं तरुण असा एक कैदी बाजिरावांच्या कांहीं सैनिकानी त्यांच्यासमोर आणून उभा केला, व त्यांतल्या एका सैनिकानें सर्वांच्या पुढे होऊन घाईघाईने बाजिरावाना विनंति केली, "सरकार! गेल्या रात्रीं हा मनुष्य वेशीवरील एका पडक्या दरग्याच्या पिछाडीला कोन्हेररामाशीं कांहीं खलबत करीत उभा असलेला आम्हाला आढळला आम्हाला पाहताच कोन्हेरराम आपल्या बायकोसह तेथून निसटला व हा आमच्या हातीं सापडला आम्हीं याला हटकले, पण हा आम्हाला कांहींच समाधानकारक उत्तर देईना त्यावरून आम्हीं ओळखलें कीं, हा शत्रूचा हेर असावा, म्हणून त्याला तेथल्या-तेथें कैद करून आपणासमोर आणला आहे"

बाजिरावाकडून कोन्हेररामाला पकडून आणण्याच्या कामगिरीवर सैनिक गेले होते, तेव्हाच मस्तानीनेही आपल्या वतीने काही लोक त्या कामगिरीवर पाठविले होते. अशा उभयपक्षींच्या सैनिकानी कोन्हेररामाचा शोध करता करता हें सावज पकडलें गेले होतें. मस्तानीकडून ह्या कामगिरीवर गेलेल्या सैनिकात मस्तानीचा सख्खा भाऊ व तिच्या सुंदर नांवाच्या जीवश्च कण्ठश्च चतुर दासीचा नवरा कोदंड हाही त्यात होता गुन्हेगाराचा गुन्हा ज्या मानाने मोठा त्या मानानें त्या गुन्ह्याचा कोणावर काहीं परिणाम झाला असला अगर होणार असला, तरी त्या गुन्हेगाराला पकडण्याची अगर त्याचें पारिपत्य करण्याची कामगिरी ज्याच्या वाट्याला आलेली असते, त्याना बहादुरी मिळविण्याला ती जणुं सोन्याची संधि लाभते. कोन्हेरराम हा बाजीराव व मस्तानी ह्या दोघांच्याही दृष्टीने गुन्हेगार ठरला असल्यामुळें त्याला पकडून आणण्याची कामगिरी ज्या शिपायाच्या वाट्याला आली होती, त्यांनीं त्याचा अत्यंत कसोशीने तपास चालविला होता. मस्तानीने तर कोन्हेररामाला

पकडून आणणाऱ्या माणसाला मोठें बक्षीस देऊ केले होते हे बक्षीस व पेशव्यां-कडून बहाद्दरीबद्दल शिफारसपत्र आणि बढती मिळविण्यासाठीं त्या कामगिरीवर गेलेल्या साऱ्या शिपायाची धडपड चालली होती ह्या धडपडणाऱ्या शिपायात कोदंडच काय तो काहींसा अपवाद होता त्याला बढती अथवा पारितोषिक मिळाले असतें तर तें नको होतें अशातली गोष्ट नाहीं पण तो जो कोन्हेररामाला पकडण्यासाठीं धडपडत होता, तो अंत करणापासून- त्याने आपल्या धनिणीच्या नाशाचे प्रयत्न केले म्हणून चिडून धडपड करीत होता वास्तविक कोन्हेरराम व तो बाजि-रावासमोर गुन्हेगार म्हणून धरून आणण्यात आलेला तरुण घोडेस्वार याना वेशी बाहेरील पडक्या दरग्याच्या मागे बोलत असताना मस्तानीकडून कोन्हेररामाला पकडण्याच्या कामगिरीवर गेलेल्या शिपायानींच व त्यातल्यात्यात कोदंडानेच प्रथम पाहिले होतें पण बाजिरावाकडून त्या कामगिरीवर गेलेले दुसरे शिपायी त्याच्या मागोमाग तेथे उपस्थित झाले, व त्यानी आपसात कोदंडाच्या बाजूच्या शिपायाशीं तंटा आरंभला की, 'आम्हीच कोन्हेररामाला प्रथम पाहिले आहे, व त्याला कैद करण्याचा अधिकार आमचा आहे' कोदंडाच्या बाजूचे शिपायीही भांडण्याला काहीं कमी कणखर नव्हते ते बक्षिसाच्या व बढतीच्या आशेनें 'आम्हीच कोन्हेर-रामाला प्रथम पाहिले व आम्हीच त्याला कैद करणार' असा हट्ट घेऊन बसले अखेर कोदंडानें मध्यें पडून आपल्या लोकाना मस्तानीकडून योग्य बक्षीस मिळवून देण्याचे आश्वासन देऊन कसेबसे आवरलें, व तेवढ्यापुरते बाजिरावाच्या बाजूचे लोक विजयी झाले

पण ते लोक कोन्हेररामाला धरावयाला जातात तो कोन्हेरराम जाग्यावर नाहीं ! त्या शिपायाच्या आपसांतील भांडणाचा फायदा घेऊन त्यानें तेथून केव्हाच पोबारा केला होता, व त्याच्या मागोमाग तो तरुण घोडेस्वारही पळून जाण्याच्या विचारात होता. पण कोदंडानें तेवढ्यात चतुराई करून सर्व लोकांना त्या तरुणासभों-वार गराडा घालावयाला सांगितलें, व त्याचा घोडा उधळून लावला. त्यामुळें तो तरुण हातीं सांपडला तरीही त्याला बाजिरावाकडील शिपायानींच कैद केले व बाजिरावापर्यंत चालवीत आणले तेथे आल्यावरही त्या सैनिकांतील ज्या एका सैनिकाने त्या तरुणाला घाईघाईने बाजिरावांसमोर नेऊन बहाद्दरी मिळविण्याचा अट्टाहास केला, त्याचें नाव तानाजी असें होतें तो यापूर्वी अनेक वेळा असल्या काम-गिरींत फसल्यामुळें बाजिरावांकडून 'मूर्ख' ह्या पदवीला व त्यामुळें इतर सर्वांच्या

उपहासाला पात्र झाला होता त्याने तेथे त्या तरुणाला पकडण्याची एवढी घाई केली ती मूर्खपणाचा आपल्या नावाला चिकटलेला डाग धुवून टाकून, शिवाजीचा उजवा हात शोभणाऱ्या तानाजीचे नाव त्याच्या आईबापाकडून शकुनाने त्याला ठेवण्यात आले होते ते सार्थ करण्यासाठी केली होती आणि इतर शिपायीही त्याच्या त्या घाईच्या आड आले नाहीत याचें कारण ते मात्र बरेच डोकेबाज होते आपल्या हातून भांडणाच्या भरात कोन्हेरराम निसटला ही गोष्ट कोदंडाकडून बाजीराव व मस्तानी याच्या कानी जाणार, व ह्या अपराधाबद्दल आपली खाशी खरडपट्टी निघणार, वेळी ह्या अक्षम्य गाफीलपणा द्दल आपल्या नोकरीवर गदा येण्याचाही संभव, तेव्हा बाजिरावाच्या रागाच्या तोफेच्या तोंडी देण्याला हा जाडजूड तानाजी चांगला आहे व तो आपण होऊन दिमाखाने पुढे जातो आहे, त्याला जाऊ द्या, असा विचार करून ते सर्व शिपायी पुढील मौज पहाण्यासाठी मुद्दाम बाजूला उभे राहिले होते

त्या तरुण गुन्हेगाराच्या सुंदर व कोमल चर्येवर दिसणारें बेफिकीरपणाचें व करारीपणाचें तेज पाहून बाजिरावाना तो गुन्हेगार असावासे वाटेना बरें, गुन्हेगार नाही म्हणावें, तर शिपायी लोकांनीं त्याला कोन्हेररामाशीं बोलताना पकडलें होतें पण त्याला पकडून आणण्यात तानाजी सर्वांचा पुढारी होता असे त्याना तेथल्या एकंदर प्रकारावरून वाटले व तानाजीच्या मूर्खपणाचे मासले त्याना यापूर्वीच अनुभवावयाला मिळाले असल्याने एथेही त्याने तसाच काही अचरटपणा केला असेल असा त्याना दाट सशय आला त्याबरोबरच कोन्हेरराम हातचा निसटला तो तानाजीच्याच मूर्खपणाने निसटला असावा अशीही त्याची ठाम समजूत झाली पण बोलून चालून मूर्ख तो, त्याला काय बोलावयाचे, असे स्वतःशीं म्हणून बाजिरावानीं कोदंडाला विचारलें, "कोदंड ! तुझ्यासारखीं माणसे तेथें असताना कोन्हेरराम तुमच्या हातून निसटून जावा, हे मोठेंच आश्चर्य आहे म्हणायचे !"

कोदंडाला बाजिरावांनी दोष दिला तें ऐकून तानाजीला स्फुरण चढलें तो ऐटीनें छाती वर काढून पुढें होऊन घाईनें म्हणाला, "सरकार ! कोदंड जर आमच्याशीं हुजत घालीत बसला नसता, तर कोन्हेररामही आमच्या हातचा निसटला नसता."

"तूं गप्प रहा ! तू मूर्ख आहेस हें तर जगजाहीर आहे, आणि हे लोक तुझ्या संगतीला लागले म्हणून तेही मूर्खच !" बाजीराव रागावून म्हणाले.

बाजिरावाच्या तोंडून आपली शिफारस होईल व आपणाला बढती आणि बक्षीस मिळेल, मग आपण ऐटीनें घरीं जाऊ व नेहमीं आपणाला 'अचरट' म्हणून हिणवणाऱ्या आपल्या बायकोला ही आनंदाची वार्ता सांगून लाजवूं, इतकेंच काय, आपल्या थोरपणाला साजेशा दुसऱ्या एखाद्या फटाकड्या मुलीशी लग्न करण्याची धमकी बायकोला घालून तिला अगदी गोगलगाय बनवून सोडूं, आजूबाजूचे शेजारी-पाजारी लोक जे आजवर आपणाला 'अचरट, बावळट, मूर्ख' असल्या उपमर्दकारक विशेषणांनीं संबोधून आपला घडोघडी पाणउतारा करीत होते, त्यांना मग थोबाडींत मारल्यासारखें होईल व ते आपणाशीं अत्यंत अदबीनें वागूं लागतील, फार काय, आपल्या बरोबरचे सैनिक जे नेहमीं आपणाला नानापरींच्या दूषणांनीं हिणवीत असतात, त्यांचा नाईक मी होऊन त्यांच्यावर हुकमत गाजवूं लागल्यावर त्यांचीं तोंडें शरमेनें चिमणीएवढीं होतील व ती आपण हसत पहात बसूं, अशी नानाप्रकारचीं मनोराज्यें इतका वेळ तानाजीच्या मनात सुरू होतीं, व बाजिरावांनीं कोंदडाला दूषण दिलेलें ऐकून तर त्या मनोराज्याचा कळस झाला होता! पण बाजिरावांनीं त्याच्या नशिबावर मूर्खपणाचा शिक्कामोर्तब करताच त्याचें तोंड खर्रकन् उतरलें, व सर्व शिपायी 'गुलामाची खाशी फजिती झाली' असें मनात म्हणत त्याच्या तोंडाकडे पाहूं लागले. त्या शिपायांनी यापेक्षाही धीटपणानें उपहासात्मक दृष्टीनें तानाजीकडे पाहिलें असतें; पण त्या अपराधात ते स्वतःही भागीदार होते, व म्हणूनच केवळ ते जरा भिऊन वागत होते.

बाजिरावांचे शब्द कोंदडाच्या मनाला फार लागले. चुगल्या करण्याचा त्याचा स्वभाव नव्हता. पण आपणावरील दोषारोप धुवून काढण्यासाठीं त्याला एकंदर खरा प्रकार जसा झाला तसा बाजिरावांना निवेदन करावा लागला. तो ऐकून मात्र केवळ तानाजीच्या मूर्खपणामुळेंच कोन्हेरराम हातचा निसटला, अशी बाजिरावांची खातरजमा झाली. त्यांच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन झोंबली. त्यांनीं एकदम तानाजीला शिक्षा ठोठावली, "ह्या पाजी माणसाला दहा फटके मारून हाकलून द्या."

तानाजीला ही शिक्षा झालेली पाहून बाकीच्या शिपायांना आनंद झाला. पण तो एरव्हीं झाला असता तितका मात्र झाला नाहीं. कारण हें शिक्षेचें लोण आता आपणांपर्यंत पोंचतें की काय या भीतीनें त्यांची छाती धडधडत होती. त्यांची ती अमंगळ शंका खरी होण्याला मुळींच अवधि लागला नाहीं. बाजिरावांनीं त्यांचा-

देखील खरपूस समाचार घेऊन त्याना तेव्हाच नोकरीवरून दूर केले कोदंड व त्याचे साथीदार मात्र त्या शिक्षेतून कसेबसे बचावले, त्यांना जरी त्या कामाबद्दल बहाद्दुरी मिळाली नाहीं, तरी तानाजी व इतर गुन्हेगार सैनिक याना दंडाला धरून हांकलून देण्याचा मान त्याना मिळाला, व तेवढ्यावरच त्यांनी आपल्या मनाचा विरंगुळा करून घेतला

एवढा अनाहूत सोहाळा पार पडेपर्यंत तो तरुण गुन्हेगार निश्चितपणे बाजिरावा-समोर उभा होता त्याच्या वृत्तीत रेसभर देखील फरक पडला नाही, असे पाहून बाजिरावानाही आश्चर्य वाटलें त्यानी त्याला विचारले, " तू कोण ? "

तो तरुण पूर्ववत निर्भयपणे पण अत्यत नम्रपणाने बाजिरावाना त्रिवार मुजरा करून म्हणाला, ' सरकार ! मी मांडवींचे अधिपति व माझे धनी राजा दुर्जय-सिंग याच्याकडून विनतिपत्र घेऊन आपणाकडे आलो आहे ' लगेच त्यानें आपल्या कमरपट्ट्यांतून एक मोहोरबंद लिफाफा काढून बाजिरावाच्या हातीं दिला

बाजिरावानीं तो लिफाफा उघडून वाचला त्यात पुढीलप्रमाणे मजकूर होता.

श्रीमत परममित्र सकलकलानिधि अतुल प्रतापी हिंदुधर्म-सरक्षक हिंदुजन-
'पालक देशोद्धारक बाजीराव पेशवे यास कनिष्ठ बंधुसमान मांडवी अधिपती
'दुर्जयसिंग याचा साष्टांग प्रणिपात विनती अशी की, इकडे आपलेकडील
'सेनापति त्रिंबकराव दाभाडे यानीं प्रळय मांडला आहे निजाम व बगष
'हे दाभाड्याना सामील झाले आहेत, व त्रिवर्ग मिळून इकडे संचार कर
'णाऱ्या इतर मराठे सरदाराना वश करून घेत आहेत त्या प्रमाणेच या
'प्रांतींच्या लहानमोठ्या मांडलिकाना वळविण्याचा प्रयत्नही सुरू आहे.
'त्यातच माझाही समावेश होतो मी आपला कैवारी व स्नेही, म्हणून
'दाभाडे, निजाम, सरबुलंदखान वगैरे मंडळींच्या डोळ्यांत शल्यसा सलत
'आहें सर्वांनीं मिळून एक होऊन आपला निःपात करण्याचे योजिले आहे,
व ह्या त्यांच्या अधमपणाच्या जे जे कोणी आड येतील, त्यांचा त्यांचा
'प्रथम निःपात व्हावयाचा आहे. मी आपल्या विरुद्ध शत्रूला सामील होणार
'नाहीं हे आपण जाणतांच माझा देश, माझा धर्म व माझे बांधव याच्या
'सर्वस्वावर कुऱ्हाड घालूं पहाणाऱ्या दुर्जनांना मी कसा साह्य होईन ?
'पण यामुळें माझा निःपात होण्याची वेळ मात्र जवळ येत आहे माझ्या

'राजधानीवर चाल करून येण्याचे शत्रूचे बेत रोज चालले आहेत. शत्रूंचें 'सैन्य एवढें मोठें कीं, मला त्या सैन्याशीं टक्कर देतां येणें शक्य नाहीं.

'आपणाला माहीत नसेल की, बंगषाचें माझ्याशीं एका नाजुक कारणासाठीं 'वैमनस्य आहे. ते कारण मी पत्रीं लिहूं शकत नाहीं. एवढें मात्र खरें कीं, 'त्या वैमनस्यामुळें माझ्यावर सूड घेण्यासाठी तो विशेष झटणार. बंगष व 'निजाम यांचें आपणाशी किती वैमनस्य आहे व ते आपणाला कसे पाण्यांत 'पहातात, हे आपण जाणतांच. अशा स्थितींत आपण जर आपल्या सैन्या- 'सह इकडे लौकर येण्याचे केले, तरच आपली व माझी धडगत आहे. मीं 'आपल्या वतीने पिलाजी गायकवाडांकडे मदत मागून पाहिली. पण त्यांनीं ती 'देण्याचे साफ नाकारले. गायकवाड व बांडे यांच्यांतील वैमनस्य आपण 'जाणतांच.§ त्यामुळे तरी बांडे गायकवाडाविरुद्ध मला मदत करण्याला 'तयार होतील अशा आशेने त्यांच्यापाशीं मदतीची याचना केली पण ह्या 'प्रसंगीं आपला निःपात करण्यासाठीं त्या दोघांनीं आपले खासगी वैमनस्य 'बाजूला ठेवलेले दिसतें. कारण बांडे मला मदत करावयाला तयार नाहींत. 'इतकेंच काय, पण गायकवाड व बांडे यांनीही मलाच दाभाड्याना सामील 'होण्याविषयी भयंकर आग्रह चालविला आहे. अशा वेळीं आपण आलां 'तरच कांहीं तरणोपाय !

§ पेशवे बाजीराव, चिमाजीअप्पा, त्रिंबकराव दाभाडे व त्याचा हस्तक पिलाजी गायकवाड, कंठाजी कदम बांडे, आणि उदाजी पवार इतक्यांचा संबंध गुजराथ-च्या व्यवहारांत यावेळीं येतो, बांडे याचा उद्योग पिलाजीच्या अगोदरचा होता, तरी पिलाजी जास्त धाडसी व युक्तिवान असल्याने आरंभींच त्यांमध्यें चुरस उत्पन्न झाली. गुजराथच्या नाक्यावर बांडे यांनी नवापूर हस्तगत केले, तर पिलाजीने सोनगड किल्ला बांधून तेथें आपली व्यवस्था लावली. तेथून त्रिवर्गांनीं म्हणजे पवार, बांडे, व गायकवाड यांनीं सुरत अठ्ठाविशींत दोन वर्षे अंमल बसविला; आणि पुढें राजपिंपळेकरास अनुकूल करून बाबापिराचे उतारावर नर्मदापार होऊन करनाळीस आले. तेथून छाणी, भायली, पादरा येथील पाटलांस सामील करून बडोदे प्रांत हस्तगत केला. त्यांतून पिलाजीची जमेत भारी, बांडे व पवार यांचा सरंजाम कोता होता, सबब त्यांनीं पिलाजीचे तांबेदारीनें रहावें, अशी सेनापतीची आज्ञा झाली. पुढें (गायकवाड) बडोद्यास कायम मुक्काम करून काठेवाड प्रांतीं जाऊन खंडण्या घेऊं लागले. [दाभाड्यांची हकिकत (काव्येतिहाससंग्रह)]

'आणखी एक महत्त्वाची गोष्ट आपणाला लिहावयाची ती ही कीं, सुभेदार 'सरबुलंदखानानाने आपणां मराठ्याशी सख्य करून आपणाला या प्रांतीं 'च्या चौथाई-सरदेशमुखीच्या सनदा करून दिल्या, हा प्रकार बादशहा 'व वजीर खानडौरान यांना मुळींच रुचलेला नाहीं वजिराचें व 'सरबुलदखानाचे नीट नाहीं हें आपणाला कदाचित माहीत नसेल म्हणून कळवीत आहें सरबुलंदखान निजामाप्रमाणेंच स्वतंत्र होण्या 'साठीं बंड करण्याच्या विचारात आहे असा बादशहा व वजीर याचा समज 'झाला आहे सबब त्याचे पारिपत्य करण्यासाठीं बादशहा व वजीर यानीं 'मारवाडाधिपती अभयसिंग याला गुजराथच्या सुभ्यावर नेमून पाठविलें 'आहे ‡ अभयसिंग व पिलाजी गायकवाड याचे काहीं बाबतीत वाकडे 'आल्यामुळे व पिलाजीने सेनापतीच्या पक्षाचा अंगिकार केल्यामुळे आपण 'प्रयत्न केल्यास अभयसिंग आपणाला वश होणें शक्य आहे. असा प्रयत्न 'मींही करून पाहिला असता पण माझें एकटयाचें त्याच्यापाशीं वजन 'पडणे शक्य नाहीं

'तेव्हां ह्या सर्व गोष्टीचा विचार करून, आपल्या अंतःकरणात ह्या 'आपल्या जिवलग मित्राविषयी आपल्याला खरोखरच सहानुभूति वाटत 'असेल तर आपण तावडतोब इकडे येण्याचें करावें. निदान आपण आर 'भिलेलें हिंदुपदपादशाहीचें कार्य आपल्या गैरहजेरींत इकडे आपल्याच 'राजवटीच्या सेनापतींकडून विध्वंसिलें जात आहे इकडे लक्ष देऊन तरी 'आपण माझ्या विनतीला मान द्यावा सुज्ञांस जास्त लिहिणें नलगे, कळावें 'हे विज्ञापना"

आपला स्नेहांकित

**दुर्जयसिंग**

पत्र वाचून झाल्यावर तें घडी करून आपल्या कमरपट्ट्यात खोंचून ठेवून बाजीराव त्या तरुणाला म्हणाले, "एकूण तू शत्रूचा हेर नव्हेस! तू आमचाच मनुष्य आहेस"

"ते काय तें आतां श्रीमतांनीं ओळखावें" तो तरुण स्मितहास्यपूर्वक म्हणाला

---

‡ ह्या प्रसंगाचें विस्तृत व रसभरित वर्णन रॉड व अर्विन ह्या इतिहासकारांनीं आपल्या इतिहासात केलें आहे, व तें बरेंच अधिकृत आहे असें वाटतें.

" पण मग तुझी व कोन्हेररामाची गाठ पडून तुम्हां दोघांचें बोलणें चालणें झाले, हे कसें काय ? त्याची व तुझी पूर्वीची ओळख होती काय ? "

" तो वृत्तान्त फार गहन आहे."

" पण तो मला प्रथम कळला पाहिजे "

" कोन्हेरराम हा मस्तानीबाईसाहेबाचा कारभारी आहे, असे मी इकडे यायला निघतानाच मला कळले होते तो मस्तानीबाईसाहेबाचा कारभारी आहे, अर्थात् आपल्या विश्वासातील असणार अशी माझी अटकळ होती माझी पुण्यात ओळखदेख नाहीं, त्यामुळें प्रथम त्याच्याकडे उतरून त्याच्यामार्फत आपली गाठ घ्यावी, असा माझा विचार होता मी वाटचालीच्या श्रमानीं थकलों, व वाटेत माझा घोडा उधळल्यामुळे माझे सोबती एकीकडे आणि मी भलतीकडे अशी अवस्था झाली. मला वेशीबाहेरील दरग्यापाशीच रात्र झाली, व माझा घोडाही दमल्यामुळें पुढे पाय उचलीना त्यामुळे मला तेथेंच मुक्काम करावा लागला उजाडताच मीं गावात यावयाचे ठरविले होतें एवढ्यात एक घोडेस्वार दौडत दौडत गावातून तेथे आला त्यानें माझी विचारपूस केली, व मी त्याला कोन्हेररामाचा पत्ता विचारला, तेव्हा त्या माणसाने आपणच कोन्हेरराम असल्याचे सागितले मीं लगेच त्याला सारा वृत्तान्त निवेदन केला, व मला मस्तानी बाईसाहेबाकडे पोचविण्याबद्दल त्याची विनंति केली —

" पण मस्तानीची व तुझी ओळख कुठची ? " बाजिरावांनीं मध्येच प्रश्न केला

तो तरुण किंचित् अडखळून पण लगेच दुसऱ्या क्षणाला सावरून घेऊन उत्तरला, " मस्तानीबाईसाहेब जैतपूरच्या किल्ल्यात बंगषाच्या बंदिवासात होत्या, तेव्हांपासून त्याची व माझी ओळख आहे "

" अस्से ! आणि तू मूळचा कुठचा राहणारा ? "

" ती एक लाबच लाब करुणकहाणी होईल ती सागताना मला त्रास व ऐकतांना श्रीमंताना त्रास उगाच व्हायचा "

" तरीपण तू कोण कुठचा तें सांग तर खरें ! " बाजिरावानीं मुद्दाम आग्रह पूर्वक विचारले, " तू कोण, तुझें नाव काय, सांग "

तो तरुण जरा चिडून म्हणाला, " जगात इतके जीवजंतु जन्माला येतात व मरून जातात, त्याची नावनिशीवार चौकशी कोण करतें ? त्यातलाच एक मी, असें सरकारांनीं मानावें. नावात काय आहे ? "

"म्हणूनच मी म्हणतों, नाव सागावयाला तू इतके आढेवेढे का घेतोस !"

"छे ! छे ! मी आढेवेढे घेतो अशातला अर्थ नाहीं सरकारांचा माझ्याविषयीं गैरसमज होत आहे असे मला वाटते माझे नाव गोवर्धन मी माडवीजवळ कर्णाळचा राहणारा. तो तरुण भालप्रदेशावरचा घाम पुशीत म्हणाला, "माझे वडील व मी प्रथम बगषाच्या पदरी नोकरीला होतो पण बगषाचे आपण बारा वाजविल्यावर आम्हाला जीव मुठीत घेऊन तेथून पळ काढावा लागला माझे वडील मध्यतरीं वारले मी पुन्हा आमच्या घरीं आलो, व दुर्जयसिंग महाराजाच्या पदरीं नोकरी धरली आमच्या महाराजाची माझ्यावर पूर्ण कृपा व विश्वास आहे, म्हणूनच त्यानीं ही जबाबदारीची कामगिरी मला सागितली एवढयानेंही जर माझ्या खरेपणाबद्दल सरकाराची खात्री पटत नसेल तर ही खूण पहा " असें म्हणून त्या तरुणाने—पण आपण आता त्याला त्याच्या नावानें संबोधावयाचें तर गोवर्धनाने आपल्या हातातील आगठी काढून बाजिरावाच्या हाती दिली

बाजिरावानी पाहिले तो ती आगठी दुर्जयसिंगाचीच होती अर्थात् आता गोवर्धनाविषयीं काहीच सशय उरला नाहीं त्यानीं ती आगठी गोवर्धनाला परत देऊन विचारले, "बरे, कोनेररामाचे तुझ्याशीं काय काय सभाषण झाले ?"

"त्याने प्रथम मला काहीच अगलाग दिला नाहीं. मात्र त्याचा कल सरकाराच्या विरुद्ध आहे असा मला प्रथमच सशय आला कारण मी जेव्हा दुर्जयसिंगजीकडून अमूक कामगिरीवर आलो आहे असे मोकळ्या मनाने त्याला सागितल, तेव्हा त्याने सारे मन वळवून मला दाभाडयाकडे नेण्याचा प्रयत्न केला त्यासाठीं त्याने मला दाभाडयाच्या पदरी मोठी मनसबदारी मिळवून देण्याचें आमिष दाखविण्यालाही कमी केले नाहीं तो तें पत्र माझ्यापाशीं मागत होता, व मी देत नाही म्हटल्यावर तो अगदी वर्दळीवर येण्याच्या बेतात होता तेवढ्यात आपले शिपायी तेथे आले म्हणून बरें झालें नाहीपेक्षा आम्ही हातघाईवर आलों असतो तोच काय पण त्याची बायकोही त्याच्याबरोबर होती ती ऐन वेळीं माझ्याशीं वर्दळीवर आली —"

"त्याची बायकोही बरोबर होती ?"

"होय तिला पाडवगडावर आपल्या घरीं पोचवून तो पुढे जाणार होता"

"बरें आहे दुर्जयसिंगजीच्या पत्राप्रमाणे मी योग्य ती व्यवस्था करतों तू आता माघारा जाणार का ?"

" मी आतां एकटा माघारा कसा जाऊं ? माझी इच्छा आतां सरकारांबरोबर यावें अशी आहे. कारण, पेशवेसरकाराना बरोबर घेतल्याशिवाय मी माघारा तोंड दाखवायला येणार नाहीं, अशी आमच्या महाराजाच्या पायांपाशीं शपथ घेऊन मी इकडे आलों आहें "

" वा: ! तू तर मराच निग्रही दिसतोस ! " बाजीराव हसून म्हणाले, " आणि मीं यावयाचें नाकारलें असतें तर ? "

" तर ? " गोवर्धन किंचित् हसून म्हणाला, " तर मीं मस्तानीबाईसाहेबांना भेटून त्यांचा वशिला लावला असता."

गोवर्धनच्या तोंडचे ते शब्द ऐकून बाजीराव जरा ओशाळल्यासारखे झाले. लगेच ते म्हणाले, " बरें आहे, तू आता आमच्याबरोबरच रहा. मी दुर्जयसिंगजी-कडे दुसरा जासूद पाठवितों "

" मस्तानीबाईसाहेब आपणाबरोबर मोहिमेवर येणार आहेत असें मीं ऐकलें आहे."

" होय. हें तुला कोणीं सांगितलें ? "

" कोन्हेररामानें "

" बरें, मग ? "

" मोहिमेंत त्यांच्या सेवेंत रहाण्याची परवानगी मला सरकार देतील तर फार बरें होईल " बाजिरावांची चर्या जरा गंभीर होऊन तिच्यावर संशयाची छाया उमटूं लागलेली पाहून गोवर्धन म्हणाला, " सरकारानीं शंका घेण्याचें कारण नाहीं मस्तानीबाईसाहेब मला चांगला ओळखतात त्यांचे माझ्यावर पाठच्या भावाप्रमाणें प्रेम होतें जैतपूरच्या वेढ्यात मीं अनेकदां त्यांचें रक्षण केलें आहे, व सध्यांही त्यांचें रक्षण करण्याची आवश्यकता आहेच "

" ती कशी ? "

" कोन्हेररामाच्या बोलण्याच्या रोंखावरून मला दाट संशय येतो कीं, मस्तानी-बाईसाहेबांना आपल्याकडून पळवून नेण्याच्या कटाचा तो सूत्रधार आहे. शिवाय बंगषाचाही अजून त्यांच्यावर डोळा आहेच अशा स्थितींत माझ्यासारखा एखादा जुना विश्वासू सेवक त्यांच्या रक्षणासाठीं नेहमीं त्यांच्याबरोबर असलेला बरा. सरकारांनीं मला मस्तानीबाईसाहेबांची एकवार भेट घेऊं द्यावी. त्यांनीं आश्रय दिला व सरकारांना तें रुचलें, तर मी त्यांच्या पदरीं म्हणजे ~ ~ राहीन, आश्रय मिळाला नाहीं तर मला जिकडे पुढा तिकडे मुलुख ;

पे..१०

"ठीक आहे" असे म्हणून बाजिरावांनीं कोदंडाला हाक मारून सांगितलें, "याला मस्तानीबाईसाहेबांकडे घेऊन जा"

"जशी आज्ञा" असे म्हणून मुजरा करून कोदंड गोवर्धनाला बरोबर घेऊन जाऊं लागला. तो थोडासा चालून गेला नाहीं, तोंच बाजिरावानीं त्याला एकट्याला पुन्हा माघारें बोलावले

"काय आज्ञा आहे ?" कोदंडानें विचारले.

"तू ह्या तरुणाला ओळखतोस का ?" बाजिरावानीं प्रश्न केला.

"नाही" कोदंड उत्तरला

"बरे, त्याच्यावर जरा करडी नजर ठेव" बाजीराव हळूच कोदंडाच्या कानाशीं लागून म्हणाले

"जशी आज्ञा." असें म्हणून पुन्हा मुजरा करून कोदंड निघून गेला.

लगेच बाजिरावानीं चिमाजीअप्पा, नारायणजी ढमढेरे, आवजी कवडे वगैरे मंडळीला बोलावून त्यांना दुर्जयसिंगाचे पत्र दाखविले व सांगितलें, "आपणाला दाभाडे वाटत होते तितके सज्जन नाहींत.–"

"आणि ते आज सज्जन वाटतात तितके उद्या वाटणार नाहीत" चिमाजी-अप्पानीं पत्र वाचीत म्हटलें पत्र वाचून झाल्यावर ते इतके संतप्त झाले कीं, त्या संतापाच्या भरांत ते क्षणभर हातातील पत्राकडे पहात उभे राहिले तेव्हां त्याच्या नेत्रातून जणु ठिणग्यांचा वर्षाव होत होता ते जरा वेळानें म्हणाले, "पहा ! दादा ! पहा ! सामोपचारासाठीं पाहिजे तेवढें प्रयत्न करणारे तुम्ही, आणि मूळ-पासूनच प्रत्येक बाबतींत हरामखोरी करण्यासाठीं निर्ढावलेला हा नीच अरेराव सेनापति, याचा मेळ कोणी कसा घालावा तें मला सांगा, व आता तरी सेना-पतीशीं तडजोड करण्याची भाषा सोडा. नाहींपेक्षा सेनापति, निजाम, बंगष वगैरे सारे दुर्जन एकत्र जमून एक विचारानें उत्तरेकडे मराठी सत्तेचीं पाळेमुळें खुशाल खणून काढूदेत, व आम्ही मात्र इकडे तडजोडीची वाट पहात गालांवरच्या माशा मारीत बसावें !"

"मला देखील वाटते, आपला पूर्वी जो मोहिमेचा बेत ठरला होता, तो आतां बदलला पाहिजे." बाजीराव म्हणाले, मला प्रथम अभयसिंगाला भेटून त्याच्याशीं कांहीं तडजोड करता आली तर ती केली पाहिजे. त्याला जर हरेला घालतां आलें, तर त्याच्या प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष साह्यान आपणांला त्या प्रांतांत

आजकाल ताडवनृत्य करू लागलेली मोंगलाची भुताटकी बरीच ठायींच्या ठायीं गाडतां येईल

"दादा! अभयसिंग झाला तरी बादशहाचाच सुभेदार आहे. बादशहाचे अंकित अधिकारी तेवढे सारे एका माळेचे मणी." चिमाजीअप्पा म्हणाले

"तो बादशहाचा सुभेदार असला तरी तो हिंदु आहे" बाजीराव म्हणाले

"तो हिंदु असला तरी आज काल हिंदूच्या अंगीं राम आहे कोठे? त्या सर्वांनीं हातांत बांगडया भरल्या आहेत" चिमाजीअप्पा उद्गारले

"अप्पा! ही तुझी समजूत खोटी आहे तुला हिंदूच्या अंतःकरणाची पारख अजून झालेली नाही असें मला म्हणावे लागले हिंदुसमाज हा गुहेत झोपी गेलेला सिंह आहे तो सिंह जोंपर्यंत झोपीं गेला आहे, तोंपर्यंत त्याच्या गुहेबाहेर कोणीही मनमुराद कोल्हेकुई करावी. पण तो सिंह एकदा जागा झाला, कीं आपल्या एका गर्जनेनें अविश्वासारख्या शत्रूचे कान बधिर करून सोडील, व त्याच्या नायकाचे गर्भही त्या गर्जनेच्या हादरण्याने गळून पडतील"

"गोष्ट खरी, पण तो सिंह जागा होऊन गुहेतून बाहेर येईल, तेव्हाच्या ना ह्या गोष्टी?" बाजिरावानीं प्रश्न केला

"तेच कार्य तर आपणाला करावयाचें आहे" बाजीराव म्हणाले, "निखाऱ्यावरची राख फुंकरेसरशी दूर सारून ते निखारे–आपणाला पुन्हा प्रज्वलित करावयाचे आहेत. ते निखारे तो हिंदुसमाजाच्या स्वाभिमानाचा स्वदेशाभिमानाचा, स्वधर्माभिमानाचा अग्नि एकदा प्रज्वलित झाला, कीं ठायींठायींचे अविंध शत्रु–वडवानलानें भारतकालीन खाडववनातील सर्व सचेतन अचेतन वस्तुमात्राला जाळून भस्म करून टाकले त्याप्रमाणें–जाळून भस्म करून टाकील माझा सारा भरवसा माझ्या कोटमाप हिंदुसमाजावर आहे आजवर मी ठिकठिकाणीं मोगलाच्या सत्तेचा नायनाट करून हिंदु-पदपादशाहीचा पाया रचीत आलो, तो माझ्या हिंदु-समाजाच्या आधारावरच निजामासारखे मुत्सद्दी व बंगषासारखे रणमर्द मला आजवर लोळविता आले, ते माझ्या हिंदु बांधवांच्या धीरावरच. आजची परिस्थिति अत्यंत बिकट आहे बादशाही सत्ता नामशेष होण्याच्या पंथाला लागली असल्यानें त्या सत्तेला सावरून धरण्यासाठीं बादशाही अधिकारी काय पाहिजे तीं खरीं, खोटीं, अनन्वित कृत्यें करतील. पण हिंदु लोकांत फूट पाडून त्यांना आपसांत लढावयाला लावून स्वतः त्यांतल्या जास्त पाशवी पक्षाच्या वतीनें

झगडत राहतील. अरे, हिंदु लोकही अजून मोहनिद्रेतून पूर्णपणें जागेन झाल्यानें व त्याना त्याच्या अगच्या अमोघ शक्तीची कल्पना नसल्यानें कर्तव्याचा प्रकाश त्याच्या मनात पडावा तसा पडत नाहीं, व ते अविद्याच्या मायावी मोहजालात सापडून त्याच्या आहारीं पडतात मोहाला बळी पडणे हा जीवनमात्राचा स्वभावधर्म आहे पण हे मोह टाळण्याचे जर हिंदूनी मनावर घेतले व 'हिंदु तेवढा एक' ही उच्च भावना मनात ठेवून बादशाही सत्तेशी टक्कर देण्याचें निश्चयपूर्वक ठरविले, तर हिमालयापासून कन्याकुमारीपावेतों अविद्येचे समूळ उच्चाटण होऊन हिंदु-पद-पादशाहीची सस्थापना होण्याला कालावधि खास लागणार नाहीं त्या गोष्टी अर्थातच पुढच्या आहेत, सध्या आपणाला दाभाडे, निजाम व बगष वगैरे दुर्जनाचे चाळे कसे बद करता येतील याचा विचार करणे अवश्य आहे त्यासाठीं आपल्या मोहिमेच्या पूर्वीच्या कार्यक्रमात थोडा बदल करणे अवश्य आहे "

" मलाही तसेंच वाटते " नारायणजी म्हणाले

" तुमची काय सूचना आहे ? " बाजिरावानीं विचारले

" धाकटया सरकाराचे काय मत आहे ? " नारायणजींनीं अप्पाना प्रश्न केला.

" तुमचा काय बेत आहे ? " अप्पानीं बाजिरावाना विचारले

" मी असें म्हणतों कीं, आपली मोहीम आता एकमुखी असता उपयोगी नाहीं ती अनेकमुखी झाली पाहिजे दाभाडे, निजाम, बगष, गायकवाड, बाडे, वगैरे आमचे सारे शत्रु एकत्र होऊन आमच्याशी सामना देण्याला येतील तर त्याच्या संयुक्त फौजेबरोबर टक्कर देणे आपणाला अत्यत जड जाईल यास्तव त्याच्याशीं सलोख्याच्या गोष्टी बोलावयाच्या झाल्या किंवा त्याना समरांगणावर गांठून चीत करावयाचें झाले, तरी ते कार्य एकेकट्याला गाठून केले पाहिजे "

" तेंच आम्ही प्रथमपासून म्हणत होतों मात्र तडजोडीची भाषा आम्हाला प्रथमही मान्य नव्हती व आताही मान्य नाही " अप्पा म्हणाले.

" पण काहीं ठिकाणीं तडजोडीचाच उपयोग होईल उदाहरणार्थ, अभयसिंगासारख्याला आपणाला तडजोडीच्या उपायाने आपल्या बाजूला वळवून घेतां येईल, सरबुलंदखानाला अभयसिंगाच्या साह्यानें जमीनदोस्त करतां येईल, व दुर्जयसिंगाचें रक्षण करण्याच्या कामींही त्याचा उपयोग होऊन दुर्जयसिंग हा एक निःसीम साहाय्यक आपणांला मिळेल त्याप्रमाणेंच निजामालाही पूर्वीच्या तह-नाम्यांची आठवण दिल्यास त्याला आपणाविरुद्ध शस्त्र धरण्यापूर्वी विचार करावा

लागेल यामप्रमाणें दाभाड्यांसभोंवारच्या दुर्जनाची कोंडी आपण एकवार फोडली, कीं गायकवाड, बांडे वगैरे घरभेद्याची आपोआप पागापाग होऊन दाभाडे उघड्यावर पडतील, व त्याना मग आमच्याशीं सख्य करावें लागेल. यापैकीं अभयसिंगाला भेटून त्याला वश करून घेण्याचे काम मीच पत्करलें पाहिजे एरव्हीं दुर्जयसिंगाचे रक्षण होणे शक्य नाही आणि ह्या गोष्टीला दिवसगत लावतांही उपयोगाची नाहीं. पण दाभाडयाना भेटून त्याची समजूत करण्याचे कामही तितक्याच महत्त्वाचें आहे"

"तें कामही आपणाला योग्य प्रकारें पार पाडता येईल त्याची आपणाला काळजी नको" अप्पा उत्तरले

"तें कसे काय ?"

"आपणाला काय त्याचे ? आपला नवा सेवक कृष्णराव मात्र आमच्याबरोवर पाहिजे —"

नारायणजींना पूर्णपणें बोलू देण्यापूर्वीच बाजीराव म्हणाले, "इतक्या नवख्या माणसाच्या डोक्यावर तुम्ही एवढे जबाबदारीचे काम टाकणार म्हणता, पण मला काहीं धडगत दिसत नाहीं."

"आपणाला काय त्याचें ? आपण दाभाडयाना देण्यासाठीं रात्रीं खलिना लिहून ठेवलाच आहे, तो त्याना योग्य प्रकारें पोचविण्याचें काम आम्ही करतों इतकेच काय पण निजाम व बगष याची समजूत घालून पहाण्याचे कामही आम्हालाच करता येईल मी, आवजी कवडे, कृष्णराव व बळिराम एवढी मंडळी ह्या कामाला पुरे आहे माझ्या व आवजींच्या हाताखालीं मिळून जेवढी फौज आहे, तेवढी आम्हाला तूर्त पुरे जास्त फौजफांटा जुळवावयाचा झाला, तर आपल्या नावावर तो आम्ही नगर–खानदेशातून मनमुराद मिळवूं शकूं धाकट्या सरकारांना आपण खुशाल आपल्याबरोबर घेऊन जावे" असें म्हणून जवळच उभे असलेल्या आवजींकडे नारायणजी वळले व म्हणाले, "आवजी ! असेंच ना ?"

"हो ! असेंच" आवजी म्हणाले

"अप्पा ! तुम्हाला ही योजना मान्य आहे ?" बाजिरावानीं विचारलें.

अप्पांनीं नारायणजी व आवजी यांच्याकडे पाहिलें, तेव्हा त्या दोघांनीं त्यांना कांहींतरी खूण केली अप्पांनीं ती पाहिली व ते बाजिरावांना म्हणाले, "हो ! ही योजना कांहीं वावगी नाहीं."

कृष्णरावाला ह्या साऱ्या मंडळीने इतके महत्त्व कां द्यावें हे बाजिरावाना अजूनही कळेना, पण त्यानीं त्या मंडळीचें मन राखलें जावें म्हणून त्याची जास्त वाटाघाट केली नाही

गोविंदपंत व कृष्णराव त्याच वेळीं तेथें येऊन पोंचले त्याना हा सर्व प्रकार कळला पूर्वी बाजीराव वगैरे मंडळीनें एकाच दिशेनें एकजुटीनें मोहिमेवर जावयाचें ठरलें होतें, त्यात एवढा बदल झालेला पाहून गोविंदपंत म्हणाला, " ही योजना ठीक आहे पण मी मात्र सरकाराचा सेवक सरकाराबरोबर रहाणार."

गोविंदपंत हा आपल्या जिवाला जीव देणारा सेवक आहे, हे बाजिरावाना अनुभवानें माहीत होतें त्यानींही गोविंदपंताच्या इच्छेला मान्यता दिली त्याला सोडून नारायणजी वगैरे मंडळीबरोबर जाण्याचें कृष्णरावाच्या जिवावर आलें पण 'आपण आईला व नायकोला देखील सोडून जिथें मुलुखगिरीवर जात आहों, तिथें गोविंदपंताची संगत सुटली तर सुटली' असा त्यानें आपल्या मनाचा विरगुळा केला

" रघुनाथजी प्रभु, अंबाजीपंत पुरंदरे, आयाबा मुजुमदार व फडणीस यांना तुम्ही पत्रे लिहिलीं का ? "† बाजिरावानीं अप्पाना विचारलें.

" अजून लिहिलीं नाहीत, लिहावयाची आहेत " अप्पा म्हणाले.

" त्याना आपला बेत सविस्तर कळवा, व आम्हांला जरूर लागल्यास चट्कन् आमच्या मदतीला येता येईल अशा तयारीने खानदेशच्या आजूबाजूच्या भागात रहाण्याविषयी त्याना लिहा " बाजीराव म्हणाले

" ठीक आहे त्याप्रमाणें व्यवस्था करतो " अप्पा म्हणाले

याप्रमाणे मोहिमेचा बेत पूर्वीचा बदलून पुन्हा नव्याने कायमचा ठरला. त्याप्रमाणे बाजिरावानीं दुर्जयसिंगाला आश्वासनपर पत्र लिहून तें जासुदाहातीं रवाना करावयाला अप्पाना सांगितलें

" पण तो दुर्जयसिंगांकडून आलेला जासूद कुठें गेला ? " अप्पानीं विचारले

" तो मस्तानीला भेटावयाला गेला आहे." बाजीराव म्हणाले, " त्याचा व मस्तानीचा पूर्वीचा दाट परिचय आहे असे तो म्हणतो "

---

† नारायणजी ढमढेरे, आवजी कवडे, यामप्रमाणेंच ही मंडळीही तेव्हांच्या प्रसंगीं नाशिक, खानदेश वगैरे प्रांतीं संचार करून शत्रूचा अंदाज काढून पेशव्यांना कळवीत (म. रि., मध्यविभाग-१, पृष्ठ ७३२)

" पण तें तरी खरें का ? " अप्पांनीं शंकित भावानें विचारलें

" तो खोटें कशाला बोलेल ? इतकेंही करून मीं कोदंडाला त्याच्यावर नजर ठेवण्याला बजावलें आहेच " बाजीराव उत्तरले

" तें खरें, पण आजकाल मुलुखभर दाभाडे, निजाम व बंगष वगैरे दुर्जनांच्या हेरांचा असा सुळसुळाट झाला आहे कीं, सांगण्याची सोय नाहीं. यासाठीं आपण कोणत्याही नवख्या माणसाशीं वागतांना पुष्कळच सावध राहिलें पाहिजे दुर्जयसिंगाकडून पत्र घेऊन जासूद आला, त्याचें बायकांत कसलें काम आलें आहे ? यामुळें मला त्या जासुदाचाच काय पण त्यानें आणलेल्या पत्राचाही संशय येऊं लागला आहे. याचा कसून तपास केल्याशिवाय गत्यंतर नाहीं " अप्पा म्हणाले.

" पत्राविषयीं तर शंका घ्यावयालाच नको त्याप्रमाणेंच त्या जासुदापाशीं दुर्जयसिंगाच्या स्वाक्षरीची खुणेची आंगठी आहे, त्यावरून तो दुर्जयसिंगाकडून आला असावा यातही संशय नाहीं," बाजीराव उद्गारले

" तरी पण त्याचा तपास केलाच पाहिजे मी तिकडे जाऊन येतो " असें म्हणून अप्पा तातडीनें मस्तानीच्या निवासस्थानाकडे निघून गेले

## प्रकरण तेरावें

# सारेंच विलक्षण !

कृष्णंभट दंड गोवर्धनाला घेऊन मस्तानीकडे गेला, व त्याने प्रथम जेव्हा 'गोवर्धन नावाचा माडवीचे राजे दुर्जयसिंग याच्याकडील हेर आपल्या भेटीला आला आहे' असें मस्तानीला सागितले, तेव्हां तिला प्रश्नच पडला कीं, हा गोवर्धन कोण व याला माझ्याकडे येण्याचे काय कारण ? तो माडवीच्या राजाकडून आला आहे. असे कळताच प्रथम तिच्या मनात शंका आली की हा कोणी इसम त्या राजाकडून आपणाला वश करण्यासाठी तर आला नसेल ? अशी शका मस्तानीला यावयाचें कारण यापूर्वी अनेक हिंदु राजानीं व मुसलमान सुभेदारानी आपापले गुप्त हेर तिच्याकडे पाठवुन तिला वश करण्याचे प्रयत्न केले होते मस्तानी स्वत ला पेशव्याची धर्मपत्नी समजत असली तरी सारा जनसमाज तिला पेशव्याची रक्षाच समजत होता. तिच्यासारखी रूपमती स्त्री तेव्हा तरी साऱ्या हिंदुस्थानात तीच एकटी असल्याने, त्याप्रमाणेच पेशव्याच्या कुटुंबातील मडळी तिचा मनापासून तिरस्कार करतात ह्या गोष्टीचा बाहेर बराच बोभाटा झाला असल्याने ठायींठायीच्या राजेरजवाड्यांना व सरदार सुभेदाराना ती आपली विलासरमणी व्हावी असें वाटणे अगदी स्वाभाविक होते मुसलमान सुभेदार वगैरे एरव्हीं एखाद्या हिंदु रूपमतीला वश करण्याचा प्रयत्न करते ना. पण मस्तानी ही उच्च हिंदु—ब्राह्मणकुलोत्पन्न असली तरी ती लहानपणापासून मुसलमानाच्या घरात वाढून लहानाची मोठी झाली असल्यामुळें प्रत्येक मातबर मुसलमानाला वाटे कीं, ती आपलीच आहे, व ती आपणाला वश होईल, आणि पराक्रमी हिंदु राजेरजवाड्याचाही मस्तानी मुसलमान आहे असाच समज असल्याने व मुसलमान सुंदरी हिंदूच्या पराक्रमावर व रूपावर मोहित होतात असा अनुभवसिद्ध भरवसा त्याना वाटत असल्यामुळे ते मस्तानीला वश करण्यासाठीं खटपट करीत त्या हिंदु राजेरजवाड्याचा तेव्हाचा तो समज चुकीचा असेल असें नाहीं स्त्रिया ह्या सामान्यत. पराक्रम साहस व सौंदर्य ह्या गुणांनीं मंडित असलेल्या पुरुषावर मोहित होतात. त्या गुणाना वैभवाची जोड मिळाली म्हणजे तर विचारावयालाच नको. अकबर बादशहाच्या कारकीर्दीपासून मुसलमानाचे पराक्रम ठळकपणे दिसूं लागले व अनेक हिंदु—रजपुत राणेमहाराणे अकबराच्या ताटाखालील

माजरें बनून बसण्याइतके शिळपट बनले, तेव्हांपासून मुसलमानाचा चालता काळ होता तोंपर्यंत अनेक रजपुत राजकन्यानीं स्वखुषीनें मुसलमानाशी लग्नें लावलीं होती, किंवा कितिएकींना मुसलमानानी बलात्कारानें आपल्या विलासमंदिरात ओढून नेले असताही, आपलें रक्षण करण्याला आपले हिंदु असमर्थ ठरले असें पाहून त्या हिंदु कन्यका दैवयोगानें त्याची ज्या मुसलमानाशीं जन्माची गाठ पडे त्याच्याशी सुखानें संसार करीत त्याच इतिहासाची छत्रपति शिवाजी महाराजाच्या अवतारापासून पुनरावृत्ति झाली असल्यास नवल नाही कारण तेव्हापासून मुसलमानाच्या राजसत्तेला जी उतरती कळा लागली, ती आपल्या कथानकाच्या काळीं देखील कायम होती नुस्ती कायम होती इतकेंच काय पण ती दिवसेंदिवस अधिकाधिक घरगळत चालली होती

असो तात्पर्य काय कीं, गोवर्धन आपल्या भेटीची अपेक्षा करीत आहे असें, मस्तानीनें कोदंडाच्या तोंडून ऐकलें तेव्हा तिच्या मनात जे विचार उत्पन्न झाले ते तिच्या पूर्वानुभवाशीं सुसंगत असेच होते शिवाय आणखी असे की कोन्हेर रामानें आपणाविरुद्ध कांहींतरी कट चालविल्याचे पूर्व दिवशीच तिच्या निदर्शनाला आले होते, त्यामुळे तिला संशय येणें साहजिक होतें. यदाकदाचित् हा एखादा सरदार, शहाजादा किंवा राणामहाराणा आपल्यासाठीं वेडा होऊन वेश पालटून एथवर आला असेल असेही तिला वाटलें 'पण पाहू तर खरा हा कोण हुरीचा लाल आहे तो' अशा कुचेष्टात्मक भावनेनें तिनें गोवर्धनाला भेट दिली !

" मस्तानी ! तू मला ओळखलेंस का ? " गोवर्धनानें मस्तानीसमोर जातांच प्रश्न केला

गोवर्धन समोर येताच मस्तानीला तो मधुर आवाज व तो कोमल गोंडस व मनोहर चेहरा क्षणात ओळखीचा वाटे, क्षणात पुन्हा वाटे कीं आपण आपल्या उभ्या जन्मात कधींही असल्या सुंदर पुरुषाशीं मैत्री केल्याचे आपणाला स्मरत नाहीं असें असतां हा एकदम इतक्या सलगीनें ओळख विचारतो याचा अर्थ काय ? तिनें थोडा वेळ विचार करून आपल्या गतकालीन आयुष्यातील सर्व प्रसंग व आपल्या सहवासात आलेलीं सर्व माणसें स्मरणशक्तीच्या आधारानें नजरेसमोर आणून पाहिलीं, पण व्यर्थ ! अखेर तिनें गोवर्धनालाच विचारलें, " तुझी व माझी कुठची बरें ही ओळख ! "

बाजिरावानीं कोदंडाला आगाऊ सूचना दिली असल्यानें तो गोवर्धनाच्या

पाळतीवरच होता तो मस्तानीने गोवर्धनाला ओळखलें नाहीं असे पाहून प्रसंग पडलाच तर त्याला तेथल्या तेथें कैद करण्याच्या तयारीने अधिक सावधपणानें त्या दोघाच्याही तोंडाकडे पहात उभा राहिला.

गोवर्धन वळेच धीटपणानें चार पावले पुढे जाऊन सलगीच्या भाषेत म्हणाला, "वा ! इतक्या लौकर ओळख विसरलीस ना ? पण तेंही बरोबरच आहे. मनुष्याला संकटकालीं जो अगा क्षणोक्षणीं आठवत असतो, तो देखील सुखाच्या काळी आठवेनासा होतो ! मग संकटकाळच्या जिवलगाची आठवण सुखाच्या काळीं कुठची व्हावयाला ? "

तरीही मस्तानीला काही अर्थबोध होईना उलट तो तरुण तर आपले नाव गोवर्धन असे सांगतो व तोंडाने 'परमेश्वर' न म्हणता 'अल्ला' म्हणतो, तेव्हा हा हिंदु आहे कीं मुसलमान अशी नवी चिंता मस्तानीला वाटू लागली नशात गोवर्धन सलगीच्या दोस्तासारखा बोलता बोलता पुढे पुढे सरकू लागला, त्या मुळे तर मस्तानीला त्याचा रागच आला ती चट्कन् चार पावले मागें सरून तिरस्कारपूर्वक त्याला पुन्हा म्हणाली, " कोण तू ? "

गोवर्धनाने मस्तानीच्या ह्या संशयात्मक व तिरस्कारदर्शक प्रश्नाने रतिभर देखील न डगमगता आपल्या मनगटावरील अस्तनी वर सारून मनगगट उताणें करून दाखवीत हसत हसत विचारले, " हे तुझ्या-माझ्या मैत्रीचे निदर्शक असें तुझें नांव तूच आपल्या हाताने गोंदलेले तुला आठवते का ? "

गोवर्धनाच्या मनगटाकडे पहाताच मस्तानीला काय ओळख पटावयाची ती पटली ती काय ओळख पटली नकळे, पण त्याच क्षणीं तिचा सारा संशय दूर झाला व तिच्या चर्येवर समाधानाची नाजुक छाया पसरली ती एकदम गोवर्धनाच्या अगदीं जवळ येऊन त्याचा हात आपल्या हातीं धरून लाडिकपणाने त्याला हांक मारणार होती पण तिचे ओठ हलूं लागताच गोवर्धनानें तिच्या तोंडावर हात ठेवून म्हटले, " हे पहा ! आपली ओळख एकमेकाना पटली एवढी पुरे आहे त्याचा बभ्रा होता उपयोगी नाहीं. मला तुझ्याशी पुष्कळच बोलायचे आहे. पण तें आपण एकान्तात बोलूं. आंत चल."

" चल " असे म्हणून मस्तानी गोवर्धनाचा हात आपल्या हातीं धरून त्याला आपल्या अंतर्महालात नेता नेता दरवाजांत तिष्ठत उभा असलेल्या कोदंडाला म्हणाली, " कोदंड ! तू आतां जा. तुझें काम झालें "

कोदंडाला हा सारा अकल्पित प्रकार पाहून कमालीचें आश्चर्य वाटलें नुसतें आश्चर्यच काय पण खेदही वाटला. "कुठचा कोण गोवर्धन मांडवीच्या राजाचा जासूद बनून येतो काय, मार्गांत कोन्हेररामाशीं गुप्त वाटाघाट करतो काय, पेशवे सरकारांसमोर येताच त्यांना चकवितो काय, मस्तानीसमोर येतांच प्रथम बाईसाहेब त्याचा तिरस्कार करतात काय, आणि त्याने आपल्या हातावरील खूण दाखवितांच एकदम त्याच्यावर फिदा होऊन त्याचा हात धरून निःशंकपणें त्याला आपल्या महालात घेऊन जातात काय? याच्या मुळाशीं त्या दोघांच्या पूर्वीच्या चवचाल प्रेमाची कांहीं गुंतागुंत तर नसेल ना? एकूण कुरूप स्त्री नवऱ्याची व सुंदर स्त्री जगाची अशी म्हण आहे ती अगदीं यथावत आहे म्हणावयाची परमेश्वरा! तू मला कुरूप स्त्री दिलीस याबद्दल मी तुझे शतशः आभार मानतों पण त्याबरोबरच ही सुरूप बहीणही तू मला द्यावयाची नव्हतीस! किंवा तिची माझी ओळख तरी पटू द्यावयाची नव्हतीस!"§ कोदंड दरवाजाबाहेर येऊन उभा राहून स्वतःशींच विचार करीत होता, "स्त्रीचरित्र अगाध असते, ते देवालादेखील कळत नाहीं, मग मनुष्याला कोठून कळणार!—असे कोणा महाभागाचे सुभाषित आहे, ते अक्षरशः खरें आहे मस्तानी जगाला मारे एवढा पतिव्रतेचा दिमाख दाखविते, आणि पेशवेसरकारही मनात मांडे खात असतात कीं, माझ्या मस्तानीसारखी पतिव्रता व सुंदर स्त्री तीच. पण सरकाराना म्हणावे, आतां तुमची पतिव्रता काय करीत आहे, वाटेच्या वाटसराशीं महालांत बसून कशी गुजगोष्टी बोलत आहे, तें एकवार येऊन पहा!" लगेच कोदंड आपला संशय फेडून घेण्यासाठीं हलक्या पावलानी तसाच माघारा आत मस्तानीच्या महालाकडे गेला तों दरवाजा लावून घेतलेला होता त्यामुळें तर कोदंडाच्या संशयाला जास्त वाव मिळाला. "यानीं दरवाजा का बरें लावून घेतला? अशा शंकेखोरपणानें त्यानें दरवाजाच्या फटींतून आत डोकावून पाहिलें, तो मस्तानी व गोवर्धन एका कोचावर अगदीं जवळ जवळ बसून हातांत हात घालून बोलत होतीं कोदंडाला तें दृश्य पहावेना "हर! हर! परमेश्वरा! काय रे हा जगाचा न्याय!" असें स्वतःशीं पुटपुटत कोदंड रागारागानें तडफडत तसाच बाहेर आला व पुन्हा विचार

§ कोदंड व मस्तानी हीं बहीणभावंडें कशीं ह्या रहस्याचा खुलासा 'पेशवाईचें पुनर्वैभव' या पेशवाईवरील आठव्या कादंबरींत करण्यांत आला आहे, तो वाचकांनीं पहावा

करू लागला," आताच्या आता जाऊन पेशवेसरकाराना बोलावून आणू का ? त्यांनीं हा प्रकार पाहिला तर त्याना काय बरें वाटेल ? त्यांनीं मला ह्या हरामखोर बातमीदारावर नजर ठेवावयाला सांगितले आहे पण आता ही वार्ता सरकाराना कळवावयाची म्हणजे मस्तानीचे–स्वतःच्या बहिणीचे पापच वेशीला टांगावयाचें कीं नाहीं ? त्यापेक्षा असाऱ्या अमा महालात घुसून त्या बदमाषाला ठार करू काय ? पण तो देव्हाऱ्यातील देवीच्या मस्तकावर फणेची सावली धरून बसलेला सर्प आहे, त्या सर्पाला म्हणून पैजारा हाणल्या तर त्या देवीच्या मस्तकाला लागावयाच्या पण काय हरकत आहे ? मी मस्तानीबाईचा बंधु व विश्वासू नोकर खरा, पण मी विश्वासाने त्याच्या पापावर पांघरूण घालू लागलों तर पेशवेसरकाराशीं प्रतारणा केल्याच्या पापाचा धनी होणार नाही काय ? बरें; सरकाराना हा प्रकार सांगितला, तर त्या हरामखोराला योग्य शासन होईल हे खरे, पण त्याबरोबरच मस्तानीच्या कपाळी वनवास येईल अशा स्थितींत मी काय करू व कसे करू ? "

एवढ्यावरच कोदंडाचे संशयात्मक विचार थांबले नाहींत, त्यानीं त्याहूनही बराच मोठा पल्ला एकदम गाठला. कोन्हेररामानें जें काय गुप्त कारस्थान चालविलें होते, त्याच्या हातची जी चिठ्ठी सापडली होती, ती कोन्हेररामानें याच गोवर्धनाला–ह्या पाजी माणसाला मस्तानीच्या मागण्यावरून तर लिहिलेली नसेल ना, असें कोदंडाच्या मनानें घेतलें ती चिठ्ठी लिहिल्याबद्दल मस्तानी कोन्हेररामावर रागावली खरी, त्यापूर्वींही ती कोन्हेररामावर अविश्वास दाखवी व त्याला पकडून आणून त्याचे शासन करण्यासाठीं तिने शिपायी पाठविले खरे, पण आपल्या छालगजपणाविषयीं कोणालाही जरा देखील संशय येऊ नये म्हणून तिने कोन्हेररामाविरुद्ध कांगावा करण्याचें हें केवळ नाटक केलें नसेल कशावरून ? कोन्हेरराम हातीं सापडल्यावर त्याला कुठे तरी पळवून लावून अथवा अन्य उपायानीं त्याचें रक्षण करण्याचा तिचा बेत नसेल कशावरून ? किंवा बाजू आपल्या अंगावर येते असे पहाताच ती कोन्हेररामाला बळी देऊन स्वतः नामानिराळी होण्याला सज्ज झाली असेल ! बस्स ! काय वाटेल तें झालें तरी सरकाराना ह्या गोष्टीची खबर दिलीच पाहिजे. यावेळीं जर सरकार इथे येतील, तर किती सोन्याहून पिवळें होईल ! आपल्या प्रियतमेच्या चवचालपणाचा प्रत्यक्ष पुरावा त्यांना पहावयाला सांपडून शिवाय त्यांच्या संसारसुखाला डसलेला हा मुंगळा–हा हरामखोर

गोवर्धनही ऐन गुन्हेगारी करताना त्याच्या हातीं सांपडेल मग त्या दोघांनाही सरकार शासन करतील, त्यांत त्या गुलामाला शासन होईल तेवढें थोडेंच आहे, आणि मस्तानीलाही तिच्या ह्या बदफैली वर्तनाबद्दल अवश्य शासन झालें पाहिजे ही माझी बहीण जर माझ्या ताब्यांत असती, तर मी प्रथम तिचे मुंडण करून तिची गाढवावरून गावभर धिंड काढली असती, व मग तिला ठार केली असती !—"

कोदंडाच्या विचारांचा झंझावात आणखी कोठवर वाहला असता याचा कांहीं नेम नाही पण चिमाजीअप्पा जे आपल्या वाड्यांतून गोवर्धनाविषयीं चौकशी करण्यासाठीं म्हणून मस्तानीच्या निवासस्थानी यावयाला निघाले होते, ते इतक्यात तेथे येऊन पोचले त्यानी कोदंडाला विचारलें, "कोदंड ! वहिनीसाहेब कुठें आहेत ?"

"महालात आहेत" कोदंड उत्तरला आता आपोआप सर्व काळेंबेरें चवाठ्या वर येणार व त्याच्या अपयशाचें खापर आपल्या माथीं फुटणार नाहीं, असा त्याला भरंवसा व अर्थात समाधानही वाटू लागलें

"आणि तुझ्याबरोबर आलेला तो जासूद कुठें आहे ?"

"तोही आंत आहे"

"कुठें ? महालात ?"

"होय, महालात"

चिमाजीअप्पाच्या शेवटच्या प्रश्नावरून कोदंडानें अनुमानिले कीं, अप्पानादेखील हा प्रकार आवडलेला नाही तो तेव्हाच मनात म्हणाला, "खासें झाले सोनारानें कान टोचले म्हणजे दुखत नाहीत"

"तुला त्या जासुदावर नजर ठेवण्याला पेशवेसरकारांनीं बजावले आहे ना ?" अप्पानीं किंचित् कठोर स्वरांत प्रश्न केला

"होय" कोदंड उत्तरला, "पण ती दोघें दरवाजा लावून बोलत बसलीं असताना त्याच्यावर पहारा ठेवण्यासाठीं मी महालात कसा जाऊं ? मला अजून काही दिवस ह्या नोकरीवर मस्तानीबाईसाहेबाच्या हाताखालीं काढावयाचे आहेत."

सशयानें संशय वाढत गेला. ज्या दिशेने थोड्या वेळापूर्वी कोदंडाचा विचार-प्रवाह वाहूं लागला होता, त्याच दिशेनें कांहींसा अप्पाचाही विचार-प्रवाह वाहूं लागला. त्यांतल्या त्यांत त्यांना प्रथम संशय त्या जासुदाविषयीं आला. त्यांना त्याबरोबरच कोदंडाविषयींही संशय आला कीं, "हा मस्तानीचा विश्वासू नोकर

त्या जासुदाला आतून सामील झाला नसेल ना ? ह्या दोघांनीं मिळून मस्तानीला गोत्यात आणण्याचा बेत केला असेल" लगेच त्यांनीं कोदंडाला पुन्हा विचारलें, "पण तू त्या जासुदाला वहिनींच्या महालांत कसे जाऊ दिलेस ?"

"मी त्याला जाऊ देणारा किंवा प्रतिबंध करणारा कोण ?"

"तर काय तो ह्या वाड्याचा मालक आहे वाटतें ?"

"तो वाड्याचा मालक नाहीं हे मला कळते पण मस्तानीबाईसाहेबांनीं त्याच्या हाताला धरून हसत खिदळत आत नेले, त्याला मी काय करणार ?"

अप्पाचा कोदंड व जासूद याच्याविषयींचा संशय रेंसभरही कमी न होता त्यांना आता मस्तानीविषयींही दाट संशय वाटू लागला ह्या कोणी तिचा प्रियकर वेषांतराने एथें आला असावा, तो कोण, कोठला हे कोदंडाला तिनें पूर्वींच पढवून ठेविलेलें असावे, व त्याबरहुकूम त्याने त्याला तिच्या महालांत आणून सोडलें असावें, असा कयास अप्पानीं बांधला व कोदंडाला पुन्हा विचारले, "कोदंड ! तुला परमेश्वराची शपथ आहे, हा प्रकार खरा काय आहे तें सांग वहीण झाली, म्हणून तिच्या अन्यायावर पांघरूण घालू नकोस वहिणीपेक्षा तुझा धनी तुला थोर नाहीं का ?"

कोदंडाला अप्पाच्या ह्या प्रश्नाने आपला अक्षम्य अपमान झालासा वाटला तो मस्तानीच्या सेवेंत रुजू झाल्यापासून आजवर त्याच्यावर असा आरोप कोणींही केला नव्हता तो स्वाभिमानाने उत्तरला, "धाकटे सरकार ! खरें असावयाचें एक व बोलावयाचें एक अशी दुतोंडी वागणूक माझी कधींच नसते पण मला काहींच बोलवत नाहीं आपण मायबाप पडला, आपल्या अन्नावर हा पिंड पोसतो आहे, म्हणून आपण जितकीं खेटरे माराल तितकीं मुकाटपणें खाणें मला प्राप्त आहे हें निराळें आपण आमचे धनी आहा, पण धन्याचा धनी कोण आहे ?"

अप्पा यावर जास्त काहीं न बोलता कोदंडाला बरोबर घेऊन मस्तानीच्या महालापर्यंत गेले. तेथवर येईतो त्यांचा विचार एकदम महालात घुसून खरा प्रकार काय आहे तो पहाण्याचा होता पण महालाच्या दरवाजापाशीं येतांच बळेंच दरवाजा उघडून आत घुसण्याला ते धजावेनात. यापूर्वी अनेक वेळां, जेव्हां बाजीराव पेशवे इकडे मस्तानीच्या महालात असावयाचे व तिकडे काहीं निकडीचें काम निघावयाचे, तेव्हा अप्पा कधीं कधीं तेथवर येत. पण महालाचा दरवाजा उघडा असला तरच ते आंत जात, नाहींपेक्षा दरवाजावर थाप मारून दरवाजा

उघडला जाईतो तिकडे पाठ करून बाहेर उभे रहात त्याच विचारानें ते आजही दरवाजाबाहेर थबकले पण पुन्हा त्याच्या मनाने घेतले कीं, आजचा प्रसंग निराळा आहे, आज त्या दोघांना सावध होण्याला संधी देता उपयोगी नाहीं.

"कोदंड ! दरवाजा उघड" अप्पा म्हणाले

"धाकटे सरकार ! आपणच उघडा !" कोदंड उत्तरला.

इतक्यांत आत कुजबूज सुरू असलेली अप्पांच्या कानीं आली.

"बाहेर कोणीतरी आलें आहे" हे अनोळखी शब्द ऐकून अप्पांनीं अजमावलें कीं, हे त्या जासुदाचेच शब्द असावे

"कोण आले आहे तें मी पहातें" हा मस्तानीचा ओळखीचा आवाज अप्पानीं तेव्हांच ओळखला

"पण मस्तानी ! हे पहा, मला अगोदर कुठें तरी लपूं दे नाहीं तर सारें कारस्थान ह्या घटकेलाच चवाठ्यावर यायचें"

"त्याची तुम्हांला एवढी काळजी नको कोणी तरी नोकर आला असेल, त्याला यांत काय कळणार आहे ?"

"तरी पण आपण इतका वेळ एकान्तांत बसलों हें बरें केलें नाहीं. कोणी पाहील तर काय म्हणेल ? थांब. जरा थांब"

अप्पा व कोदंड बाहेरून हे संभाषण ऐकत होते, व त्या प्रत्येक शब्दागणती त्याच्या संशयसूत्राला एकेक वज्रगाठ जास्त जास्त बसत होती त्यांनीं व कोदंडानेही तेव्हा असें देखील म्हटले असेल, "बायकाची जात दगलबाज !"

इतक्यात महालाच्या आतील दालनाचा दरवाजा उघडला गेल्याचा व पुन्हा लागल्याचा आवाज अप्पा व कोदंड यांच्या कानीं आला अप्पानीं घाईघाईनें बाहेरून महालाचा दरवाजा ठोठावला

मस्तानीचा समज झाला कीं, हा कोणी नोकर दरवाजा ठोठावतो आहे. नोकराने एवढ्या जोरानें दरवाजा ठोठावावयाचा म्हणजे काय ? मस्तानीनें चिडून दरवाजाची कडी काढता काढता विचारलें, "कोण आहे ?"

मस्तानीला तिच्या प्रश्नाचें उत्तर मिळण्यापूर्वीच दरवाजांत उभे असलेले अप्पा व कोदंड यांची व तिची दृष्टादृष्ट झाली

*

## प्रकरण चवदावें

# कोदंडाचा निर्धार

"मला वाटले, कोणी नोकर आला आहे" मस्तानी ओशाळेपणानें पण हंसतमुखानें अप्पांना म्हणाली

अप्पा लगेच आंत गेले व कोदंड सचिंत मुद्रेने आता काय गोंधळ होतो तो पहावा अशा इरायानें दरवाजातच उभा राहिला त्याने दरवाजातूनच एकवार महालात चौफेर नजर फेंकली पण गोवर्धन त्याला कोठे दिसेना.

अप्पानींही मस्तानीच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून प्रथम चौफेर नजर फेंकून पाहिलें तों त्यांनाही त्या महालात दुसरें कोणीच दिसले नाहीं त्यानीं मस्तानीला विचारले, "वहिनी! गोवर्धन नांवाचा गुजराथचा जासूद तुमच्या भेटीला आला होता तो कुठें आहे?"

"का बरें?" मस्तानीनें किंचित् घोंटाळून प्रश्न केला

"त्याला त्यानें आणलेल्या पत्राचें उत्तर देऊन आजच्या आज निकडीनें माघारा रवाना करून द्यावयाचे आहे" अप्पांनीं गभीरपणे विचारले

"तो तर मघाच मला भेटून निघून गेला" मस्तानी उत्तरली

"बायकांची जात इतकी पाताळयंत्री असते!" कोदंड स्वगत पुटपुटला

"अस्से?" अप्पा जरा ओंठ चावीत व मान डोलवीत म्हणाले, "आणि आता तुम्ही बोलत होता त्या कुणाशीं?"

"कुठे बोलत होतें मी? भावजी! तुम्हाला नुसता भास झाला तो! मी माझ्या एका दासीशीं मात्र बोलत होते खरी" असें निरवानिरवीचें उत्तर देऊन मस्तानीनें कोदंडाला एका बाजूला डोळ्यानें 'बोलूं नकोस' अशा अर्थाची खूण केली. तेव्हां कोदंडाची अवस्था इकडे आड तिकडे विहीर अशी झाल्यानें तो मोठ्याच पेंचांत सापडला होता, व त्याला पडलेला पेंच स्पष्टपणें त्याच्या चेहऱ्यावर काळवंडलेल्या छायेनें उमटला होता.

अप्पाना दाट संशय होता कीं, मस्तानीनें गोवर्धनाला अंतर्महालात लपवून ठेविलें असावें. पण तसें बोलण्याची त्याची छाती होईना. त्यानीं तसें बोलणें म्हणजे आपल्या मातेसमान वडील भावजयीचा उपमर्द करण्यासारखें होतें. तरीही

मस्तानीने दासीचे नाव सांगितले, त्यावरून त्यांनी कयास बांधला की, मस्तानी दासीचें काहीतरी निमित्त सांगत आहे त्यांनीं लगेच विचारले, " ती दासी तरी कुठे गेली ? तिला तरी त्या जासुदाचा पत्ता लागला तर विचारून पाहू "

" जुबेदा ! झाला का ग मशाल नीट झाडून ? " मस्तानीने अंतर्महालाच्या दरवाजाकडे पाहून हाक मारून विचारले

' झाला झाडून बाईसाहेब ! " आतून उत्तर मिळाले

" भावजी ! ऐकले ? ती माझी दासी आत महाल झाडते आहे " मस्तानी दरवाजाकडे अंगुलिनिर्देश करून म्हणाली

" मग, मी कुठे काय म्हणतो ? " अप्पानीं विचारले

" नाही, म्हटले, तुम्हाला जो संशय होता—"

" मला संशय काही नाही, पण त्या दासीला जरा बाहेर हाक मारा तर खरी ! "

मस्तानीनें पुन्हा हाक मारली, " जुबेदा ! जरा बाहेर ये पाहू ! '

लगेच अंतर्महालाच्या दरवाजातून एक अवगुंठनवती व्यक्ति विनम्रपणे बाहेर आली व मस्तानीला म्हणाली, " बाईसाहेब ! काय आज्ञा आहे ? "

" भावजी ! ही पहा ती दासी पाहिलीत ? आता तरी संशय फिटला का ? " मस्तानीने अप्पाना विचारले

" पुन्हा तेच ! मला संशय कसला व कधी होता ? पण ही जुबेदा दासी तुमच्या पदरी असलेली मी आजच पहिल्यानें पहातो आहे यापूर्वी कधी तिचे नावदेखील [illegible] त्या [illegible] निरखून पहात म्हणाले

" यापूर्वी जर तुम्ही माझ्यावर आजच्यासारखाच खडा पहारा ठेवून मला एखाद्या नजरकैद्याप्रमाणें लेखायला सुरवात केली असती, तर माझ्या पदरच्या दास-दासीचीही तुम्हाला ओळख झाली असती " मस्तानी रागावून म्हणाली

" वहिनी ! तुम्ही अशा रागावू नका " अप्पा म्हणाले

" रागावू नको तर काय करू ? माझ्याविषयी भलभलते संशय घ्यायला तुम्ही शिकला, मग मला राग कसा येणार नाहीं ? भलभलते पुरुष माझ्या महालात लपवून ठेवायला मी जशी काही आजच जगातून उठले आहे—"

मध्येच त्या [illegible] व्यक्तीने मस्तानीला विचारले, " बाईसाहेब ! मी जाऊ का ? "

"तू जा" मस्तानी उत्तरली

ती व्यक्ति मस्तानीला लवून मुजरा करून निघून गेली. ती प्रथम बाहेर आली, तेव्हाच तिच्या हाताकडे अप्पाचें लक्ष्य गेलें होतें, व तिच्या हातावर मस्तानीचें नाव गोंदलेलें त्यांना स्पष्टपणे आढळलें होतें त्यावरून मस्तानीच्या प्रेमानें वेडावलेला व अजूनही मस्तानी त्याच्यावर प्रेम करीत असेल असा गोवर्धन हा कोणी रंगेल प्रेमवेडा असावा व त्याला मस्तानीने जुबेदा हे नाव देऊन दासीच्या वेषान आपल्या महालात लपवून ठेविले असावें, असा तर्क त्यांनी केला लगेच त्यांनी मस्तानीला बजावून सांगितलं, "वहिनी! तुम्ही जरी कांहीं म्हटलें तरी मी तुम्हाला स्पष्टपणे एवढें सांगून ठेवतो की, तुम ा या ह्या लीला मोगल बादशहा अथवा दुसरा एखादा मुसलमान उमराव यांच्या जनानखान्यात शोभल्या असत्या. जितके मुसलमान लोक आपल्या बेगमांशी बदनेकी दाखवितात, तितकीच बदनेकी त्यांच्या बेगमांनी त्यांच्याशी दाखविली तर वेळीं क्षम्य होईल पण बाजीराव पेशवे तसे नाहात, त्यांच्याशी तरी तुम्ही असें वागावयाला नको होतें"

मस्तानी करारीपणाने उद्गारली, "भावजी! हा तुमच्या संशयी वृत्तीचा परिणाम आहे बायका झाल्या की त्यांना शील नसतेच अशी तुमची कल्पना आहे की काय? भावजी! मी तुम्हाला सांगून ठेवते, तुम्ही संशयाच्या भोवऱ्यात सापडून माझ्यावर आज पाहिजे तेवढें तोंडसुख घ्या, पण तुम्हीं ह्या प्रकरणाचा योग्य तपास केला व तुम्हाला माझ्या सुदैवाने तपास लागला, तर तुम्हीच पुन्हा माझ्यापाशी याल व माझी क्षमा मागाल माझ्या पाकपणाचा यापेक्षा निराळा पुरावा देण्याची मला मुळीच आवश्यकता नाहीं आता तुम्ही वाड्यात गेल्यावर स्वारीला हा सारा वृत्तान्त सांगाल व स्वारी मजवर रागावेल—'

"नाही—नाही वहिनी! तेवढ्याविषयी मात्र मी तुमच्या पायाची शपथ घेऊन तुम्हाला वचन देतो की, हा प्रकार खराखोटा कसाही असला तरी मी ह्या गोष्टीची कोठेही वाच्यता करणार नाही तुमच्यासाठीच मी अखेरपावेतो तोंड बांधून बसेन, असा याचा अर्थ तुम्ही घेऊ नका, मला माझ्या बंधूची जास्त काळजी आहे" अप्पा लगेच मागे वळून कोदंडाला म्हणाले, "कोदंड! तू देखील ह्या गोष्टीची कोठे वाच्यता करशील तर खबरदार! याद राखून ठेव, ही बातमी माझ्याकडून बाहेर फुटणार नाहीं, वहिनीकडूनही फुटणार नाही, इतकेंही करून जर ती फुटली तर ती तुझ्याकडून फुटली असेंच सिद्ध होईल, व त्याबद्दल तुला

भयकर शासन करण्यात येईल तुझ्या पाठच्या वहिणीच्या अब्रूची ही बाब आहे हे ध्यानी ठेव '

"तो माझा भाऊच आहे. त्याचा माझ्याविषयी काहीच गैरसमज व्हायचा नाही, व तो काही बोलायचाही नाही" मस्तानी कोंडाकडे वळून म्हणाली, "अरे का रे कोंडा ! मी काय म्हणते हे नीट ऐकून ठेव"

कोंडा बिचारा काहीच बोलेना त्याला काय बोलावे हेच कळेना पण त्याच्या सर्वांगाचा तिळपापड मात्र होत होता तो दगडी खांबाच्या कडीला हात लावून स्तब्धपणे तेथे उभा होता

आपा जरा थांबून पुन्हा मस्तानीस म्हणाले, 'वहिनी ! काही दिवस कोंडाला मी माझ्या पदरी घेणार आहे तुमची याला काही हरकत आहे ना ?'

"तो मला माझ्यापाशी पाहिजे आहे" मस्तानी म्हणाली.

'पण तो मलाही पाहिजे आहे याबद्दल तुम्हाला राग आला तरी मला पत्करेल" असे म्हणून आपा जावयाला निघताना कोंडाला म्हणाले, "कोंडा ! माझ्याबरोबर चल"

कोंडाने ओळखले की, आपणाकडून सारी माहिती काढून घेण्यासाठी आपाचा हा प्रयत्न चालला आहे आता खरे बोलावे तर वहिणीच्या आयुष्याचा सत्यानाश होणार, खोटे बोलावे तर धन्याला फसविल्याचे अघोर पाप माथीं बसणार ! थोड्या वेळापूर्वी त्याने मारे स्वतःच्या मनाशी निश्चय केला होता की, काय वाटेल ते झाले तरी मस्तानीच्या ह्या चवचालपणा चव्हाट्यावर आलाच पाहिजे व तिला शासन झालेच पाहिजे पण आता त्याला वाटू लागले की, ह्या अंधारातील गोष्टी उजेडात आल्या नसत्या तर फार बरे झाले असते पण आता पुढे काय करावे व कसे करावे याचा पूर्ण विचार करण्यापूर्वीच त्याला आपाच्या आज्ञेप्रमाणे त्याच्या बरोबर जाणे भाग पडले ते दोघेही दरवाजाबाहेर पडले तेव्हा मस्तानीने कोंडाला पुन्हा एकवार नेत्रसंकेताने ह्या गोष्टीची कोठेही वाच्यता न करण्या विषयी सुचविले

आपांनी जाता जाता पुन्हा मागे वळून मस्तानीला विनंति केली, "वहिनी ! ही गोष्ट खरी असो वा खोटी असो, तिच्यावर पडदा टाकण्याचे वचन मीं तुम्हाला दिलेच आहे ह्या बाबतींत माझी पुन्हा तुम्हाला एवढीच विनंति आहे की, आमचे व आमच्या देशाचे शत्रु तुमच्या कृपाछायेला राहून आमच्या सत्यनाशाची

करण्याने उभारणार नाहीत एवढी तरी खबरदारी तुम्ही घ्या मनुष्याच्या हातून मनदुबळेपणामुळे एखादे वेळी अक्षम्य अपराध घडतो पण त्या अपराधामुळे चारित्र्याला चिकटलेले पाप मनुष्यमात्राला पश्चात्तापात्मक प्रायश्चित्तानें नाहींसे करता येते कौटुंबिक आचारात भलत्या मोहाला बळी पडून पतीशी प्रतारणा करणारी पत्नी, पत्नीशी प्रतारणा करणारा पति, अथवा अशीच नात्याचीं अगर ऋणानुबंधाचीं माणसे जर तशा स्थितींतही माणुसकीला जागून वागतील व स्वतःच्या चुकीचे समर्थन करावयाचे टाळतील, तर त्यांच्या हातून इतर निकटसंबंधी जनांच्या मार्गांत काही अडथळे उत्पन्न व्हावयाचे टळतील पेशव्यांनी तुम्हाला उदार मनाने आश्रय देऊन आपल्या सुखदुखाची भागीदारीण केले आहे, त्या उपकाराची फेड उपकारानी करता आली नाही तर निदान अपकारांनी तरी करू नका!"

'ठीक! खुशाल बोला! पण भावजी! प्रत्येक माणूस आजचा शहाणा व कालचा अजाण असतो हे यतीं ठेवा' मस्तानी उद्गारली.

' असे आहे, तर मग मीच आनंदाने माझा अजाणपणा कबूल करून तुमची क्षमा मागेन मग तर झाले ना?' आपांनी विचारले

"... तर, मग मला तुम्ही मोहिमेवर बरोबर येऊ देणार की नाहीं?" मस्तानीने विचारले

"... येऊ देणारा किंवा न देणारा मी कोण?" आपांनी उलट प्रश्न केला

'... मला तुमचे वचन पाहिजे आहे सरकारस्वारी तुमच्या ... नाहीं हे मला आज नव्याने माहित आहे असं नाही" मस्तानी म्हणाली

... मनाशी असा विचार केला का, जरी मस्तानी त्या कोणा गोवर्धनाच्या ... गुन्हेगार असली, तरी ... शब्दाचा मार, या न्यायाने अपण तिची ... घेतली एवढी तिला शुद्धीवर आणण्याला पुरेशी होईल ..., ना आपणाला ... अंतःपतित झाली असली, तरीही तिच्यापर सतत नजर रहाण्या ... असलेली ... त्यामुळे तरी अशा गोष्टींना आळा बसेल, व पेशव्यांची ... राखली जाईल वास्तविक त्यांना तेव्हा मस्तानीचा इतका संताप ... होता का, हा केवळ त्यांच्या मनावर निर्णय जाणं ... असती तर

त्याच घटकेला त्यांनी तिला हाकलून दिली असती, अथवा पाहून भयंकर शासन केले असते. यापेक्षाही सत्य बोलावयाचे तर अप्पा उलट एकपत्नीव्रत पाळणारे असल्याने त्यांच्या आयुष्यात त्यापूर्वी कधी अशी भानगड उपस्थित झाली नव्हती. (व पुढेही कधी झाली नाही) बाजीराव पेशवे व अप्पा यांच्यात मूळात कोठे दुमत असेल, तर ते विवाहविषयक नीतिमत्तेच्या बाबतीत होते अप्पाच्या मतें बाजिरावांनीही आजन्म एकपत्नीव्रती रहावे असे होते मस्तानी ही बाजिरावाना छत्रसालाची धर्मकन्या या नात्याने कुलवधू लाभली असली व मस्तानीचे त्याच्यावर मनापासून प्रेम असले, तरीदेखील त्याच्या ठिकाणी जर अप्पा असते तर त्यांनी तिला मातुश्री म्हणून हात जोडले असते पण बाजिरावाचा रंगेल स्वभाव व त्याचे वडीलपणाचे नाते ओळखून अप्पा त्याच्या ह्या प्रकारच्या भानगडीत कधीच लक्ष्य घालीत नसत, किंवा बाजिरावाना अशा रंगेल पणापासून परावृत्त करण्याचाही प्रयत्न कधी करीत नसत हाच तटस्थ वृत्ति त्यांनी मस्तानीच्या बाबतीत आजच्या प्रसंगी धारण करण्याचे ठरविले असे ठर विण्याचे कारण असे की, आधीच पेशव्यांच्या कुटुंबात बायका-बायकांत वितुष्ट माजून राहिले होते, त्यामुळे मस्तानी अलीकडे बरीच असंतुष्ट झाली होती ती जर कोणत्याही निमित्ताने जास्त असंतुष्ट होऊन निघून गेली, किंवा बाजिरावाना तिचा ढालगजपणा कळून तिच्याविषयी त्यांच्या मनात विरोध उत्पन्न झाला, तर त्यामुळे त्या दोघांचेही जीवित दुःखमय होण्याला अवकाश लागणार नाही, हे अप्पा ओळखून होते त्यांतल्या त्यात मस्तानीचे काहींही झाले तरी त्याची त्याना पर्वा नव्हती-पण ती जर त्या असंतोषाच्या भरात बाजिरावाना सोडून गेली असती, आणि ती बारादरांचे पाणी प्यालेली, दरबारविलसितामुळें विलासकर्दमात लोळण्यात निर्ढावलेल्या अनेक मातबर यवनांचे रंगढंग पाहून आलेली, ती बाजीराव आपणावर आपल्याच चुकीमुळें का होईना पण नाराज झाले असे पहाताच अप्पाच्या मतें आपल्या अन्य एखाद्या प्रियकराचा हात धरून निघून जाण्याला कमी करती ना जगातील अशा साहसी स्त्रियांची कितीतरी उदाहरणे अप्पाना अवगत होती, त्याचीच पुनरावृत्ति मस्तानीच्या बाबतीत झाल्यास बाजिरावाच्या मनाला ती गोष्ट फार लागून राहील व त्याचा त्यांच्या जगड्व्याळ अंगीकृत कार्यावर अत्यंत अनिष्ट असा परिणाम होईल, ह्या भावी आपत्तीला अप्पा भीत होते म्हणूनच त्यांनीं तेव्हा आपला राग आवरून मस्तानीच्या

यापुढील पूर्ण दक्षतेने वागावयाचे ठरविले व मस्तानीला बाजिरावाबरोबर मोहिमेवर येऊ देण्याचे वचन दिले. मस्तानीचेही तेवढ्याने पूर्ण समाधान झाले.

येतांना मात्र वाड्यांत जातांना आप्पांनी एक गोष्ट मात्र केली, कोदडाला एकदर प्रकार खोदखोदून विचारला. पण कोदडाने स्वतःला माहीत असलेल्या प्रकारापैकी त्यांना एक अक्षरही सांगण्याचे नाकारले. त्यामुळे आप्पा त्याच्यावर इतके चिडले की, बोलण्याचा सोय नाही. ते नुसते चिडूनच थांबले नाहीत, त्यांना त्याला निर्वाणीची ताकीद दिली, "कोदड! परक्या दगलबाजांना आमच्या घरांत घुसून घालण्याच्या कामी तू ह्या कटाचा भागीदार आहेस. कोनगरामांचे आजवरचे चाळेही तुझ्याच संगनमताने सुरू असले पाहिजेत. तो हरामखोर गोवर्धन कोण कुठला हे तुला माहीत असले पाहिजे, व तुझ्याच साह्याने तुझ्या अंगणांत त्याला अंतःपुरांत दडवून ठेविला असला पाहिजे. असे असूनही यांतला खरा प्रकार ज्याअर्थी तू मला सांगत नाहीस, त्याअर्थी अशा पाताळयंत्री दगलबाज माणसाला शिक्षा होणेच योग्य आहे. तरीपण तुला मी अखेरची संधी द्यावयाची म्हणून असे सांगतो की, तू त्या गोवर्धनाचा तपास लावून इत्थंभूत वृत्तान्त मला निवेदन केला पाहिजेस. दुसऱ्या कोणालाही यांपैकी एक चकारशब्द तरी कळेल तर खबरदार! आज सूर्यास्ताच्या आंत जर तू गोवर्धनाचा तपास लावून दिला नाहीस, तर तुझ्या प्राणावर बेतेल, याद राखून रहा!"

गरीब बिचारा कोदड अर्ध्या वाटेवरूनच परत वळला, व आप्पा त्याला टाकून पुढे निघून गेले. कोदड कांही वेळ रस्त्यावरच 'नशीब!' म्हणून शून्य चित्ताने विचार करीत उभा राहिला, आतां पुढे काय करावे हे त्याला सुचेना. मस्तानीच्या महालांत पाहिलेल्या प्रकाराची आप्पांसमोर उजळणी करून त्यांचा राग दूर करण्याचा मार्ग त्याला मोकळा होता, पण त्याचे मन त्याला तसे करूं देईना. कारण, त्यामुळे स्वतःच्या पाठच्या बहिणीचा नादानपणा चव्हाट्यावर येऊन ती तर पेशव्याच्या आश्रयाला मुकणारच, पण त्याबरोबरच आपल्या घराण्याची अब्रू घालविल्याचे पाप त्याच्या पदरी पडणार, असें त्याला वाटत होते. बरे, बहिणीचे हे चाळे त्याला सहन होत नसल्याने तिच्याकडे जाणेही त्याला रुचेना. मस्तानीकडे गेल्यावर ती त्याला कितपत थारा देती, हाही एक विचार करण्यासारखा प्रश्न होता. तरीपण एका कारणासाठी कोदडाची पत्नी सुंदर मस्तानीच्या पदरींच होती, तिला बरोबर घेण्यासाठी तरी त्याला एकवार तिकडे जाणे प्राप्त होते. तिला बरोबर घेऊन आपण काळे

करून कोठें तरी निघून जावें असें त्याला एकदा वाटलें, पुन्हा वाटलें, 'असें आपण पळून गेलो तर आपला बचाव होईल खरा, पण आपणा सर्वांवर नसती संकटें ओढवून आणणारा, तो चांडाळ गोवर्धन अजिबात मोकळा सुटणार! ही स्वतःच्या अब्रूची बाब म्हणून अप्पा त्या प्रकारावर पांघरूण घालण्याचा प्रयत्न करणार, त्यामुळें गोष्ट या कानाची त्या कानाला कळणार नाहीं, आणि कमळाच्या हृदयांत चोरटा भ्रमर दडून बसून सर्वांचा डोळा चुकवून मनसुराद मधुप्राशन करीत असतो त्याप्रमाणें तो सैतान मस्तानीचें–माझ्या बहिणीचें विलासमंदिर आपल्या वास्तव्यानें विटाळून टाकणार! छे! असें उपयोगी नाहीं. बहिणीची अब्रू राखण्यासाठीं आपण मुग्ध राहिलों तरी त्या नीचाला त्याच्या अपराधाबद्दल देहान्त प्रायश्चित्त हें मिळालेंच पाहिजे, व तें मी देणार आणि मस्तानीला तरी क्षमा कां म्हणून? बहीण झाली तरी असली कुलकलंकिनी बहीण जिवंत ठेवून काय करावयाची? बस्स! तिला व त्याला, दोघानांही ह्या जगांतून कायमचा नाहींशीं करणें हें माझें कर्तव्य आहे आणि हें कर्तव्य मला आजच्या आज सूर्यास्तापूर्वी पार पाडावयाचें आहे. धन्यांनीं मला देहान्त शासन दिलें तर त्याचें मला भय नाहीं. प्राणि जन्माला आला तो केव्हांना केव्हां मरून जावयाचाच. मात्र सुंदरचें आयुष्य त्यामुळें दुःखमय होईल. अपराध मस्तानीचा व त्याबद्दल हकनाहक बळी पडणार मी आणि त्यामुळें सुंदरच्या जन्माचें मात्र वाटोळें होणार! पण त्याला इलाज नाहीं—"

सुंदरविषयीं जास्त विचार कोदंडाला करवेना. तरी पण मस्तानी व तिचा प्रियकर तो गोवर्धन ह्या दोघांना ठार करून स्वतःच्या कुळाला लागणारा–नव्हे, लागलेला कलंक त्यांच्याच रक्तानें धुवून काढण्याचा विचार त्यानें कायम केला, व तो अमलांत कसा आणावा, याविषयींची योजना निश्चित करण्यासाठीं तो तेथल्या तेथेंच शून्य चित्तानें सैरावैरा भटकूं लागला. होतां होतां दोन प्रहर झाले, तरी कोदंड त्या निर्जन भागांत इकडून तिकडे व तिकडून इकडे भटकत होता. तो सायंकाळीं सूर्यास्ताच्या सुमाराला मात्र कोठें तरी निघून गेला न कळे!

  

सूर्यास्त होऊन गेला तरी कोदंडानें आपली आज्ञा पाळल्याचें चिमाजीअप्पांच्या निदर्शनाला आलें नाहीं, त्याबरोबर त्यांनीं मस्तानीच्या महालाकडे कोदंडाचा तपास करण्यासाठीं माणसें पाठविलीं. पण तेथेंही तपास लागला नाहीं. मस्तानी

तिची दासी सुदर यांची कल्पना होती कीं, अप्पानी कोदडाला बोलावून नेले आहे, तिकडे तो असेल पण तिकडूनच माणसे जेव्हा तपास करीत आली, तेव्हा त्या दोघीनाही चिंता वाटू लागली की कोदड गेला तरी कुठे ? सुदरला सकाळचा सर्व प्रकार मस्तानीकडून कळला असल्यामुळे तिला कोदडाविषयीं विशेष काळजी वाटू लागली मस्तानीलाही काळजी वाटला असेल, नाहीं असे नाही तो तिचा भाऊच होता, बहिणीला भावाविषयी काळजी वाटावयाचीच पण तिला वाटणारी काळजी निराळी व सुदरला—कोदडाच्या धर्मपत्नीला वाटणारी काळजी निराळी सुदर लगेच मस्तानीच्या परवानगीने कोदडाचा शोध करण्यासाठी बाहेर निघून गेली

पण ती रात्र गेली, दुसरा दिवस उजाडला, तरी कोदडाचा शोध काहीं लागला नाही, व त्याच्या शोधार्थ गेलेली सुदरही माघारी आली नाहीं आता मात्र चिमाजीअप्पाना वाटले की, मस्तानीनेच काहीतरी कारस्थान आरभिले असून त्या कारस्थानाची सागता करण्यात कोदड व सुदर ही गुतून गेली असावीं त्या कारस्थानाचा तपास लावणे चिमाजीअप्पाना अवश्य वाटले पण होता होईतो बाजिरावाच्या कानापर्यंत ही ओरड जाऊ द्यावयाची नाही, ह्या इराद्याने त्यानी बाजिरावाना व इतर मडळीला त्या दिवशी पुढे मोहिमेवर जाऊ दिले, व आपण कुटुबाची सर्व व्यवस्था लावून मागाहून येतों असे सागितले बाजिरावानाही तो विचार पटला व ते पुढे निघून गेले अर्थात मस्तानीही त्याच्याबरोबर गेली भाऊ व भावजय बेपत्ता झाली म्हणून तिला जरा वाईट वाटले पण खरें बोलावयाचें तर कोणाचा भाऊ व कोणाची भावजय ! मस्तानी म्हणाली, 'ती येतील मागाहून' नारायणजी ढमढेरे आवजी कवडे, कृष्णराव व बळिराम ही मडळीही निराळ्या मार्गाने रवाना झाली त्या मडळीला बाजिरावाबरोबर जाता आले नाहीं, याचे कारण बाजिरावाना प्रथम अभयसिंगाला भेटून त्याच्या मार्फत दुर्जयसिंगाचा बचाव करण्यासाठीं अहमदाबादेकडे जावयाचे होते, व नारायणजी, आवजी वगैरे मडळीला गुपचुपपणें निजाम, बगष वगैरे मडळीच्या तलासावर राहून त्याची व दाभाडयाची गाठ पडू न देता, किंवा शक्य तर त्याना वेळींच पायबद लावून मग दाभाडयाशीं ते असतील तेथवर पेशव्याच्या वतीनें तडजोडीचें बोलणे लावण्यासाठीं जावयाचें होतें

इतकी खबरदारी चिमाजीअप्पानी घेतली, पुण्यात मागें एक दोन दिवस राहून गोवर्धन, कोदंड व सुदर याचा, त्याप्रमाणेच कोन्हेररामाचाही शोध केला, पण

व्यर्थ ! गोवर्धन अजून पुण्यातच असावा, तो मस्तानीबरोबर गेला नसावा. अशी अप्पाची समजूत होण्याचे कारण त्यानी मस्तानीबरोबर कोण कोण दासदासी जातात यावर सक्त नजर ठेवली होती, तरीही त्याना गोवर्धन आढळला नव्हता आणि आश्चर्याची गोष्ट ही की, मस्तानीची जुबेदा दासीही त्याना कोठे आढळली नाहीं ! अखेर त्यानीं गोवर्धन, कोदड व सुदर यांचा शोध लावून देणाराला मोठे बक्षीस देण्याचें जाहीर करून मोहिमेचा मार्ग पत्करला

खरेच, गोवर्धन, ती जुबेदा दासी, कोदड व सुदर याची काय अवस्था झाली असेल बरं ? पण भविष्यकाळ आपण होऊनच योग्यवेळीं हे रहस्य उलगडून दाखविणार आहे, तोंवर धीर धरावयाला आपणाला तरी काय हरकत आहे ?

## प्रकरण पधरावें

# दुर्जनांची ओळख

आपणाला आता कांहीं वेळ पेशवे व त्यांची इतर साहाय्यक मंडळी याना त्यांच्या अंगीकृत कार्याची सांगता करण्यासाठीं मार्गांत सोडून पेशव्याचे प्रतिस्पर्धी सेनापति त्रिंबकराव दाभाडे यांच्या छावणात जमलेल्या दुर्जनांची ओळख करून घेण्यासाठी गुजराथेंत शुक्रतीर्थ* येथें जावयाचें आहे शुक्रतीर्थ हें पवित्र नांव ऐकून तेथल्या पवित्र वातावरणात कल्पनेनें कां होईना, विहार करावयाला सांपडून कांही पुण्यांश पदरीं पडेल अशी उत्कंठा वाचकांना वाटणे साहजिक आहे, व तें वावगेंही नाहीं पण तेथें दाभाड्याच्या छावणींत गेल्यावर तेथेंही त्या स्थान-महात्म्याला साजेसें पवित्र वातावरण अनुभवाला येईल अशी भलतीच अपेक्षा वाचकांनी आपल्या हृदयाशीं बाळगू नये, म्हणजे परिणामीं निराश होण्याचा प्रसंग त्यांच्यावर येणार नाहीं

त्रिंबकराव दाभाडे उत्तरेकडील सारी व्यवस्था लावून दसऱ्यापूर्वीच जे दक्षिणेंत आले होते, ते फारच निराळ्या अपेक्षेनें आले होते पिलाजी गायकवाड, कंठाजी कदम बांडे, रघूजी कदम बांडे, मालोजी पवार, वगैरे आपल्या लढवय्या साहाय्यकांपाशीं त्यानीं उत्तरेकडे असतां असा पैजेचा विडा उचलला होता की, 'शाहू-महाराजांना आपण आपल्या दराऱ्यानें दिपवून सोडून गुजराथ माळव्याचीच काय पण साऱ्या उत्तरेकडील प्रांतांची सनद आपल्या एकट्याच्या नावानें घेऊन येऊ तरी, किंवा पेशव्याचा समूळ नायनाट करून मनगटाच्या जोरावर मराठशाहीचे सर्वाधिकार संपादन करून शाहूमहाराजांना आपल्या हातांतील नामधारी कळसूत्री बाहुलें बनवून सोडूं तरी, तरच सेनानी दाभाड्याचें नाव सांगूं'

त्रिंबकरावांनीं ही प्रतिज्ञा करण्यांत काहीसा उतावळेपणा केला होता खरा पण खरे पाहू जातां त्यांना याप्रमाणें स्वर्ग दोन बोटे उरण्याला कारणेंही तशींच जबर दस्त होतीं. त्याकाळीं महाराजांच्या पदरीं खरे कार्यकर्ते व अव्वलींचे कारभारी

---

* शुक्रतीर्थ हें पवित्र स्थल गुजराथेंतील भडोच तालुक्यांत नर्मदा नदीच्या काठीं आहे एथें कार्तिक शु० १५ ला मोठी यात्रा भरते एथेंच नर्मदेमधील एका लहानशा बेटावर 'कबीर वड' या नावाचा फार जुना विशाल वटवृक्ष आहे

असे पेशवे व सेनापति हे दोघेच होते इतर कारभारीही कार्यकर्ते होते, नाहीं असें नाही पण ते बोलून चालून दुय्यम दर्जाचे होते, व प्रतिनिधि एकच मानानें सर्वात मोठे, ते नुसते नावाचे मोठे होते मराठशाहीचा विस्तार झपाट्याने व्हावा म्हणून शाहूमहाराजानी निरनिराळ्या कर्तबगार सेवकाना निरनिराळ्या प्रांतांत मर्दुमकी गाजवन आपली सत्ता प्रस्थापित करण्याचे अधिकार दिले होते, त्यातच पेशवे व सेनापति यांना अनुक्रमे माळवा व गुजराथ प्रांतात सत्ता प्रस्थापित करण्याचे अधिकार मिळाले होते कंठाजी कदम बांडे, पिलाजी गायकवाड, वगैरे मंडळीलाही असेच अधिकार थेट शाहूमहाराजाकडून मिळाल्याने अशा प्रत्येकाला स्वतंत्रपणे मुलुखगिरी करून सत्ता वैभव संपन्न बनण्याचा राजमार्ग मोकळा झाला होता १ योजनेचा परिणाम सकृद्दर्शनी फारच इष्ट असा झाला निरनिराळ्या कर्तबगार महाराष्ट्रीयाना स्वतंत्रपणे पराक्रम करून उदयाला येण्याची संधी मिळताच जो तो यश प्राप्तीसाठीं जिव्हाळ्याने झटू लागला असें स्वातंत्र्य प्रत्येकाला देण्यात महाराजानी मराठशाहीचा तात्पुरता विस्तार तेवढा विचारांत घेतला पण त्याचा परिणाम असा विपरीत झाला कीं, जो उठला तो सरदार स्वत ला आपल्या ताब्यातील प्रदेशापुरता स्वतंत्र मालकच समजू लागला. महाराजाच्या नामधारी धनीपणापुरती थोडीशी रक्कम आपण महाराजाना दिली कीं. आपण दुसऱ्या कोणाचे काहीच लागत नाही. अशी ज्याची त्याची भावना होऊन बसली अशा स्थितींत पेशवे माळव्यांत व बुंदेलखंडांत अधिकाधिक विजयी होऊं लागलेले पाहून सर्वांना वाटू लागले कीं, हें पेशव्याचें प्रस्थ आतां आपणां

१ सरंजामी पद्धत म्हणतात ती हीच ह्या पद्धतीचा उगम पहिले पेशवे बाळाजी विश्वनाथ यांच्या कारकीर्दींत शाहूमहाराजांनी केला त्या वेळी राज्याची विस्कळलेली घडी बसविण्यासाठी राजवटीच्या कर्तबगार पुरुषांना प्रोत्साहन देणे अवश्य होते, म्हणून 'राजासाठीं मुलुख जिंका, तुम्ही खा व राजाला द्या' या न्यायाचा अवलंब करणें शाहूमहाराजाना भाग पडलें ही सरंजामी पद्धत lesser evil या नात्यानें प्रथम यशस्वी झाली. पण पुढें त्या सरदारांना कह्यांत ठेवण्याचें शाहू महाराजाना साधलें नाहीं व त्यांनीं पेशव्यांना तसे करू दिलें नाहीं, यामुळें ते सरदार भस्मासुरासारखे माजून बेमुर्वतखोर बनले. पेशवे व सेनापति यांचा झगडा उत्पन्न झाला, तो उपरोक्त सरंजामी पद्धतीमुळेच होय ह्या पद्धतीचें विशेष दुर्धर पर्यवसान पेशवाईवरील या पुढील कादंबऱ्यांत ओघाओघाने पहावयाला सापडेल

सर्वांनाच भारी होऊन बसणार! पेशव्याचा उत्कर्ष इतर मंडळीला सहन न होण्याचे आणखी कारण असे की, पेशवे आपल्या डोळ्यासमोर हिंदुपदपादशाहीचे उच्चतम ध्येय ठेवून त्या ध्येयाला पोषक अशा रीतीनें निरनिराळ्या प्रदेशात प्रस्थापित झालेली निरनिराळ्या मराठा सरदारांची सत्ता छत्रपतींच्या एकतंत्री सत्तेंत केंद्रीभूत करण्याच्या उद्योगाला लागले. इतर मराठा सरदारात सेनापति दाभाडे हेच जास्त बलिष्ठ व प्रमुख आहेत असे त्यानीं पाहिले व प्रथम त्यांच्या सत्ते खालील गुजराथेत काही हिस्सा स्वत साठीं मागितला आणि स्वतः संपादन केलेल्या प्रांतात काही हिस्सा बदल्याच्या स्वरूपात सेनापतींना देऊ केला.*

केवळ वरवर पाहू जाता बाजीराव पेशव्याची ही मागणी राजाज्ञेचें अतिक्रमण करणारी होती. महाराजानीं दाभाडयाना जी मुलुखगिरी सांगितली ती दाभाडयानी संपादली, त्यात पेशव्यांना पडण्याचे काय कारण? जसे दाभाडे हे छत्रपतींच्या गादीचे सेवक, तसेच पेशवे हेही सेवकच. ह्या सबबीवर दाभाडयानी पेशव्याच्या मागणीला मान देण्याचे नाकारले, तेव्हा उभयपक्षीं काहीशी दडेली सुरू झाली. पेशव्याच्या वतीने चिमाजीआपा वगैरे मंडळी गुजराथेत शिरून बादशाही सत्ता उखडून टाकण्याच्या उद्योगाला लागली, हे दाभाडयाना सहन न होऊन त्यांनी मूले कुठार या न्यायानें खुद्द पेशव्याच्या अधिकारक्षेत्रात धुमाकूळ माजविला या कामी त्याना पिलाजी गायकवाड, कंठाजी कदम बांडे, उदाजी पवार वगैरे त्या प्रांती मुलुखगिरी करणाऱ्या इतर मराठा सरदाराचा व मराठशाहीच्या नाशावर टपून बसलेल्या मोगलाचा पाठिंबा मिळाला. मराठा सरदारांचा पाठिंबा

*'ह्या मुलुखगिरीसंबंधानें पेशवे व सेनापति यांच्यात अव्वलपासून चुरस होती. सेनापतीस गुजराथच्या मुलुखगिरीची व बाजिरावास माळव्याचे मुलुखगिरीची, अशी आज्ञा महाराजाची असता बाजिरावाने सेनापतीशीं बोलणे घातलें कीं 'गुजराथेतील महाल तुम्ही निम्मे आम्हाकडे द्यावे, व माळव्यातील महाल आम्हीं सर करू त्यातील निम्मे तुम्हीं घ्यावे' यावर सेनापतींनीं बोलणें घातलें की, 'महाराजानीं तुम्हास माळव्याची मुलुखगिरी सांगितली. तुमचा कारभार तुम्हीं करावा, आमचा आम्हीं करावा. वाटणी मागूं नये. (का. सं. तील दाभाडयाची हकीकत.) ह्या दाभाडयाच्या उत्तरातच–पेशवे व दाभाडे यांच्यातील तटयाचें बीज आहे.

सेनापतींना मिळाला याचे कारण त्या सरदारांच्या मनातून आपापल्या पुरते सवते-सुभे स्थापन करून स्वतंत्र राजाप्रमाणे ऐषआरामात रहावयाचे होतें, या त्यांच्या बेताला बाजीराव पेशव्याची सर्व मराठा सत्तेच्या एकीकरणाची योजना जाचक होती. आणि मोगल सुभेदाराचे पाठबळ दाभाडयाना मिळण्याचे कारण त्याना मराठमंडळांत कोणीकडून तरी फूट पाडून हिंदु-पद-पादशाहीच्या विराट् स्वरूपात परिणत होऊ पहाणाऱ्या मराठशाहीच्या सत्तेची घडी विस्कळून टाकावयाची होती

पेशवे व सेनापति दाभाडे याच्यांमधील ही चुरस काही तेव्हा अगदी नवी नव्हती, बऱ्याच दिवसापासून तिचीं बीजे मराठयाच्या उत्तरेकडील कारभारात खोलवर रुजलीं होतीं महाराजाच्या कानावर ह्या कागा या वारवार जातच होत्या. पण बाजीराव पेशव्यानी आपला उदात्त उद्देश महाराजाना स्पष्ट करून सागितल्याने व दाभाडे वगैरे मंडळीची राष्ट्रविघातक स्वार्थलोलुपता महाराजाच्या वेळोवेळीं चागलीच प्रत्ययाला आल्याकारणानें त्यानी पेशव्याचीच बाजू उचलून धरली व दाभाडयाना चार समजुतीच्या गोष्टी सागून पाहिल्या, पण त्याचा काही उपयोग झाला नाही § दाभाडयाना जी आशा वाटत होती की, महाराज आपणाला वश होतील ती आशा फोल ठरतांच त्यानीं चिडून पेशव्याबरोबरच महाराजाचाही नक्षा उतरविण्याचा निश्चय केला भास्कररामामार्फत त्यानी महाराजाना पत्र पाठवून भेदनीतीचा डाव टाकून पाहिला तोही त्यांच्या अगाशी आला तेव्हा त्याना एकच मार्ग मोकळा राहिला, तो पेशव्याची सत्ता उत्तरेकडे व साधल्यास इतरत्रही नामशेष करण्याचा हा उपाय यशस्वी करण्यासाठी दाभाड्यानी तातडतोब पेशव्याच्या शत्रूना आपणाशी सामील करून घेण्याचा उद्योग अधिक जारीने आरंभिला त्यानी निजामाला व कोल्हापूरकराना पत्रे पाठवून पेशव्याचे पारिपत्य करण्याच्या कामी त्याची कुमक मागितली, व उत्तरेकडील आपल्या गायकवाड, बाडे, पवार वगैरे मदतनिसानाही पेशव्याची

§ उपरोक्त मोहीम सुरू होण्यापूर्वी दोन वर्षांचे ता ३१।५।१७२८ रोजीचे शाहूमहाराजांनीं दाभाडयास लिहिलेले जरबेचे पत्र उपलब्ध आहे त्यात महाराज म्हणतात' 'तुम्हांस माळवे प्रांती धामधूम करून पेका घ्यावयास गरज काय ? याउपर तुम्हीं पेका घेतला आहे तो बाजीराव पडित याजकडे फिराऊन देणे नाही तर तुमच्या महाली मोबदला करतील याउपर माळवे प्रांती उपसर्ग न देणे फिरून बोभाटा येऊ न देणे' ( शाहूमहाराजाचा रोजनिशी )

सत्ता नामशेष करण्याला उत्तेजन दिलें दाभाड्यासारखा अव्वलींचा मोहरा पेशव्याचा नक्षा उतरण्याला सज्ज झाला आहे व परस्पर काट्यानें कांटा निघत आहे, असें पहाताच ते सर्वजण दाभाड्याना साह्य करण्याला तयार झाले कोल्हापूरकरानी आपल्या वतीनें आपले पतप्रधान चिमणाजी दामोदर मोघे याना तातडनीब ससैन्य दाभाड्याकडे रवाना केलें, ते मार्गातच दाभाड्याना येऊन मिळाले निजामाकडूनही उदेखान व तुरुकताजखान आणि बगषाकडून गोखान असे तीन पठाण सरदार कारस्थान करण्यासाठी दाभाड्याकडे आले ह्या सरदाराचा तळ प्रथम भडोच एथें होता पण दाभाडे उत्तर प्रांती येताच भेटीची जागा शुक्रतीर्थ ही त्यानीं ठरविली, व पठाण सरदाराना तेथें गौरवपूर्वक बोलावून आणले प्रथम दाभाड्याचा बेत त्या सरदाराना भडोच एथें भेटून कारस्थान करण्याचा होता पण माडवीचा राजा दुर्जयसिंग हा पेशव्याचा पक्षपाती असून तो ह्या कारस्थानात काही तरी बखेडा माजवील ह्या भयानें त्याप्रमाणेच पेशव्याबरोबर किंवा त्यापूर्वीच दुर्जयसिंगाचा नायनाट कसा करता येईल याचाही विचार त्या सर्वांना मिळून करावयाचा असल्याने त्यानीं काहीं अतरावर सर्व बाजूनी सुरक्षित असे शुक्रतीर्थ हेंच आपले सकेतस्थान ठरविले होतें दाभाड्याना हेंच स्थळ सकेतस्थल म्हणून पसत करण्याची इच्छा झाली याचें कारण असें कीं, तेथल्या दैवतावर त्याचा विश्वास होता आजवर आपणाला जो जय मिळाला, तो त्या दैवताच्या कृपेनेंच मिळाला व अशा प्रासादिक स्थळीं बसून केलेल्या मसलती परिणामीं फलद्रूप होतात असा त्याचा समज झाल्याने ते कोणतीही महत्त्वाची मसलत करावयाची तर ती तेथे करीत त्यानी निजाम व बगष याच्या तर्फेने आलेल्या पठाण सरदाराच्या समतीने माडवीच्या दुर्जयसिंगाला 'तू आमच्यार्शी दोस्ती करून पेशव्याशीं लढण्याला तयार हो नाहीपेक्षा आमच्याशीं लढून मरण्याला तयार हो' असा निर्वाणीचा खलिता प्रथम पाठविला होता तो एथूनच, व दुर्जयसिंगाकडून त्या खलित्याचें स्पष्ट नकारार्थी उत्तर आल्यावर त्याचा धुव्वा उडविण्यासाठीं ते त्याच्यावर चाल करून गेले तेही एथूनच

मागें आपणाला माहीत झालेच आहे कीं, दुर्जयसिंगाचा जासूद पेशव्याच्या नांवाने विनतिपत्र घेऊन पुण्याला गेला होता त्या गोष्टीला आज जवळ जवळ तीन महिने होऊन गेले होते एवढ्या दरम्यान् दाभाडे व बगष आणि निजाम यांचे पठाण सरदार यांनीं माडवीवर स्वारी करून आपला बोलला शब्द खरा केला होता. दुर्जयसिंगाचा त्या चौघाच्या सयुक्त सैन्यासमोर काहींच टिकाव न

लागून त्याला किल्ला सोडून परागंदा व्हावें लागलें होतें त्याच्या साऱ्या कुटुंबाची ही अगदी दाणादाण उडाली होती. त्याची राणी विजयादेवी एकदां गेंदखानाच्या हातीं सापडून पुन्हा पळाली होती, व तिला पुन्हा पकडून आणून स्वत. तिच्याशीं निका लावण्याचा गेंदखानाचा निर्धार होता अशा निर्धार करण्याला एक नाजुक कारण घडून आलें होतें ह्या कारणाची वाच्यता गेंदखानानें कोठेंही केली नव्हती यास्तव आपणही सध्याच त्याची वाच्यता करणें बरें नाहीं पण एवढें मात्र खरें की जरी दुर्जयसिंगावर दाभाडे व निजामाचे सरदार यांचा रोष होता, तरी दुर्जयसिंगाशी खरें हाडवैर असे एका गेंदखानानेंच मांडलें होतें त्यानेंच मांडवावरील मोहिमेंत पुढाकार घेऊन दुर्जयसिंगाचा धुव्वा उडविला होता, व दुर्जयसिंगाच्या पत्नीवरही त्या पापिष्ठाचा एकट्याचाच डोळा होता इतकेंही करून अजून म्हणजे दाभाडे वगैरे मंडळीची दुर्जयसिंगाविषयीची भीति अगदींच नष्ट झाली होती असें नाहीं मधून मधून त्याच्या कानीं बातम्या येत की, दुर्जयसिंग पावागडच्या डोंगरात गुप्त रूपानें संचार करीत असून तेथल्या भिल्ल वगैरे रानटी लोकांच्या साह्यानें आपलें गेलेलें राज्य पुन्हा मिळविण्याचा त्याचा विचार आहे त्याप्रमाणेंच बाजीराव पेशवे मुद्दाम दुर्जयसिंगाची कुमक करण्यासाठीं पुण्याहून दसऱ्याच्या दुसऱ्या तिसऱ्या दिवशीं निघाल्याच्या बातम्याही दाभाड्याच्या हेरांनीं हेरून आणल्या होत्या

बाजीराव पेशवे व त्याचे साहाय्यक सामना देण्याच्या इरादानें निरनिराळ्या मार्गांनीं उत्तरेकडे चालून येत आहेत असे कळताच दाभाडे व तुरुकताजखान, बडेखान आणि गेंदखान हे पठाण सरदार यांचे धाबे बरेच दणाणले, व आता पुढें कसें करावयाचें याची निश्चित फेरयोजना ठरविण्यासाठीं ते सर्वजण पुन्हा शुक्र-तीर्थावर जमा झाले. तेथे रोज रोज बातमीदारांनीं बातम्या आणाव्या व त्यावरून पेशवे वगैरे मंडळीचा पुढील रोख अजमावून दाभाडे वगैरे मंडळीनें उपाययोजना करावी, असा क्रम कंक दिवस चालला होता काहीं झालें तरी पेशव्याचा समूळ उच्छेद करावयाचाच, ह्याविषयीं सर्वांचें एकमत झालें पण नुसतें एकमत झाले तरी तेवढ्यानें पेशव्याचा समूळ उच्छेद थोडाच होतो! पेशव्याना नामशेष करावयाचें तर प्रथम त्याना उत्तरेकडे सत्ताहीन केले पाहिजे व त्यासाठीं उत्तरेकडे वावरणाऱ्या मराठा सरदारांची आणि बादशाहाच्या सुभेदारांची कुमक मिळणें अवश्य नाहींपेक्षां तिकडून पेशव्याना कुमक येऊन सारेंच तिरपगडें व्हावयाचें. यास्तव

पेशव्याना झुलवीत झुलवीत उत्तरेकडे न्यावयाचे, आणि तेथें आपल्या वतीच्या सर्वांच्या सेना एकत्र आल्यावर पेशव्याना एखाद्या अडचणीच्या जागी गाठून नामोहरम करावयाचें, असा बेत ठरला ह्या बेतानुसार दाभाडे व निजामाचे पठाण सरदार मिळून सर्वजण आपापल्या सैन्यासह पेशव्याचा चोहोंकडून कोंडमारा करण्यासाठीं नवे नवे सैन्य जमवीत कामगिरीवर निघावयाचे होते

जशी पेशव्याना पुण्याहून निघताना आपण विजयी होऊ अशी आशा करण्याला त्याच्या नारायणजी ढमढेरे, आवजी कवडे, आयाबा मुजुमदार, अबाजीपंत पुरंदरे वगैरे जिवाला जीव देणाऱ्या साह्यकाच्या जिवावर जागा होती, तशीच दाभाडयानाही आपण बोलला शब्द खरा करू अशी ईर्षा बाळगण्याला पुष्कळच आशा होती. निजामाकडील तुरुकताजखान व जडेखान हे सरदार व बगषाकडचा गेत्रखान, बंधु यशवतराव व बाबूराव दाभाडे, बांडे, पवार, गायकवाड, मामा मानसिगराव टोके वगैरे मोठमोठी मंडळी दाभाड्याची साह्यकारी होती शिवाय अडीअडचणीला त्याना आणखी मदत लागल्यास दिल्लीच्या बादशहातीकडूनही ती त्याना मिळाली असती मराठशाही केव्हा बुडते म्हणून बादशहा व त्याचा वजीर हे डोळ्यात तेल घालून वाट पहात बसले होते पण इतके दिवस मराठमंडळात फूट न पडल्याकारणाने बादशहाचे व वजीर याचे ते बेत म्हणजे केवळ मनातले मांडे ठरले होते ते बेत मूर्त स्वरूपाला येण्यासाठी मराठमंडळात फूट पडणें अवश्य आहे, व बाजीराव पेशवे जोंवर मराठमंडळाचे प्रमुख आहेत तोवर ती फूट पडणे शक्य नाही, हे निजामासारख्या बादशाही सुभेदारापासून थेट वजीर व बादशहा ह्या सर्वांना कळत होते तो अपूर्व योग दाभाडयासारखा मराठमंडळातील प्रमुख घरभेदी वश झाल्याने आपोआप साधतो, असें दिसताच सर्व बादशाही सत्ताधाऱ्यानी दाभाडयाना उचलून डोकीवर घेऊन नाचू लागावे, यात आश्चर्य ते काय ? तात्पर्य काय, बाजीराव पेशवे व दाभाडे याची केवळ वर वर तुलना करून पहाता पहाता बाजीराव व त्रिंबकराव हे अगदीं तुल्यबल–किंबहुना त्रिंबकराव व बाजीरावापेक्षा जास्त सामर्थ्यवान होते त्याना स्फूर्ति देणाऱ्या माणसाची वाण नव्हती, सैन्यही त्यांच्यापाशीं विपुल होते, उत्तरेकडील मोहिमेत अपरंपार धनही त्याच्या हाती लागले होते, इतकेही करून त्याच्यातली उणीव शोधावयाची तर ती एकच होती–त्याच्या अंगीकृत कार्यात परमेश्वराचे अधिष्ठान नव्हते त्याचा मोहिमेचा बेत ठरला तो स्वार्थाचा, व त्याला त्याच्या दंगलखोरानी संमति दिली तीही स्वार्थ साधण्यासाठीच !

नाहीं म्हणावयाला दोन-फक्त दोनच जीव त्रिंबकरावाना प्रथमपासून ह्या अत्याचारापासून परावृत्त करण्यासाठीं झटत होते त्यांची आई उमाबाई व बायको गिरिजाबाई प्रथमपासूनच कानीकपाळीं ओरडून त्याला समजावीत होत्या कीं, असें करू नका. त्रिंबकरावाचा पक्ष सबल आहे व पेशव्यांचा पक्ष दुर्बल आहे हें त्याना प्रथमपासून कळत होते प्रसगीं त्रिंबकराव मोहिमेत पेशव्यांना नेस्तनाबूत करून सर्वत्र विजयी होऊ शकतील अशीही त्या दोघींना खात्री वाटत होती, पण यामुळे दाभाडयांच्या लौकिकांत भर पडणार नाहीं व देशद्रोहाचें महापातक मात्र दाभाडयाच्या माथीं बसून सर्वत्र त्याची छी थू होईल, हे ओळखून त्या दोघी साध्वींनीं त्रिंबकरावांना ह्या अन्यायापासून परावृत्त करण्याची पराकाष्ठा चालविली होती, पण उपडया घडयावर पाणी या न्यायाची त्याच्या प्रयत्नाची अवस्था झाली होती. उमाबाई दाभाडे इतकी चतुर, करारी व दानतीची स्त्री ! तिचा पति खडेराव दाभाडे एवढा अद्वितीय सेनानी होऊन गेला तरी तो देखील प्रत्येक गोष्ट तिच्या सल्ल्यानेंच करी, इतकेंच काय, पण 'आपणाला जें एवढे यश मिळालें, त्या यशाची उगमदेवता आपली अर्धांगी आहे' असे तो वारवार मनमोकळेपणानें बोलून दाखवी. त्रिंबकरावांचा शिरजोरपणा खडेरावाला देखील त्याच्या ह्यातीत रुचे असे नाहीं. त्यानें आपल्या आयुष्याच्या अखेरच्या घटकेला आपल्या पुत्रांना जवळ घेऊन जो उपदेश केला तो हाच कीं, 'तुम्ही तुमच्या आईच्या आज्ञेबाहेर पाऊल टाकू नका' आईच्या आज्ञा वचनांत रहाणे हा प्रत्येक पुत्राचा परमधर्म तर आहेच, पण खडेरावाचा उपदेश त्या अर्थानेंच केवळ नसून त्याला उमाबाईच्या अगच्या मुत्सद्दीपणाची व पराक्रमाची पूर्णपणें पारख होती, म्हणूनच त्यानें आपल्या पुत्रांना तसा उपदेश केला होता जितका पत्नीवर तितकाच सुनेवर त्रिंबकराव दाभाडयाची बायको गिरिजाबाई इच्यावर खडेरावाचा विश्वास होता व 'तिच्या अनुमतीनें तू वागल्यास त्यात तुझें कल्याण होईल' असें तो आपल्या ह्यातींत त्रिंबकरावाला वारवार बजावीत असे पेशवे व सेनापति याच्यामधील लढा प्रथम खडेरावाच्या ह्यातींतच उत्पन्न झाला होता, पण त्याला खडेरावाची संमति होती असें मात्र नाही वृद्धापकाळामुळ तो शरपजरी पडलेला होता, त्यामुळें आपला पुत्र जो काय कारभार करील त्याला मुकाटपणे मान डोलविण्याशिवाय त्याला गत्यतर नव्हतें इतकेंच.

पण त्रिंबकराव आपल्या पित्याच्या ह्यातींत तरी कुठे आपल्या मातापितरांच्या

आज्ञेत वागत होते ते पुढें वागतील! त्याचा पेशव्याविरुद्ध रणक्षेत्रात उतरण्याचा डाव उमाबाईच्या लक्षात आला तेव्हाच तिनें त्याचा तीव्र निषेध करून त्याना ताळ्यावर आणण्याची शिकस्त केली, पण त्रिंबकरावानी तो तिचा हितोपदेश लाथाडून पुढे पाऊल टाकलेच आपल्या नाहीं तर बायकोच्या विनवणीचा तरी त्रिंबकरावाच्या मनावर काही इष्ट परिणाम होईल ह्या आशेने उमाबाईनें गिरिजाबाईला मुद्दाम त्याच्याबरोबर पाठविले होतें गिरिजाबाई पावलोपावलीं त्याना हिताच्या गोष्टी सागून ताळ्यावर आणण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होती. पण 'बायको हे पुरुषाच्या केवळ करमणुकीचे एक साधन बायकाना राजकारणात काय समजतें!' इतका समस्त स्त्रीजातीविषयीं अनुदारपणा हृदयाशीं बाळगणाऱ्या त्रिंबकरावाना जिथे आपल्या सुबुद्ध व चतुर मातेचा उपदेशही रुचला नाही, तिथे बायकोचा उपदेश काय रुचणार! असे होतें, तरी देखील गिरिजाबाई काहीशी सासूच्या आज्ञेमुळे पण मुख्यत. स्वत च्या इच्छेमुळे त्रिंबकरावांपाशी हट्ट धरून उत्तर हिंदुस्थान पाहण्याच्या मिषाने त्याच्याबरोबर मोहिमेवर निघून आली होती. सहसा ती कधीं मोहिमेवर पति चालला असता त्याच्याबरोबर जाण्याचा आग्रह धरणारी नव्हे प्रवास, मोहिमा, असला दगदगीचा कार्यक्रम तिला स्वभावत. आवडत नसे पण आजच्या खेपेला ती आली याचें कारण तिला प्रथमपासूनच ह्या मोहिमेचीं लक्षणे धड दिसत नव्हती केवळ वरवर विचार करताही त्रिंबकरावानीं अवलंबिलेला मार्ग हा आततायीपणाचा व अरेरावीचा होता हे तर खरेंच, व त्यामुळें उमाबाई व गिरिजाबाई ह्या सास्वासुनाना तो प्रथमपासूनच मान्य नव्हता पण ह्या मोहिमेचा विचार त्या दोघीना—विशेषत गिरिजाबाईला मान्य नसण्याचें आणखी एक जबरदस्त कारण असें होतें कीं, त्रिंबकराव केवळ सत्ता व सपदा याच्या लोभानेच ह्या मोहिमेच्या फंदात पडला होता असें नाही, त्यात स्त्रीलोभाची व तीही परस्त्रीलोभाची मुख्य भर होती

त्रिंबकराव तरणाबांड ताकदवान गडी होता लाथ मारीन तिथे पाणी काढीन अशी धमक त्याच्या अगीं होती, व हाती सत्ता व सपत्तीही विपुल होती अशा सर्वसमर्थ माणसाच्या अगीं सदाचार असला तर तो सुवर्णाच्या कोंदणातील रत्ना प्रमाणे शोभतो पण त्रिंबकरावाच्या ठायी तेवढीच वाण होती विशेषतः परस्त्रीच्या बाबतींत तर त्याची वासना इतकी पापी होती की, बोलावयाला नको थोरांमोठ्याच्या पायाखालीं असा अनाचार कितीही असला तरी तो त्याच्या मोठेपणाखालीं

झांकला जातो खरा, पण कधींना कधीं ती पापें उजेडात आल्याशिवाय रहात नाहींत गिरिजाबाई ही पतिव्रता असल्यानें व तिला स्त्रियांच्या शीलाची थोरवी कळत असून तें शील किती प्रभावशाली असतें हेंही माहीत असल्याने ह्या दुर्गुणापासून आपल्या पतीनें परावृत्त व्हावें यासाठी ती आटोकाट प्रयत्न करीत होती पण त्रिंबकरावानें इतर कोणत्या बाबतींत आपल्या अर्धांगीच्या शब्दाला मान दिला होता तो ह्या बाबतींत त्याच्याकडून तिच्या शब्दाला मान मिळेल !

गोष्ट ओघाला आली म्हणूनच सांगावयाची, चिमणाजी दामोदर मोघे आपला बंधु शिवाजीराव व पुत्र बळवंतराव मोघे यांच्यासह कोल्हापूरकरांच्या वतीनें त्रिंबकराव दाभाडयांच्या कुमकेसाठी त्यांना येऊन मिळाल्यापासून जितका त्रिंबकरावाचा विश्वास त्यांच्या ठायीं नव्हता, तितका विश्वास बळवंतरावाची तरुण व रूपवती पत्नी रुक्मिणी आपल्या पतीपाशी रहावयाला आल्यापासून त्रिंबकरावाला एकदर मोघे मंडळींविषयीं वाटू लागला होता पूर्वी चिमणाजीपंतांना त्रिंबकराव आपणाहून कमी दर्जाचे लेखी, पण आतां त्यांना त्रिंबकरावाच्या बरोबरीनें मान मिळू लागला होता. या मानाला कारण त्रिंबकरावच होता रुक्मिणी तेथे येण्याचा मोघ्यांविषयीं त्रिंबकरावाच्या आदराला आऊर येण्याशीं संबंध काय, हें इतर कोणालाही माहीत नसलें तरी गिरिजाबाई तें पूर्णपणें ओळखून होती तशांत त्रिवर्ग मोघ्यांना अत्यंत जबाबदारीच्या व निकडीच्या कामासाठीं उत्तर हिंदुस्थानांत पाठविण्याचा नवा विचार नुकताच त्रिंबकरावाला सुचला होता, त्यावरून त्याच्या मुळाशीं दुर्वासनाचें काळेंबेरें असावें अशी अटकळ गिरिजाबाईनें केली होती जर ती अटकळ खरी झाली, त्रिंबकरावानें रुक्मिणीला एकटी असहाय पाहून गांजण्याचे मनांत आणलें तर त्या बिचारीची काय अवस्था होईल, व अशा संकटकाळीं तिचें रक्षण करण्याला काय उपाययोजना करावी, ही चिंता गिरिजाबाईच्या मनाला लागून राहिली होती.

निदान बाजिरावाशीं उपस्थित करण्यात आलेल्या तंटयाच्या मुळाशीं तरी परस्त्रीचा अभिलाष नसेल अशी गिरिजाबाईची समजूत होती पण एके दिवशीं रात्रीं कांहीं गोष्टी तिनें आपल्या कानानीं ऐकल्या, त्यावरून तिची तीही समजूत साफ बदलून गेली. ती कशी व कां तें आपणाला पुढे कळेलच.

## प्रकरण सोळावे

# 'चिंती परा तें येई घरा !'

त्या रात्रीं त्रिंबकराव दाभाडे शुक्रतीर्थ येथील आपल्या भव्य वाड्यात तुरुकताजखान, बडेखान, गैबखान, शिवाजीपंत व बळवंतराव मोघे, मानसिंगराव टोके इतक्या मंडळींसह पेशव्याच्या बाबतींत पुढे काय धोरण ठर वावयाचे याचा विचार करीत बसले होते. आज इतक्या निकडीनें ही वाटाघाट करण्याचे कारण असे की, दाभाड्याच्या वतीनें गुजराथेत व खानदेशात जागोजागी तलासावर असलेल्या चिमणाजीपंत मोघे, पिलाजी गायकवाड, उदाजी पवार, मालोजी पवार, कुंवर बहादुर पवार, आनंदराव पवार, कंठाजी कदम बांडे, रघूजी कदम बांडे, वगैरे मंडळींकडून जासूद तक्रारी घेऊन रोजरोज येऊ लागले होते कीं, पेशवे व त्याचे हस्तक ठायींठायीं लूटमार व बखेडे करतात, तरी त्याच्या बंदोबस्तासाठीं सैन्य व पैसा पाठवा. एका बाजूनें ही अशी चिंता करण्याजोगी स्थिति असतानाच दाभाड्याच्या काहीं खास गुप्त बातमीदारानी पेशवे आपण होऊन त्याच्या भेटीला येत असल्याची बातमी आणली होती. इतर बातमीदाराचे राहो, पण त्रिंबकराव दाभाड्याचे बंधु यशवंतराव व बाबूराव याच्या मार्फत मयाजी गायकवाड–पिलाजी गायकवाडाचा पुत्र ही दुसरी बातमी घेऊन आल्याने तिला विशेष महत्त्व होतें. एरव्हीं त्या बातमीला विरोधक अशा बातम्याही अनेक होत्या. अहमदाबादेकडील एका बातमीदाराने बातमी आणली होती की, बाजीराव पेशवे अहमदाबादेंत अभयसिंगाची भेट घेण्यासाठी आले आहेत. दुसऱ्या एकानें ते पावागडाकडे दुर्जयसिंगाला भेटून त्याच्यासह बडोद्याच्या रोखानें चाल करून येण्याच्या विचारात आहेत अशी बातमी आणली होती, तिसऱ्या एकाने अशी बातमी आणली होती की, पेशवे व निजाम याच्या भेटीगाठी होऊन त्याच्यात तह करण्याचे ठरले देखील, चौथ्याने तर डभई बडोद्याच्या आसपास प्रत्येक डोंगरातून ठायीं ठायीं पेशव्याचें सैन्य दबा धरून बसले असून ते सावि सापडताच एकदम गिल्ला करणार अशी बातमी आणली होती, अशा बातम्यावर बातम्या इतक्या वरच्यावर त्रिंबकरावाच्या कानीं येत होत्या कीं, त्यातल्या खऱ्या कोणत्या व खोट्या कोणत्या, याचा निर्णय करणें फारच अवघड होतें. ह्या बातम्याचा निष्कर्ष

काढून काय ती निश्चित उपाययोजना ठरविण्यासाठीं आज त्रिंबकराव दाभाडयानीं सर्व मोठमोठया मंडळीला मेजवानीच्या निमित्तानें एकत्र जमविले होतें.

मेजवानी सुरू असता व नंतरही आपसात ह्या बातम्याबद्दल एकसारखी भवति न भवति चाललीच होती. एका एकाने म्हणावें कीं, पेशव्यानींच आपल्या निरनिराळ्या हस्तकामार्फत ह्या बातम्या पसरवून आपणाला चकविण्याचा उद्योग आरंभिला असला पाहिजे, त्यावर विश्वास ठेवण्याचें कारण नाहीं. तुरुकताजखान व बडेखान यानीं निजामाच्या वतीने सांगितले कीं, निजाम बाजिरावाशीं गर आजच्या काळात तह करावयाला तयार होईल, हे अगदींच अशक्य! त्या दोघा सरदाराना अशी घमेंड होती की, आपणासारखे पराक्रमी सरदार अल्लाच्या कृपेने निजामाला लाभले असता व त्याना दाभाड्यासारखा दोस्त मिळाला असता ते बाजिरावाशी तह काय म्हणून करतील? बंगषाचा सरदार गेंबखान यानें स्वतः दुर्जयसिंगाचा धुव्वा उडविण्यात यशस्वितेने पुढाकार घेतल्यामुळे त्याला तर दुर्जयसिंग परत वर डोकें काढीत आहे हे ऐकून इतकी थट्टा वाटली कीं, ज्याचें नाव तें! त्यानें विजयमदाच्या भरात त्या बातमीदाराची तर चांगली हजेरी घेतलीच, पण त्रिंबकरावाच्या त्या बाजूच्या ज्या कोणा सरदारानें त्या बातमीदाराला पाठविलें होतें; त्याचीही टर करण्याला कमी केले नाही. अभयसिंग व बाजीराव याची भेट होणे शक्य नाही व भेट झाली तरी त्यांचे एकमत होणे कालत्रयींही शक्य नाही, असें त्रिंबकराव दाभाडयाचे मत पडले. त्यानीं आपणावरून अभय-सिंगाची पारख केली, पण त्रिंबकरावाचें मत तिघाही पठाण सरदारांना रुचले नाही. ते एकमतानें म्हणाले, 'हिंदु तेवढा काफर! अभयसिंग व बाजीराव हे एक होऊन स्वार्थासाठीं काय करतील व काय नाही याचा नियम नाहीं'.

ते तिघे पठाण सरदार एवढें बोलूनच थांबले नाहींत. त्यांनीं अभयसिंग हा बादशहाचा नोकर असून बादशहाला अप्रिय असणाऱ्या हिंदुपदपादशाहीला पोषक अशी दोस्ती बाजिरावाशीं करतो, ह्या राजद्रोहाच्या गुन्ह्याबद्दल त्याला शिव्याची लाखोली वाहिली. गेंबखान तर आवेशाच्या भरात बोलून गेला, 'मी जर वजीर अगर बादशहा असतों, तर असल्या काफराना माझ्या राज्यांत सुभेदाराचीच काय, पण शिपुडर्याचीही नोकरी दिली नसती. मीं काफरांवर काडीचाही विश्वास टाकला नसता'. ह्या त्याच्या आवेशयुक्त भाषणाबद्दल तुरुकताजखान व बडेखान यांनीं त्याची थट्टा केली, "म्हणूनच अल्लानें तुम्हांला बादशहा अगर वजीर केलें

नाहीं" त्रिबकराव दाभाडयांना ती काफराची निंदा बरीच झोंबली विशेषतः अभयसिंगावर राजद्रोहाचा आरोप करण्यांत आला, तो ऐकून तर त्रिंबकरावांना वाटले, 'आपणाला अनुलक्षून तर गबखान हे बोलत नसेल ना ? कारण आपणही आपल्या छत्रपतींशीं प्रतारणा करूनच हा उद्योग आरंभिला आहे' गैबखानाने अभयसिंगाचे निमित्त करून हिंदूंना अशी कांहीं शिव्यांची लाखोली वाहिली की, त्रिबकरावांनी म्हणूनच ती सहन केली व म्हणूनच त्यांचे साह्यक शिवाजीराव व बळवंतराव मोघे, मानसिंगराव टोके ह्या स्वाभिमानी माणसांच्या सर्वांगाचा भडका उडाला असताही त्यांना त्रिंबकरावाच्या शब्दावर मुळींच बोलतां येईना

असो अखेर भवति व भवति होऊन 'पेशवे भेटीला येत आहेत' एवढी एकच बातमी विश्वसनीय ठरली ती विश्वसनीय ठरण्याला कारण, त्या खाशा मंडळींची मैफल चालली होती त्या दरम्यान् भडोचहून त्रिंबकरावांचा आणखी एक विश्वासू बातमीदार बातमी घेऊन आला, 'पेशवे आपल्या कबिल्यासह तेथें येऊन पोचले असून त्यांनी नर्मदेच्या पलतीरावर तंबू ठोकून तळ दिला आहे. त्यांची आपणाला भेटावयाला येण्याची इच्छा आहे असें दिसते'

"पेशव्यांबरोबर त्यांचा कबिलाही आहे ?" त्रिंबकरावाने उत्सुकतेने विचारले

"होय सरकार !' बातमीदार नम्रपणे उत्तरला

"कबिला म्हणजे त्यांची ती अस्मानकी बिजली मस्तानीही त्यांच्याबरोबर आहे काय ?" गबखानाने विचारले हा प्रश्न विचारतांना तो मनापासून गालातल्या गालात हसला असेल, पण त्याच्या दाढीमिशीच्या जजाळांत त्याच्या हास्याच्या लकेऱ्या कोणालाही दिसू शकल्या नाहींत

गैबखानाने सर्व सोडून प्रथम मस्तानीचीच चौकशी केली, हे पाहून बळवंतराव मोघ्याने त्याला खोचिकपणे विचारले, "सरदारसाहेब ! तुम्ही सर्व सोडून पेशव्या-च्या जनानखान्याचीच चौकशी चालविली आहे, याचा अर्थ काय ? तुम्हांला पेशव्याशीं लढावयाचे आहे, कीं त्यांच्या जनानखान्यातल्या बायकांशीं ?"

बळवंतरावाचा हा सडेतोड प्रश्न ऐकून सर्वांनाच थोडा वचक बसला. त्यातल्या त्यांत गैबखानाचा चेहरा तर जणुं कोणीं पायपोस मारल्यासारखा झाला. त्रिंबक-रावाचेही तोंड खर्रकन् उतरले कारण बळवंतरावाने जो वाग्बाण फेकला तो त्याची इच्छा असो अथवा नसो, गैबखानाचें हृदय विद्ध करून त्रिंबकरावांच्या

हृदयात घुसला होता. गैबखानाच्यापूर्वी पेशव्यांच्या कबिल्याची चौकशी त्यांनींच केली होती

" बस्स, बस्स ! ही एक बातमी मात्र खरी !" बडेखान आपल्या काळ्याभोर दाढीवरून हात फिरवीत ऐटीने म्हणाला, " पेशवा आम्हाला शरण येऊ पहात आहे, ही बातमी खरी "

" आणि बाकीच्या साऱ्या बातम्या एकजात खोट्या !" गैबरखान आपले गेलेले अवसान पूर्ववत् आणून म्हणाला, " असें पहा, पेशवा जर आपणाला शरण येऊं पहात आहे, तर तो तिकडे अहमदाबादेला अभयसिंगाला भेटावयाला कशाला जाईल ? आणि सेनापतिसाहेब ! दुर्जयसिंगाला मदत करण्याला जात आहे अशी बातमी पाठविणारा तो तुमचा दीडशहाणा सरदार कोण हो ?"

" चिमाजीपंत मोघ्यानीं ती बातमी पाठविली आहे " त्रिंबकराव म्हणाले

" बेवकूफ !" गैबखान एकदम आपले टपोरे डोळे गरगर फिरवीत ऐटीनें म्हणाला, " बिल्कुल बेअकली अदमी ! ह्याला पेशवा म्हणजे काय निजाम वाटतो, की बगष वाटतो,—"

" कीं गैबखान वाटतो ? पेशवा म्हणजे असा शेर त्या मूर्ख मोघ्याला वाटतो तरी कोण ?" तुरुकताजखानाने गैबखानाच्या तोंडचे वाक्य पुरें केलें तुरुकताजखान खंवचटपणाने बोलला असला तरी धोपटमार्गी गैबखानाच्या काहीं तें लक्षांत आलें नाही तुरुकताजखानाने आपणाला शेर म्हटलें, एवढ्यावरच तो खूष मोघ्याची निंदा ऐकून बळवतराव व शिवाजीराव यांना मात्र राग आल्याची स्पष्ट चिन्हें त्याच्या चर्येवर दिसूं लागलीं. पण ते बोलले मात्र नाहींत

याप्रमाणे इतर सर्व बातम्यांची वासलात लावण्याच्या कामीं गैबखानानें मोठीच धिटाई व चतुराई दाखविली. त्रिंबकरावानीं मात्र त्याला मनात मूर्ख समजून व त्या त्या बातमीदारांना एकीकडे घेऊन आपण योग्य ती तजवीज करीत असल्याचें सांगून परत पाठविले.

" सेनापतिसाहेब !" गैबखान दाभाडयांनीं आपल्या बातमीदारापाशी दिलेलीं आश्वासनें ऐकून म्हणाला, " असले कसले हो तुमचे सरदार हे ? नुसतें आपापल्या हद्दींचेंही यांना रक्षण करता येत नाहीं, बाजीराव आला असें ऐकतांच यांची घाबरगुंडी उडते, असल्या भित्र्या भागूबाईपेक्षां आम्हां मुसलमानांच्या औरतीदेखील जास्त शूर असतात !"

" खानसाहेबांना नेहमी औरतीच दिसतात पण हा औरतीचा हव्यास मोठा वाईट ! तोच वेळीं दगा द्यावयाचा ! " किंचित् ओठ चावीत बळवतराव म्हणाला

बळवतरावाचे मोजके शब्द, पण ते गैबखानाला वचक उत्पन्न करावयाला पुरले, व सर्वांचीं सैरावैरा धावणारीं डोकी ताळ्यावर येऊन मूळ मुद्द्याचा विचार करू लागलीं बाजीराव पेशवे भेटीला येणार हे आता निश्चित झालेच होतें त्याचा आणखी तपास करण्यासाठी सयाजी गायकवाडाला तिकडे रातोरात रवाना करण्यात आलें पण त्या बातमीविषयीं शंका घेण्याचे वस्तुतः कोणालाच कारण भासले नाही ते आल्यावर सर्व मंडळीनें त्याच्याशीं कसें वागावयाचें याविषयीं बराच खल झाला पण पुढे कोणी काय करावयाचे, याविषयीं एकवाक्यता कांहीं होईना एका बाबतींत मात्र सर्वांची एकवाक्यता झाली, ती अशी कीं, आपल्या इभ्रतीला शोभेसा तह करावयाचा तर पेशव्यांना नामुष्की पत्करान घ्यावी लागेल व पेशवे त्याला तयार होणार नाहींत, आणि मराठशाहीच्या इभ्रतीच्या अठरा बयादा पुढें करून पेशवे मराठा राजवटीच्या इतर सरदारांच्या हक्कसंबंधात ढवळाढवळ करण्याच्या आपल्या अधिकारांना कायमपणा आणू पहातील तर तें आपणाला रुचणे शक्य नाही अर्थात तडजोड अशक्य ! एवढें मात्र येथें ध्यानीं ठेवावयाचे की, सर्वानुमते होणाऱ्या ह्या वाटाघाटींत बळवतराव व शिवाजी राव मोघे यांचे अंग नव्हतें मानसिंगराव टोकेही त्या वाटाघाटींत कांही भाग घेत नव्हते पण त्यांचें मत कोणी विचारीतही नव्हते असो, तडजोडीचा याप्रमाणें बोजवारा झाला तर पेशव्यांना आल्या पावली सुखरूपपणे माघारे जाऊ द्यावयाचे, कीं त्यांना कैद करावयाचें, की ह्या जगातून अजिबात त्याचा काटा काढावयाचा, याबद्दल मात्र दाभाडे व पठाण सरदार यांच्यात मतभेद झाला मोघे, मानसिंगराव टोके, आता मात्र बोलते झाले त्याचें मन बाजिरावाच्या इभ्रतीला अथवा जीविताला कशाही परिस्थितींत कोणत्याही प्रकारचा धक्का लागू नये असें पडलें खुद्द त्रिंबक रावाचे मत असें कीं, पेशव्यांनी आजवर आपली जी मानखंडना केली आहे, तिचा बदला म्हणून आपण त्याचें शीर आपल्या पायावर नमतें करणार, व तें तितकें नमत नसले तर मात्र वेळीं वखतीं तें छाटावयालाही कमी करणार नाहीं बडेखान, गैबखान, तुरुकताजखान वगैरे पठाण सरदारांचें मत त्रिंबकरावांच्या मताहून फारसें भिन्न नव्हतें. पण त्यांना बाजीराव कैद होऊन स्वतःच्या हातीं सांपडावयाला हवे होते. 'त्यांना मग आपण मुसक्या बांधून सुभेदारांकडे नेऊ,

त्याच्या पायावर त्यांना लोटांगण घालावयाला लावून नंतर दिल्लीला बादशहाकडे घेऊन जाऊ, आजवर त्यांनीं ज्या ज्या मोगल सुभेदाराचा अपमान केला आहे, तितक्याच्या पायावर त्यांना नाक घासावयाला लावूं, आणि अखेर मुसलमान करून सोडून तरी देऊ किंवा ते मुसलमान व्हावयाला राजी न झाल्यास त्यांना ठार करू' असे महत्त्वाकांक्षाचे मजल्यावर मजले चढविण्यात ते पठाण सरदार आपल्या अक्कलहुषारीची खैरात करीत होते ! त्या सरदाराना इतकी ईर्षा स्वतः-च्या धन्यांच्या–निजाम किंवा बादशहा यांच्या इभ्रतीसाठीं किंवा स्वत.च्या धर्मा-साठीं केवळ सुचली होती असें नाही, त्या प्रत्येकाला कोणत्याना कोणत्या मोहिमेत बाजिरावानी किंवा त्याच्या लोकांनीं पराजित करून व अन्य तऱ्हांनींही त्याचा फजीतवाडा केला होता त्या फजितीचा सूड त्याना केव्हातरी घ्यावया-चा होता तसा सूड घेण्याची वेळा आपल्या आयुष्यात कधीं तरी उगवेल असें त्याच्या ध्यानी मनीं किंवा स्वप्नीदेखील नव्हतें निजामासारख्या बिलंदर कावे-बाजालाही ज्यांनीं पाणी पाजलें होते, बंगष, सरबुलंदखान वगैरे मोगल सुभेदारांचे दात ज्यानी त्यांच्याच घशांत मोठ्या चतुराईने कोंबले होते, ते बाजीराव पेशवे कधीं काळीं गोगलगाय बनून आपल्या हातीं सापडतील ही कल्पना तरी कोणाला कशी सुचावी ? पण ती कल्पनातीत गोष्ट आज प्रत्यक्ष स्वरूपांत येणार अशीं लक्षणे दिसू लागताच आता काय करू व काय न करू असे त्याना होऊन गेल्यास नवल नाही.

अखेर ही पेशव्याची शिकार साधावयाची असे ठरले, तरी ती खरोखर कोणीं साधावयाची हा प्रश्न त्या बैठकीपुरता तरी सोडवावयाचा तसाच राहून गेला त्याला कारण मुख्यतः बळवंतराव मोघे झाला बळवंतरावाला बाजिरावाच्या हिकमती-पराक्रमाची चांगली ओळख असल्यानें ते कोणत्याही परिस्थितींत अशा कैक खानाना व दाभाडयांना पुरून उरतील असा त्याला पूर्ण भरवसा वाटत होता त्याला त्या मंडळीच्या वल्गना ऐकून हसू आले. तें त्रिंबकरावानीं पाहिले व विचारले, "बळवंतराव ! तू का हसलास ?"

"उगाच !"

"उगाच नाहीं, खरें काय तें सांग"

"मी हसलों अशासाठीं कीं, बाजीराव पेशवे तुमच्या हातीं सांपडतील तेव्हांच्या ना ह्या गोष्टी ? त्यांना देखील बुद्धिबळाचे डाव चांगले खेळतां येतात. आपले बेत

इतके चवाठयावर मांडण्याइतके ते भोळे नाहीत पूर्वेकडे जातों असा बोभाट करून पश्चिमेकडे सरळ जाता जाता प्रतिपक्षाच्या डोळ्यात धूळ फेकण्याची कला त्यानाही चागली अवगत आहे म्हणून म्हणतो, ते बातमी मिळाल्यासारखे येऊ द्या तरी! त्यापूर्वीच हवेंत मनोरे बाधण्यात तात्पर्य काय?"

"एकूण तुमचा अजून पेशव्याकडे ओढा दिसतो!" त्रिंबकराव संशयानें म्हणाले

"आणि मला वाटते, हेच आपले बेत पेशव्याना कळवून सावध करणार असतील!" तुरुकताजखान म्हणाला

"असल्या बेभरंवशाच्या लोकाना सेनापतींनी कशाला जवळ केलें न कळे!" गैबखान म्हणाला

"हा आमचे सारे बेत पेशव्याना कळवीत नसेल कशावरून? हा पेशव्यांचा हेरच असावा तोबा! तोबा!"

त्या तीनही पठाण सरदाराची अवस्था मेंढरासारखी होती त्याच्या अगीं ताकद भरपूर होती, पण अकलेची मात्र उणीव होती त्यामुळें कोणत्याही गोष्टी-वर त्या तिघातील जो कोणी पहिल्याने बोलेल, त्याची रीऽऽ चढत्या स्वरात दुसऱ्या तिघानीं ओढावयाची, हा क्रमच होता त्यांचा हा स्वभावविशेष त्रिंबक-राव दाभाडे व चिमणाजीपत मोघे ह्या उभयताच्याही पूर्ण परिचयाचा असल्याने त्या तिघानीं बळवतरावाविषयीं चढत्या क्रमाने सशय घेतला, तरी तें बळवतरावानें फारसे मनावर घेतले नाही पण त्याचे चुलते शिवाजीराव त्या बैठकींत होते, त्यांना तो अपमानसा वाटला बळवतरावाच्या सर्वांगाचा तिळपापड झाला. तो त्या तिघाचे मूर्खपणाचे प्रलाप शिवाजीपत व त्रिंबकराव यानीं निमूटपणें सहन केले असे पाहून तो ताड्कन् उठून उभा राहिला व रागारागानें उद्गारला, "काका! हे तिघे तुमच्यावर फितुरीचा उघड उघड आरोप करतात आणि तो तुम्ही मुकाट्यानें सहन करतां?" लगेच त्याने त्रिबकरावांकडे वळून विचारले, "आणि तुम्ही देखील अशा वेळी मूग गिळून स्वस्थ बसता? आश्चर्य आहे! आमची अशीच संभावना करण्यासाठीं तुम्हीं आम्हांला इकडे बोलावले काय? तसें असेल तर आम्हांला तुम्ही आतांच्या आतां माघारे जावयाला सांगा ह्या बैठकींत म्हणून मी ह्या दाढीवाल्यांच्या ह्या वल्गना मघांपासून ऐकून घेतों आहे. हेच शब्द जर त्यांनीं बाहेर उच्चारले असते, तर याना मी चांगली समज दिली असती."

त्या तिघाही पठाणांना मराठी भाषा नीटशी कळत नसल्यामुळे बळवंतराव

काय म्हणाला ते त्यांना नीटसें कळलें नाहीं पण त्याची क्रुद्ध मुद्रा व हातवारे पाहून तो आपणांविरुद्ध काहीं बोलत आहे एवढें मात्र त्यांनी तर्कानें ओळखलें. क्षणभर ते एकमेकांच्या कानाशी लागून कांहींसे पुटपुटले व लगेच तुरुकताजखान त्रिंबकरावाना म्हणाला, " हा मुलगा आम्हांला शिव्या देतो आहे वाटते ! "

" नाहीं ! तुमची पूजा बांधतो आहे ! " बळवतराव जोरानें उत्तरला

आता हें भांडण उगाच भलत्या थरावर जाण्याचा रंग आहे असें पाहून शिवाजीपंत व त्रिंबकराव यानीं बळवतरावाला 'हो ! हो !' करून आवरलें, व त्या तिघां पठाणसरदाराची कशीबशी समजूत केली त्यासाठी 'तो माझ्यावर रागावला, तुमच्याशीं त्याचा काहींच संबंध नाहीं' असें खोटेंही त्यांना बोलावे लागलें त्या खुलाशाने त्या तिघांचेंही समाधान झालें, व ते आपल्या दाढयावरून हात फिरवीत जरा शांत झाले

" सेनापतिसाहेब ! हाताखालच्या नोकरावरून असली बेइज्जत तुम्ही म्हणून सहन केली, आमच्या सारख्यानें असल्या मस्तवाल नोकराला तेव्हाच हातातील समशेरीने छाटून टाकले असतें " तुरुकताजखान म्हणाला

" मुर्गीसारखी याची मान चिरली असती ! " बडेखान मिशीला पाळ देत म्हणाला

" याचा खिमा करून दारच्या कुत्र्याना खिलावला असता ! " गैबखान दाढीवरून हात फिरवीत मान डोलवून म्हणाला

जे शब्द त्या तिघानीं उच्चारले, तेच शब्द त्याच क्षणाला बळवतरावाकडून त्याच्या बाबतींत प्रत्यक्ष आचरिले जावयाचे तो दातओठ खात त्यांच्यावर तुटून पडण्यासाठीं पवित्र्यावर उभा होता पण त्याला आवरण्याविषयीं त्रिंबकरावानीं शिवाजीपंताना खुणावलें, तेव्हा शिवाजीरावानीं त्याच्या हाताला धरून त्याला खालीं बसवीत त्याच्या कानात सागितले, " ते मूर्ख आहेत त्यांचें बोलणें तू तरी काय वेडयासारखें मनावर घेतोस ? "

शिवाजीपंत व त्रिंबकराव यांच्या शब्दाला मान देण्यासाठीं बळवंतराव खालीं बसला पण बसता बसता स्वतःच्या मनाशीं म्हणाला, " थाबा गुलामानो ! तुम्ही नुसती बकबक करतां, पण वेळ आली म्हणजे मी तुमची खाशी खोड मोडली नाहीं तर नांवाचा बळवंतराव मोघे नव्हे ! "

हें भांडण आतां कोणत्या थराला जातें अशाविषयीं शिवाजीपताची छाती

धडधडत होती. त्यानीं बळवंतरावाला बाहेर जावयाला सांगितलें पण तो कांहीं जागचा हलेना. आता त्या तिघा खानास कसे एकदा बाहेर काढावें ही चिंता त्यांना होती, ती देवानें दूर केली रात्रौ नमाज पढण्याची वेळ झाल्याची सूचक अशी गावांतील मशिदीमधील मुल्लाची आरोळी ऐकूं येतांच तिघेही खान आपोआपच तिकडे जाण्यासाठीं उठले

ते तिघे खान बाहेर जातात न जातात, तोंच पहारेकऱ्यानें येऊन मुजरा करून त्रिंबकरावाना वर्दी दिली, " कोन्हेरराम कोल्हटकर बाहेर आले आहेत ते आपली भेट घेऊ इच्छितात "

" काय ? कोन्हेरराम आले आहेत ? " शिवाजीपंतानीं विचारलें, " ते या वेळीं इकडे कसे आले ? कीं पेशव्यांची स्वारी येथे येऊन पोंचली देखील ? "

त्रिंबकराव शिवाजीपंताच्या प्रश्नाला कांहींच उत्तर न देतां पहारेकऱ्याला म्हणाले, ' जा त्याला आत पाठवून दे "

" हें काय ? तुम्ही इकडे कसे ? चिमणाजीपंताबरोबर तुम्ही कामगिरीवर गेलां नाहीं का ? " कोन्हेररामाने आत येताच शिवाजीपंत व बळवंतराव यांना पाहून विचारलें लगेच तो बळवंतरावाला म्हणाला, " वा ! बळवंतराव ! तुमची बहीण आणि तुमचे मेहुणे यानीं तुमच्या खाल्ल्या घरचे वासे मोजावयाला खाशी सुरवात केली आहे "

" खोटें ! साफ खोटें ! माझी बहीण असें कधींही करणार नाहीं. आणि कृष्णरावही अशा वांकडया वाटेने जाणारा गडी नाहीं " बळवंतराव अभिमानपूर्वक उत्तरला

" पण ज्या गोष्टी मीं प्रत्यक्ष डो यांनीं पाहिल्या, कानांनीं ऐकल्या व स्वतः अनुभवल्या, त्याच मी आता बोलतों आहें हातचीं काकणे आरशांत पाहण्याची आवश्यकता नाहीं." कोन्हेरराम पूर्ववत् निक्षून उद्गारला

" तसे असेल तर ती माझी बहीण नव्हे व तो माझा मेहुणा नव्हे." बळवंतराव उद्गारला.

" असें म्हणतां म्हणतां तुम्हीदेखील उद्यां त्यांना सामील होऊन त्यांच्याप्रमाणेच खाल्ल्या घरचे वासे मोजूं लागाल " कोन्हेरराम म्हणाला

" आम्ही कोंकणस्थ नाहीं, कऱ्हाडे आहों. असलीं दगलबाज माणसें आमच्या जातींत जन्माला येत नाहींत " बळवंतरावानें सडेतोड उत्तर दिलें.

" बरें आहे.आपण मागाहून त्याचा विचार करूं " कोन्हेरराम त्रिंबकरावाकडे वळून म्हणाला, " सेनापतिसाहेब ! मला आपणापाशीं कांहीं खासगी बोलावयाचें आहे "

" बरें आहे. तुम्ही आतां जा " त्रिंबकराव त्या दोघाही चुलत्या-पुतण्यांना म्हणाला, " आणि हें पहा, खानसाहेबांसारख्या मोठ्या लोकांशीं अमळ अदबीनें वागत जा " ते दोघेही बाहेर निघून गेल्यावर त्यांना चार पावलें पोंचवून येऊन त्रिंबकराव कोन्हेररामाला म्हणाले, " सांग आतां, काय खबर आणलीस ? आणि इतके दिवस-दिवस कां महिने तुझ्याकडून चिठीचपाटी देखील नाहीं, ती कां ? "

" सांगतों." कोन्हेरराम आजूबाजूला पहात म्हणाला, " इथे आजूबाजूला कोणी नाहीं ना ? "

" कोणी नाहीं " असें म्हणत त्रिंबकराव बैठकीच्या दालनाच्या आतील दालनाचा दरवाजा उघडून पाहूं लागला तो इतका वेळ आत बसून गिरिजा सर्व संभाषण ऐकत होती, ती चट्कन् दरवाजाआड जाऊन उभी राहिल्यामुळें त्याला दिसली नाहीं

" आपणाला माझें पत्र मिळालें नाहीं ना ? मीं तें सयाजी गायकवाडामार्फत आपणाकडे पोंचतें करण्याची व्यवस्था केली होती पण मागाहून तिकडे जे अनर्थ घडून आले, त्यावरून तें पत्र आपणाला पोंचलेलें दिसत नाहीं "

" नाहीं. तें पत्र कांहीं पोंचलें नाहीं. पण सयाजी पधरा दिवसापूर्वी आला, व त्यानें तिकडची इतर खबरबात मात्र मला सांगितली बरें, तिकडे काय काय अनर्थ झाले ? "

कोन्हेरराम जो दसऱ्याच्या दिवशीं भर दोन प्रहरी पुण्याहून कावेरीबाईसह निघाला, तो मजल दरमजल करीत आज तेथे येऊन पोंचला होता त्यानें बाजिरावाच्या गोटातील बित्तबातम्या त्रिंबकरावाना निवेदन करण्याला सुरवात केली. त्यानें प्रथम विचारलें, " सेनापतिसाहेब ! आपणासाठीं मी आणि माझे बंधु यांनीं आजवर कसकशा यातना सहन केल्या, याची आपणाला कल्पनाही नसेल भास्कररामानें आपलें पत्र महाराजाना नेऊन दिलें, म्हणून पेशव्याचा त्याच्यावर इतका घुस्सा झाला कीं, त्यानीं त्याला हद्दपारच केलें होतें. पण मी तेव्हां मस्तानीचा खासगी कारभारी होतों, मी घरांतल्या बायकांकडून वशिला लावून त्याला बचावलें."

" तें मला पूर्वीच कळलें आहे. पण तुझा पेशव्याच्या खाजगींत प्रथम शिरकाव कसा झाला ? "

"तो वृत्तान्त सांगत बसलों तर त्याला सारी रात्र अपुरी पडेल प्रथमपासून काशीबाईसाहेब व मस्तानी ह्या सवतीसवतींची मर्जी संपादन करण्यासाठीं मला काय काय खटपटी लटपटी कराव्या लागल्या, तें माझें मी जाणे!"

"पण इतक्या खटपटी-लटपटी केल्यासारखी कामगिरी झाली का?"

"कामगिरी झाली नाहीं का? आजवर अगदी अंतःपुरातल्या पेशव्याच्या अंतरंगातील देखील बातम्या मी आपणाला कळवीत आलों, तें मी व भास्करराम याच्या सतत प्रयत्नाखेरीज थोडेंच साधलें?"

"त्या बातम्याविषयीं मी तुला विचारीत नाहीं"

"तर मग?"

"त्या गोष्टीविषयीं —कोणत्या बेर?"

"आलें ध्यानी, आले ध्यानीं"

"मग? तो डाव साधला का?"

"सांगतों पण गिरिजाबाईसाहेब इथे जवळपास कुठें नाहीत ना?"

"कोणी नाहीं सांग काय तें."

"सेनापतिसाहेब! मस्तानीला वश करून आणणे आपणाला वाटतें तितकें सोपें नाहीं."

"हीच महत्त्वाची बातमी मला सांगावयास तूं एथवर धडपडत आलास का?"

"सबूर! सेनापतिसाहेब! जरा सबूर करा तर खरी! आपण मस्तानीसाठीं जितके उतावळे झाला आहां, तितक्या उतावळेपणानें जर मी वागलो असतो, तर मीच काय, पण माझ्या अस्थि देखील मग ह्या पवित्र शुक्रतीर्थापावेतों आल्या नसत्या तरी इतक्या सावधपणाने मी वागत होतो, तरी शेवटीं डाव थोडासा हुकलाच मीं आपणाला देण्यासाठीं पत्र लिहून सयाजीकडे पोंचतें केलें, त मधल्या मध्येच माझ्या विश्वासातील पेशव्याच्या एका दासीच्या गाफीलपणामुळें एका हरामखोर दासीच्या हातीं पडलें, व सारा बोभाटा झाला तेवढें जर झाले नसते, तर या क्षणाला नव्हे, यापूर्वी कितीतरी दिवस मस्तानी आपली दासी होऊन समोर उभी असलेली आपणाला दिसली असती."

'ही भूतकाळातील गोष्टींची भुतावळ इथें काय गाडावयाची आहे? पुढें काय झाले ते सांग"

" सागतों सारें काहीं सागतों मस्तानी स्वसतोषानें पेशव्याना सोडील हें शक्य दिसत नाहीं —"

" हेंच सागण्यासाठीं इतके आढेवेढे घेतलेस का ? "

" पुन्हा तेच ! मला बोलू तरी द्याल कीं नाहीं ? "

" ती खुषीने यावयाची असती तर तिथें तुझी काय आवश्यकता होती ? तिला मग कटिखाद्यावरून थोडीच आणावयाची होती ? "

" हें पहा, आपण मला बोलू देणार नसाल तर मी अगदी गप्प बसतो सेनापतिसाहेब ! एवढ्या मोठ्या माणसानें य कथित एका स्त्रीच्या बाबतींत इतका उतावळेपणा दाखविणें बरें नाहीं."

" तू पुढें काय सागणार तें सांग "

" मला भर दसऱ्याच्या दिवशीं देशत्याग करणे प्राप्त झालें हें आपणाला माहीत आहेच "

" होय पुढें ? "

" त्याच दिवशीं माझ्या नशिबासारखा माझ्या कारस्थानाचा सुगावा पेशव्यांनाही लागला व मस्तानीलाही लागला " आपण कोन्हेररामाच्या घरी अद्वातद्वा बोलल्यामुळें कारस्थान जास्त उजेडात आले, ही स्वत.च्या नामुष्कीची गोष्ट तेवढी मोठ्या शिताफीने लपवून कोन्हेरराम म्हणाला, " सयाजी भोळा पडला, म्हणून असा प्रसग आला. मला कैद करून जन्मभर कैदेंतच कुजत ठेवण्याचा मस्तानीचा बेत होता,—कीं ती मला याहून काहीं जबर शासन करणार होती, कोण जाणे ! पण मी माझ्या बायकोसह भर दुपारींच मोठ्या शर्थीनें तेथून निसटलो आता पुढे काय कारस्थान करावे, याचा विचार चालू होता, तोंच दुर्जयसिगाकडून बाजीराव पेशव्याकडे जावयाला निघालेला एक जासूद पुण्याच्या वेशीबाहेर मला भेटला."

" एकूण बाजीराव दुर्जयसिंगाच्या मदतीला येणार हे तेव्हांपासूनच ठरले होते तर ? "

" अर्थात् ! तो जासूद चागला माझ्या आहारीं आला होता. त्याला मथवून मी त्याच्या जवळचे विनतिपत्रही काढून घेणार होतों पण तेवढ्यात पेशवे व मस्तानी यांचे लोक मला पकडण्यासाठीं हिंडत हिंडत तेथे आले तेथून मीं कसा बसा पळ काढला, व तो जासूद मात्र त्याच्या हातीं सापडला "

" तू पळ काढलास ही मर्दुमकीची गोष्ट मला सांगतो आहेस वाटतें ! "

" सेनापतिसाहेब ! ही गोष्ट मर्दुमकीची नाही, पण दूरदर्शीपणाची झाली यात शंका नाहीं त्या एका गोष्टीमुळेच आज मस्तानी आपणाला मिळणें शक्य झालें आहे."

" ते कसें काय ? "

वास्तविक गोवर्धन नांवाचा जासूद जो पेशव्याच्या सैनिकाच्या हातीं लागला होता, तो कोन्हेररामाच्या हलगर्जीपणामुळेही नव्हे व चतुराईमुळेंही नव्हे. पण कोन्हेररामानें तेही यश आपणाकडेच ओढून घेतलें. तो म्हणाला, " मला तो जासूद जेव्हा नीटसा वश होईना, तेव्हा मी मनात म्हटलें, ही ठिणगी पेशव्याच्या अंतःपुरात जाऊन पडलेली बरी."

" पण त्या जासुदाचा पेशव्याच्या अंतःपुराशी काय संबंध ? "

" संबंध असा की, तो जासूद प्रथमपासूनच मस्तानीची चौकशी करीत होता. मी मस्तानीचा कारभारी हें त्याला माहीत होते, म्हणून त्यानें माझ्यापाशीं आपलें अंतःकरण उघडे केलें मस्तानी पूर्वी बंगषाच्या ताब्यात जैतपूरच्या किल्ल्यात असल्या वेळेपासूनची तिची व आपली दोस्ती आहे असे तो जासूद म्हणाला. तो नुसते एवढेच म्हणून थांबला नाहीं, त्याने आपल्या डाव्या हातावर मस्तानीनें स्वतःचें नाव स्वतःच निर्मल बंधुप्रेमाची खूण म्हणून गोंदलेले दाखविलें "

" पण त्याला मस्तानीशी काय करावयाचे होते ? "

" तेच तर मला कळेना पण मी बोलून बोलून त्याच्या पोटांत रिघून त्याला वश मात्र करून घेतलें होते—होतें का ? तो जासूद मला वश आहेच. त्याच्या साह्यानें मी मस्तानीला पेशव्याच्या नजरेआड महालाबाहेर काढून इकडे आणण्याची योजना केली होती "

" पण ती योजना फसली ! असेंच ना ? "

" फसली कसली ? दुप्पट-दसपट—शतपट फलद्रूप झाली तो जासूद पेशव्यांच्या लोकांच्या हातीं पकडला जाऊन मस्तानीच्या महालांत गेला, हें फार छान झालें आग मुद्दाम लावून लावता आली नसती तितकी आपोआप लागली."

" ती कशी काय ? "

" तो जासूद ओळखीचा म्हणून मस्तानी त्याच्याशीं सलगीने वागली. तो मार्गांत माझ्याशी बोलताना बाजिरावाच्या शिपायानीं पाहिलें होते, त्याचा पराचा

पारवा होऊन तो जासूद माझा साथीदार अर्थात् पेशव्याचा शत्रु ठरला त्याला पकडून शासन करण्यासाठीं म्हणूनच चिमाजीअप्पा तावडतोब मस्तानीच्या महालीं गेले, तेव्हा मस्तानीनें त्याला 'जुबेदा दासी' हें नाव देऊन व स्त्रीचा वेश देऊन आपल्या अतर्महालात लपवून ठेविले पुढें पेशवे मोहिमेवर निघाले, त्याच्याबरोबर मस्तानीही निघाली —"

"म्हणजे ? आपल्या अंतर्महालात चोर शिरलेला पेशव्याना अजून कळला नाहीं वाटतें ? आणि अजून तो जासूद मस्तानीच्या दासीच्या स्वरूपात तिच्याबरोबर आहेच ना ?"

"हो ! तो अजूनही मस्तानीच्या सहवासात आहे पेशव्यांना कितीतरी दिवसपर्यंत ह्या भानगडीची दाद नव्हती. पण मी हस्तें परहस्ते ही बातमी पेशव्याच्या कानावर जाईल असें केले, त्यामुळें पेशव्याचे मस्तानीशी वितुष्ट येऊन त्यानीं तिचा त्याग केला आहे"

"काय ? पेशव्यानी मस्तानीचा त्याग केला ?"

"होय"

"आणि हें तुला कसें माहीत ?"

"कसें माहीत याचा अर्थ काय ? मी प्रथमपासूनच ह्या गोष्टीच्या तलासावर आहें तो जासूद पकडला गेला तेव्हा मी जो तेथून पुण्याच्या वेशीवरून निसटलों तो बायकोला पाडवगडावर पोचती करून पुन्हा पेशवे वगैरे मंडळीच्या हालचालीवर नजर ठेवण्यासाठीं माघारा पुण्याला आलों. भास्करराम पुण्यात बातम्या काढावयाला बसला होताच त्याने मला पुण्यांतला प्रकार सागितला. शिवाय पेशव्याच्या घरची बायका मडळी माझ्या लोभातील आहेच त्यांना पेशव्यामागचे मस्तानीचे शुक्रकाष्ठ जितकें लौकर सुटेल तितके पाहिजेच आहे त्या मडळींपाशी 'मस्तानी व गोवर्धन याचा पूर्वीचा दाट स्नेह असावा मस्तानीनें त्या स्नेहाची खूण म्हणून आपले नाव गोवर्धनाच्या डाव्या हातावर गोंदून ठेविले आहे' अशी चुगली करताच त्या गोष्टीचा बोभाटा बाजिरावाच्या कानांपर्यंत जावयाला मुळीच वेळ लागला नाही खरें पाहू जाता चुगली करणाराही मी व त्या चुगलीचा बोभाटा करणाराही मीच. पेशव्याच्या घरचीं कळसूत्री बाहुली मला नाचवावयाला मिळाल्यावर मीं त्याचा पुरेपूर उपयोग करून घेतला नसता, तर नावाचा कोन्हेरराम कसला ! पेशव्यांचा स्वभाव माझ्या पूर्ण परिचयाचा आहे त्या

स्वभावाला पटेल असे माझा निरपराधीपणा सिद्ध करणारें पत्र मीं काशीबाई-साहेबाकडून पेशव्याना लिहून घेतलें, व त्याच पत्रांत मस्तानी व गोवर्धन यांचा संबंध ध्वनित केला आणि शेवटीं 'कोन्हेररामाला पुन्हा नोकरींत रुजू करून घ्यावें' असाही मजकूर काशीबाईसाहेबाकडून लिहविला. तें पत्र पेशव्याना ते मोहिमेच्या मार्गावर असता मींच स्वतः नेऊन दिले"

"आणि पेशव्याना ते सारें खरे वाटले?"

"अलबत्! खरें का वाटणार नाहीं? मी पेशव्याना स्पष्ट सांगितले कीं, 'मस्तानीबाईसाहेबांच्या ह्या भानगडी मला माहीत झाल्यावर मला त्याचा वीट आला व मी पेशव्याना ह्या गोष्टी सांगणार असें मस्तानीबाईसाहेबाना स्पष्ट सांगितले, त्यामुळे त्यांनीं व त्यांच्या कैवाऱ्यानीं माझ्यावर भलभलती कुभाडें रचून माझा उठावा केला' आणि गोवर्धन व मस्तानी यांचा घनदाट स्नेहसंबंध असल्याची खूण म्हणून मस्तानीनें गोवर्धनाच्या हातावर गोंदलेले स्वतःचे नाव पहा असेही सांगून टाकले पेशव्याच्या मनात मस्तानीविषयीं संशय उत्पन्न व्हावयाला एवढी कारवाई पुरली त्यांनीं मस्तानीला ह्या गोष्टींचा जाब विचारला असेल, तिला त्याचें समाधान करता आले नसेल, आणि अखेर याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला पेशवे मस्तानीचा मार्गातच त्याग करून मोहिमेवर पुढे निघून गेले"

"हा प्रकार केव्हां झाला?"

"नुक्ता आठ दिवसापूर्वी पण एवढ्यानेंच काय झालें आहे? सेनापतिसाहेब! आपणाला आश्चर्य वाटेल, पण मी जो आज इकडे आलो आहें, तो पेशव्याच्या वतीनें तुमची समजूत घालण्यासाठीं"

"अरे वाः! इतकी पेशव्यांची तुझ्यावर बहाल मर्जी झाली?"

"हें काय विचारतां? बरें; नुसत्या पेशव्याचीच मर्जी माझ्यावर बहाल झाली असें नाहीं, मस्तानीही आतां माझी मनधरणी करून मला मानू लागली आहे पेशव्यांकडे तिच्या वतीनें चार भले शब्द बोलून त्या दोघांचे प्रेम पूर्ववत् जुळवून देण्याची कामगिरीही मस्तानीनें माझ्यावरच लोटली आहे, व तीही 'हें काम तुमच्याशिवाय अन्य कुणाच्या हातून व्हायचें नाहीं' अशी मजपाशीं कबुली देऊन तात्पर्य, मस्तानीला आटोक्यात आणण्यासाठीं मला एवढा द्राविडी प्राणायाम करावा लागला. तिला मीं मुद्दाम 'तुमच्याविषयीं पेशवेसरकाराचें मन वळवून तुमच्या संसाराची पूर्ववत् घडी बसवून देतों' असें आश्वासन देऊन आजवर झुलवीत

ठेविले आहे. तोही मोठाच तमाशा झाला बाजीराव मस्तानीचा त्याग करून निघून गेल्यावर मस्तानीला तें दुःख व तो अपमान सहन होईनासा झाला त्या भरात तिने एकदा नर्मदेच्या डोहात आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला पण तेवढ्यात मी अचानक तिथे गेलों, व कोण डोहात बुडत आहे म्हणून त्याला वांचविण्यासाठी डोहात उडी मारून त्या बुडत्या माणसाला वर ओढून आणले. पहातों तों ती मस्तानी!"

"मग ती सध्या कुठे आहे? तिला तू आपल्याबरोबर का आणली नाहींस?"

"नाही कशी? तिला मीं बरोबर आणली आहे. माझा विचार तिला थेट आपल्याकडेच आणण्याचा होता, पण मध्यतरीं पेशवे आपल्या भेटीसाठी भडोच ला यावयाचे आहेत अशी बातमी लागली, व मस्तानीनें त्याच्याकडे जाण्याचा आग्रह धरिला, तेव्हा तिच्या इच्छेला मान देऊन तिला मुद्दाम भडोचला घेऊन आलो, आता पेशव्याना भेटून त्याची समजूत करून तिला त्याच्या स्वाधीन मी करणार आहे—"

"मग—"

"सेनापतिसाहेब! असे उतावळे काय होता? मीं मस्तानीच्या डोळ्यात धूळ कशी फेंकली तें सांगितलें तिला तेथें दशाश्वमेध तीर्थावरच्या एका देवालयात जोगिणीचा वेष देऊन बसवून ठेविली आहे, व पेशव्याची समजूत घालण्यासाठीं म्हणून हा बाहेर पडून आलो आहें."

"बरें, आता काय केले म्हणजे मस्तानी आपल्या हस्तगत होईल?"

"पेशवे व मस्तानी याची पक्की ताटातूट झाल्याशिवाय मस्तानी आपल्या हाती लागावयाची नाही. यास्तव तेवढा आपल्या वाटेंतील काटा आपण कसेंही करून दूर केलाच पाहिजे. पेशवे उदयीक आपल्या भेटीला येणार आहेत असें मीं ऐकले आहे खरे का हें?"

"हो! खरें माझ्या कानींही तशीच बातमी आली आहे"

"तेव्हा आपण त्यांचा योग्य तो समाचार घ्या म्हणजे झालें पेशवे कैद झाल्याशिवाय मस्तानी खरी उघडयावर पडावयाची नाहीं ते इकडे कैद झाले, कीं मग आपणाला अचानक त्या देवालयावर हल्ला करून मस्तानीला कैद करून आणतां येईल मात्र मी ह्या बाबतींत अखेरपावेतों नामानिराळा राहणार. कारण जसा आपणाला, तसाच निजामालाही मस्तानीचा अभिलाष आहे, व जसे आपण

मला मानतां, तसेंच निजामही मानतो मीं आपणाला, मस्तानी मिळवून दिली असे निजामाच्या कानावर गेल्यास मज गरिबावर त्यांची वृथा खप्पा मर्जी व्हावयाची"

"निजामाची खप्पा मर्जी झाली तर झाली! तुला निजामाशी काय करावयाचें आहे?"

"वा.! असे कसे म्हणता? जसे पेशवे आपले शत्रु आहेत, तसेच निजामाचे-ही शत्रू आहेत पेशव्याच्या अधःपातावर आमचा भाग्योदय अवलंबून आहे. पेशवे गोत्यात पडले,–मग ते कोणत्याही कारणामुळें का पडेनात–कीं निजामाच्या पदरीं मला मोठी मनसबदारी मिळणार आहे"

"एकूण तू शेवटीं निजामाच्या पदरी जाणार!"

"असेच नाही काही! आपण मला योग्य आश्रय दिला तर मी आपल्या पदरीं राहीन, व भास्करराम निजामाच्या पदरीं राहील त्या पुढच्या गोष्टी आहेत आजच काय त्याचे? प्रथम आपला डाव तर साधू दे! बरें आहे मी आता येतों मी आपणाला पुन्हा उद्या सकाळी भेटेन" असे म्हणून कोन्हेररामानें त्रिंबकरावाचा निरोप घेतला दरवाजा बाहेर गेल्यावर पुन्हा एकवार माघारा येऊन त्यानें त्रिंबक-रावाना बजावले, "सेनापतिसाहेब! एवढें मात्र ध्यानात ठेवा कीं, सिंह सापळ्यात कोंडल्याशिवाय आपली वडगत नाही. एरव्ही सिंहीण हाती लागावयाची नाही"

"ठीक आहे सापळा लावण्याचें काम तू केलें आहेसच, आतां त्याला कोंडा-वयाचे काम मी करतो पण काय रे! सिंह कोंडला गेला असें पाहून सिंहीण खवळून पिसाळली–तर?" त्रिंबकरावानी विचारलें

"त्याची काळजी आपणाला नको असें मी सांगितले ना? ती काय खवळते व पिसाळते? तिच्या नाकात वेसण घालून ती मी केव्हाच माझ्या हातीं ठेविली आहे मी नाचवीन तसे तिला नाचलेंच पाहिजे" असे कोन्हेरराम बढाईनें उद्गारला व निघून गेला

ज्याला मनुष्याच्या मनातील गोष्टी जाणण्याची कला अवगत आहे अशा कोणीं तेव्हा कोन्हेररामाला गांठून त्याच्या मनातील विचार जाणण्याचा प्रयत्न केला असता, तर त्याला कोन्हेररामाचे मानसोद्गार ऐकू आले असते, "सेनापतींना तर चेतवून दिलेंच आता प्रथम त्या पठाण सरदाराना भेटून त्याना चेतवून देतों व मोध्याचे कान फुकतों, कीं माझे काम झालें पेशवे! तुम्हीं माझा व माझ्या बधूचा

अपमान केला नव्हे काय ? कोल्हटकराचे पुत्र म्हणजे तुम्ही काय समजला ? हे दोन सिंहाचे छावे तुम्ही दुखविले आहेत, ते दबा धरून बसले आहेत व ऐनवेळीं ते तुमच्यावर झडप घालतील, याद राखून ठेवा ! त्या वेळी मी तुम्हाला माझी ओळख देईन मस्तानीला सेनापति बळकावो, निजाम पळवो, अगर आणखी कोणी वाटेचा चोर तिला घेऊन जावो मला माझ्या कारस्थानापुरता तिचा उपयोग झाला की माझें काम झाले आता त्या कृष्णरावाचा समाचार घ्यावयाचा तेवढा बाकी राहिला आहे. पेशव्यासभोंवार पेटविलेल्या ह्या वणव्यात तो आपोआपच जळून खाक झाला तर फारच छान होईल मग घुंगुरख्याला ठार करण्यासाठी तोफा डागण्याची आवश्यकता पडणार नाही पण आवश्यकच झाले, तर तेवढ्यासाठीं तोफा डागण्यालाही मी मागेपुढे पहाणार नाहीं"

कोन्हेरराम निघून गेल्यावर थोडा वेळ त्रिंबकराव स्वतःशींच पुढील योजनांचे मनन करीत बसले होते. त्याचा जीव जिला आपल्या शय्येची सोबतीण करण्यासाठीं तळमळत होता, ती मस्तानी प्रत्यक्ष स्वरूपात त्याच्या विलासमंदिरात येऊन दाखल होण्यापूर्वीच त्याना आपल्या कल्पनाशक्तीच्या जोरावर तिला समोर उभी केली होती व तिचें कोणत्या उपायानी आराधन केल्यावर ती प्रसन्न होईल या विषयीं त्याचे बेतावर बेत सुरू झाले होते

इतक्यात त्रिंबकरावाच्या बैठकखान्याच्या आतील दालनाचा दरवाजा उघडला जाऊ लागला त्रिंबकराव तिकडे पहातात, तो पुढील शब्द त्याच्या कानी आले, "ऐकलें का ? आपणाला ही जी दुर्वासना आठवली आहे, ती आपणाला रसातळाला नेण्याला कारणीभूत होईल 'चिती परा ते येई घरा' हा देवाघरचा न्याय आपण विसरू नये'

प्रकरण सतरावे

# गिरिजा कोठें गेली ?

ते शब्द गिरिजेचेच होते गिरिजेला पहातांच व तिच्या तोंडचे ते शब्द ऐकतांच एखाद्या चोराला मुद्देमालासह पकडल्यावर त्याची मनःस्थिति जशी गोंधळल्या सारखी होते, तशीच त्रिंबकरावांची अवस्था झाली पण आपणाला घाबरवून सोडणारी आपली सत्तेची बायकोच आहे असें पहातांच त्यांना धीर आला ते तिरस्कारपूर्वक तिच्याकडे पाहून म्हणाले, " गिरिजे ! इतक्या अपरात्रीपर्यंत तू का जागत बसली आहेस ? "

गिरिजा करुणस्वरान म्हणाली, " दुर्दैवाचा घाला केव्हां कसा पडेल याचा नियम नाही, म्हणून जागत्या डोळ्यांनी खडा पहारा करावा लागतो. बाकी, मी जागत बसूनही कांही उपयोग व्हायचा नाही हे मला माहीत आहे तरी पण माझा धर्म म्हणून मी आपणाला विनंति करते, आपण पापवासनांच्या भरी पडून निजामासारख्या घरभेद्याच्या नादी लागून आपल्या सर्वस्वाचे मातेरे करून घेऊ नये. आधीच देशद्रोहाचे पातक फार भयंकर, त्याला परस्त्रीच्या अपहाराची जोड मिळाली, की आपला नाश व्हायला वेळ लागणार नाही "

" तू आमचे सभाषण आडून ऐकत होतीस वाटते ? " त्रिंबकरावांनी विचारले हे एकदरीत नीट झाले नाही असे त्याच्या मनाने घेतले. पण गोष्ट होऊन गेली ती नव्हेशी थोडीच होणार होती ! आता कांही तरी थापा मारून गिरिजेची समजूत केली पाहिजे असे मनाशी ठरवून ते म्हणाले, " गिरिजे ! राजकारणा-साठी आम्हांला असे डावपेच करावे लागतात असल्या गोष्टी तुम्ही बायकांनी चोरून ऐकू नये, व ऐकल्याच तरी त्याचा विपर्यास करू नये."

गिरिजा म्हणाली, " होय मी आपले सभाषण ऐकले खरे, व ते चोरून ऐकलें. पण त्यांत माझा हेतु वाईट नव्हता, व मीं विपर्यासही केला नाही."

" मी केवळ स्रैणपणाच्या आहारी पडून मस्तानीची प्राप्ति करण्यासाठीं झटत असेन असे तुला वाटते का ? "

" आपण एकमेकाना आता कांही अपरिचित नाहीं आमचे गुणदोष आम्ही एकमेकांना चांगले कळतात.—"

" मत्सर ! मत्सर ! सवतीमत्सर तुम्हां बायकांच्या हाडींमार्शी खिळलेला असतो "

" याला मत्सरच पाहिजे असें नाही पूर्वजांच्या कीर्तीची ज्याला चाड आहे, मायदेशाचा ज्याला जिव्हाळा आहे, मनुष्यत्वाचा ज्याला अभिमान आहे, असा प्रत्येक जीव या वेळी माझ्यासारखाच तळमळेल काहीं झालें तरी कारणाशिवाय कार्य घडत नाहीं बाकी, मला आपल्या एखाद्या प्रियकरणीविषयीं मत्सर वाटला, तरी उपयोग काय ? आजवर अनेकदा असा मत्सर वाटला, त्याचा काय उपयोग झाला ? "

" होय ना ? हें तुला कळते ना ? " त्रिंबकराव मानखडित झाल्यामुळें चिडून म्हणाला, " तर मग तू ह्या घालमेली तरी कशाला करतेस ? "

" हे माझें कर्तव्य म्हणून करतें परस्त्रीचा अभिलाष करणाऱ्या कोणाचेंही आजवर जगांत भले झाले नाहीं असा अभिलाष धरणारानीं त्यापायीं आपला सत्यनाश मात्र करून घेतला महाराज ! पतिव्रताचा अभिलाष कोणाही पर-पुरुषानें कधीं धरू नये पतिव्रतेच्या एका शापवाणींत सारी सृष्टि दग्ध करण्याला पुरून उरेसें सामर्थ्य असते केवळ कनक व कान्ता याच्या मोहानें आपण आपल्या देशाच्या मानेवर सुरी उगारून आपल्या व आपल्या प्रतिपक्षांतील शिपायांच्या रक्तामासाच्या चिखलान रणागणावर धिंगाणा घालणार काय ? "

" बस्स ! ह्या उपदेशाच्या गोष्टी मला तुझ्या तोंडून ऐकावयाला नको आहेत. मी असा बायकाच्या तोंडाने पाणी पिण्यासाठीं जन्माला आलेला नाही. मीं एकवार तुला सांगितले आहे की, मला पेशव्यांवर सूड घ्यावयाचा आहे व तो मी शक्य तेवढया मार्गांनीं घेणार ह्या माझ्या निश्चयाआड जीं जी कोणी येतील त्यांना त्यांना कापून काढण्यालाही मी कमी करणार नाही."

" मग आपण मला पाहिजे तर खुशाल कापून काढा." गिरिजा त्रिंबकरावा-समोर गुढगे टेकून हात जोडून म्हणाली, " मी आपली सत्तेची बायको आहें, मला आपण खुशाल कापून काढा, पण जगात ज्याना तोल नाहीं अशा पापांची परवड रचण्याच्या भरी पडूं नका आपण जसा परस्त्रियाचा अभिलाष करतां तसाच लोकांनीं आपल्या स्त्रीचा अभिलाष केला तर तें आपल्याला रुचेल का ? आपण रागाला येऊं नये मी आपणाला चिडविण्यासाठीं हें बोलतें असें नाहीं. आपण म्हणाल कीं हें राज-कारण आहे, पेशव्यांवर सूड घेण्यासाठीं आपणाला हें सारें करावयाचें आहे. पण मी

म्हणतें, पेशव्यांवर सूड घ्यायचा तो तरी का ? त्यांनीं तरी आपले असें काय घोडे मारले आहे ! आपल्या देशद्रोही प्रयत्नाना आळा घालण्याला ते झटतात, हाच त्याचा अन्याय कीं नाहीं ? त्याला जर आपण अन्याय म्हणणार असाल, तर मी सांगतें, मीही प्रसंगविशेषीं तसा अन्याय करायला कमी करणार नाही मनुष्यानें धन-वैभवाची महत्त्वाकांक्षा धरावी, अवश्य धरावी पण स्वजनद्रोह, देशद्रोह, पर-स्त्रियांचा अपलाप, असलीं पातकें जोडून आजवर कधींच कोणाच्या महत्त्वाकांक्षा तडीला गेल्या नाहींत पेशवे व आपण यांच्यातील वाद योग्य आहे की अयोग्य आहे हा प्रश्न बाजूला ठेवला, तरी तो आपसात मिटवायचा सोडून त्या निमित्तानें मुसंडयासारख्या परक्याना आपण आपल्या घरात बोलावून आणता, याला काय म्हणायचें ? तुम्हा मराठ्यात आपसात फूट पाडून बादशाही सत्तेचा समध तुमच्या उरावर कायमचा बसविण्यासाठीं मोगलाना हा तुमच्या प्रेमाचा पान्हा फुटला आहे, हें आपणाला कसे कळत नाहीं ? "

" माझ्या लग्नाच्या बायकोने माझ्या कट्टया शत्रूची—पेशव्याची—बाजू घेऊन बोलावे हे मला सहन होणार नाहीं "

" आणि माझ्या पतींचा असा सर्व बाजूनीं अध पात होऊन त्या अध पाताच्या गर्तेत माझ्या उभयकुळींचे बेचाळीस पूर्वज गाडले जाऊन रौरव नरकाचे धनी व्हावे हें मलाही कधीं सहन होणार नाही "

' होय मी पातकें करणार मी अनत पातकें करणार माझा प्रतिकार कोण करूं शकेल ? "

" कां बरे ? आपला प्रतिकार परमेश्वर करू शकेल माझ्यासारखी अबलाही आपला प्रतिकार करू शकेल "

" तुझ्यासारख्या पतिव्रता स्त्रीला असे बोलणे शोभत नाहीं "

" पतीचा रगमहाल हेंच पतिव्रतेचें कार्यक्षेत्र अशी का आपली समजूत आहे ! तसें असेल तर ती आपली दिशाभूल झालेली आहे असें मी म्हणेन महाराज ! जगातील प्रत्येक पतिव्रतेचें अधिकारक्षेत्र आपण समजतां त्याहून फार मोठें आहे. आपण अस्सल मराठे गडी आहा आपण उमाबाई सासूबाईचे पुत्र आहा त्याना पतिव्रता म्हणतात, समजलें का ! त्यांची शिकवण मला आहे त्यांनीं किंवा माझ्या आईबापानींही पतिव्रता म्हणजे पतीची केवळ विलासदासी अशी पाति-व्रत्याची व्याख्या कोणी मला पढविलेली नाही. मी पतिव्रता आहें म्हणूनच

आपणाला निक्षून सागते की, मी आपणाला अशा अन्यायाच्या वाटेनें पाऊल देखील उचलू देणार नाही आपण जर त्या मार्गाने जाण्यासाठी पाऊल उचलले, तर आपल्या पायाना अशी—" गिरिजा त्रिंबकरावाच्या पायाना घट्ट मिठी मारून म्हणाली, "—अशी मिठी मारून आपणाला आवरून धरीन"

"आणि मीं तुला अशी लाथाडून लावली तर?" त्रिंबकरावानी गिरिजेला लाथेनें दूर लोटून विचारले, "मग तरी तू मुळुमुळु रडतच असणार कीं नाहीं? त्यापेक्षा प्रथमपासूनच तू आपला मान राखून घेतलास तर?"

"अशीच आपण माझी संभावना करणार ना?"

"होय. अशीच संभावना करणार"

"तर मग मीही मला परमेश्वर बुद्धि देईल तसे करीन" असे म्हणून गिरिजा डिवचलेल्या नागिणीसारखी तेथून फणफणत निघून गेली त्या रात्रीचे त्या दोघांचेही वर्तन नेहमीच्याहून निराळे होते गिरिजा आजवर कधीच इतक्या कठोरपणाने त्रिंबकरावासमोर वागली नव्हती, ती आज वागली, याचे कारण तिला आज त्रिंबकरावाचे दुर्वर्तन व त्याची कुटिल कारस्थाने असह्य झाली होती तसेच तिचा आजच्या शतांशानेंही राग त्रिंबकरावानीं कधीं सहन केला नव्हता, तो आज त्यानी सहन केला याचे कारण आजच्या इतकी त्यांची गुन्हेगारी मुद्देमालासह गिरिजेने पकडली अशी आजची ही पहिलीच वेळ होती

गिरिजा रागारागाने निघून गेल्यावर त्रिंबकराव बराच वेळपर्यंत त्या उभयता मधील कलहाचा विचार करीत होते गिरिजेचे उपदेशवजा सडेतोड बोल त्यांना मनांतून पटले होते पण मनाला पटलेल्या गोष्टी आचरणात आणण्याला मनुष्याच्या ठायीं एक प्रकारचा वृत्तीचा कणखरपणा पाहिजे असतो, तो त्याच्या ठायीं नव्हता. पापी माणसानाही पाप कोणतें व पुण्य कोणते, सत्कृत्य कोणते व दुष्कृत्य कोणते, हें कळत नाही असे नाहीं, त्याना सव काही कळते पण कळून वळते अशीं माणसें फारच थोडीं व कळून वळत नाहीं अशींच फार आणि जगांत नेहमीं सज्जनापेक्षा दुर्जनाचींच सख्या जास्त असते मनुष्यसृष्टीलाच हा नियम लागू आहे असे नाहीं, निर्जीवसृष्टीचें देखील असेच सृष्टीभर वृक्षलतांची घनदाट जगले पसरलेलीं दिसतात, त्यात कल्पलता व कल्पवृक्ष क्वचितच असावयाचे रानोमाळीं खाणी खोदल्या तरी एखाद्या खाणीच्या पोटींच रत्नें सापडावयाचीं

असो त्रिंबकराव बराच वेळ त्याच त्याच गोष्टींचा विचार करू लागले, तशी त्याची वृत्ति थोडथोडी पालटू लागली चुकून एखादा जलमेघ वाऱ्याच्या झोतासरसा निर्जल अरण्यात वहात जाऊन तेथे वर्षावा, त्याप्रमाणेंच त्रिंबकरावांच्या त्या उपरतीची अवस्था होती हें जरी खरें, तरी त्या क्षणाला त्याना वाटले कीं, 'गिरिजा म्हणाली ते खरें निदान तिची समजूत करून तिचा रोष दूर करण्यापुरतें तथ्य तरी त्यांत खास आहे'

लगेच त्रिंबकराव गिरिजेची समजूत करण्यासाठी म्हणून आपल्या महालात गेले पण तेथे गिरिजा नाही ! नोकराचाकरांपाशीं त्यांनीं चौकशी केली तरीही काही पत्ता लागेना ! "जाऊन जाणार कुठे ? सुटले केंस परत पाठीलाच शरण यायचे' अशी स्वतःची समजूत करून घेऊन ते तसेच अस्वस्थ चित्ताने झोपीं गेले पण झोंपही काही केल्या स्वस्थपणाने लागेना त्याच्या अंतःकरणात कर्तव्य व अकर्तव्य याचा झगडा सुरू होता 'पतिव्रतेच्या एका शापवाणीत सारी सृष्टि दग्ध करण्याला पुरून उरेसें सामर्थ्य असतें केवळ कनक व कान्ता याच्या मोहाने आपण आपल्या देशाच्या मानेवर सुरी उगारून आपल्या व आपल्या प्रतिपक्षातील सैनिकांच्या रक्तमासाच्या चिखलात रणांगणावर धिंगाणा घालणार काय ?' वगैरे गिरिजेचे शब्द शापवाणीप्रमाणे रणभेरींसारखे त्यांच्या कर्णरंध्रात धुमत होते "गिरिजा म्हणाली त्यांतही पुष्कळच तथ्य आहे" त्रिंबकराव स्वतःशीं म्हणाला, "या निमित्ताने मला परक्या मुसलमानांना आपल्या घरांत बोलावून आणावे लागलें. माझ्या वडिलानीं पेशव्यांच्या हातात हात घालून एकजुटीने ज्या दुष्ट मुसलमानाच्या सत्तेची पाळेमुळें खणून काढून मराठशाहीची इभ्रत वाढविली, त्याच सेनान्याचा पुत्र मी केवळ कनक व कान्ता याच्या लोभानें त्या शत्रूना मित्र मानून देव्हाऱ्यांतील देवांसारखे पुजू लागलों आहे असल्य। माझ्या इच्छा पातकी व पाशवी आहेत, त्याना परमेश्वर यश देईल काय ?.. .." असा विचार करतां करता पहाटेच्या प्रहरी त्रिंबकरावांचा अंमळ डोळा लागला. त्या तर्द्रीत त्यांना स्वप्न पडले जें ध्यानीं, मनीं, तेंच स्वप्नीं ! त्याला आणखी निराळे काय दिसावयाचें ?

उजाडते न उजाडते तोंच एका हुजऱ्यानें येऊन त्यांना बळेच भीत भीत हांक मारून जागे केले, नाहींपेक्षा रात्रीच्या मानसिक त्रासामुळे त्याना आणखी किती वेळ झोंप लागली असती कोण जाणे !

"काय रे ?" त्रिंबकरावाने त्रासिक स्वरांत विचारलें

"सरकार !" हुजऱ्या हात जोडून भिऱ्या आवाजांत म्हणाला, "निजामाकडून आलेल्या सरदाराचा आपणाला असा निरोप आला आहे कीं, पेशव्यांनीं भडोच येथें येऊन तळ दिला असून ते सकाळीं आपल्या भेटीला येणार असल्याची बातमी आली आहे त्या बाबतींत पुढचा विचार ठरविण्यासाठीं आपणाला त्यांनीं आताच्या आता बोलावले आहे"

"काय ? पेशवे माझा असा पाणउतारा करतात काय ? मी एवढा मोठा सेनापति असून हे पठाण सरदार देखील माझ्या भेटीला न येता मला आपल्या भेटीला बोलावतात ? आणि इतका अपमान सहन करून मीं याच्याशीं सहकार्य करावयाचें ?" याप्रमाणे स्वत.शी चडफडत त्रिंबकराव आपल्या बिछान्यावर उठून बसले व त्या हुजऱ्याला म्हणाले, "जा ! त्यानाच मीं इकडे बोलावलें आहे असे साग त्याच्या शब्दाप्रमाणे "जसा हुकूम सरकार !" असें म्हणून हुजऱ्या जाऊं लागला तो दरवाजाबाहेर जातो, न जातो तोंच त्रिंबकरावाच्या डोक्यात विचार आला, "नको एवढ्यानेंच त्या मिजासखोराचा अपमान व्हावयाचा व ते माझ्यावरच उलटावयाचे" लगेच त्यानीं त्या हुजऱ्याला हांक मारून माघारे बोलावून सांगितलें, "त्यांना उलट निरोप पाठव की, मी आताच येतों"

यावर पुन्हा 'जसा हुकूम' असें म्हणून हुजऱ्या त्याना मुजरा करून निघून गेला

अमळशानें त्रिंबकराव आपल्या शयनमदिरांतून बाहेर येतात, तोंच गिरिजाबाई-च्या सेवेंतील एका दासीनें एक पत्र त्यांच्या हातीं आणून दिले व सांगितलें, "आज पहांटेला बळवंतराव मोघ्यांनीं हे पत्र आणून दिलें व तें आपणाशिवाय दुसऱ्या कोणालाही देऊ नको असें सागितले तसेंच आपलें नाव सागूं नको असेही मोघ्यानीं सागितले"

त्रिंबकरावांनीं तें पत्र वाचले त्यांत पुढीलप्रमाणे मजकूर होता.

"मी आज आपणाला सोडून जात आहें मात्र याचा अर्थ मी आपला 'जन्मावेरीं त्याग करीत आहे असा आपण समजूं नये. लग्नगाठ ही जन्म-'गांठ असते, ती कोणाला तोडून तोडता यावयाची नाहीं व ती तोडण्याचा 'प्रयत्नही मी करणार नाहीं आज मी जी आपणाला सोडून जात आहें, 'ती आपणाला व आपल्या पूर्वजांना रौरव नरकापासून तारण्याची खटपट

'करण्यासाठीं जात आहें माझे पति या नात्यानें आपण जितके मला वद-
'नीय आहा, तितकेच आपण देशद्रोही व पातकी म्हणून मला तिरस्करणीय
'वाटता पति मार्गाचा आडमार्गानें जाऊ लागला तर त्याला ताळ्यावर
'आणण्याची जबाबदारी अर्धांगीवर असते. ती जबाबदारी ओळखून मी
'आपणाला ताळ्यावर आणण्यासाठीं जशी आजवर झटत आले तशीच
'यापुढेही झटत राहीन हे कार्य सौम्य उपायानी तडीला जाणे शक्य नाहीं
'अशी रात्री माझी खात्री झाली, म्हणूनच आवश्यक तेवढे स्वातंत्र्य मिळ-
'विण्यासाठी मला आपला त्याग करून जावे लागत आहे यापुढें ईश्वरकृपेनें
'सर्व गोष्टी नीट तडीला लागेपर्यंत व आपण पापाचरणापासून आणि देशद्रोहा
'पासून परावृत्त झालां अशी माझी खात्री होईपावेतो मी आपणाकडे येणार
'नाहीं, आपणाला भेटणार नाहीं, किंवा आपले माझे पति–पत्नीचे नाते
'ओळखणार नाहीं हा संसाराचा मोह मी माझ्या कर्तव्य-पालनासाठीं कोणत्या
'मर्यादेपर्यंत तोडू शकेन, याची आपणाला यथावत कल्पना यावी म्हणून
'आपल्या नावाने आजवर माझ्या कंठी झळकणारें मंगळसूत्र मी ह्या पत्रासोबत
'आपणाकडे पाठवीत आहे परमेश्वराची इच्छा असली तर तें मंगळसूत्र
'पुन्हा कंठी धारण करण्याची मंगलवेळा माझ्या आयुष्यात उगवेल जशी
'परमेश्वराची मर्जी असेल तसे होईल आपण माझा शोध करू नये, असें
'सांगण्याची आवश्यकता नाहीं कारण मी गेल्याने आपल्या मार्गातील एक
'काटा अनायासे दूर झाला असेंच आपणाला वाटेल, हे मी जाणून आहे.
'तरीपण मी आपणाला निर्वाणीचें सांगून ठेवते कीं, आपण माझा शोध
'केला तरी त्याचा काहीं उपयोग होणार नाहीं आपण दुर्वासनांच्या कर्दमा-
'तून वर येईपावेतो मी आपली कोणी नाहीं व आपण माझे कोणी नाहीं
'ईश्वर आपणाला सुबुद्धि देवो" **गिरजा**

  

तें पत्र वाचता वाचता त्रिंबकरावाच्या सर्वांगाचा संतापानें थरकाप झाला पत्र घेऊन येणारी दासी काहीं वेळ तेथे दरवाजाबाहेर उभी होती, ती त्रिंबकरावांनीं नरसिंहावतार धारण केलेला पाहून भीतीनें गांगरून तेथून निघून गेली रागाच्या पहिल्या तडाख्यांत समोर जे कोणी सापडेल त्याचीं शंभर वर्षें भरावयाचीं हें त्रिंबकरावाच्या सर्व नोकराना माहीत असल्यानें त्या दासीनें तो एकंदर चमत्कारिक

रंग पाहून तेथून हलकेच पाय काढला माडीचा जिना उतरून जातां जातां तिला त्रिंबकरावाची गर्जना ऐकूं आली, "वाड्यातील नोकर चाकर फितूर असल्या-शिवाय ह्या ढालगज कुलटेला त्या भटुरग्याच्या मगरूर पोराबरोबर वाड्याबाहेर खास जाता आले नसते ह्या नोकराची हाडे मोडलीच पाहिजेत" नोकराचीं हाडें मोडण्याचा त्रिंबकरावाचा मानस ऐकतांच त्या दासीची जिन्यातल्या जिन्यात बोबडी वळली व पाय लटपटू लागले तिला वाटलें कीं, आता धनीसाहेब चौकशीसाठीं येणार व त्याच्या दृष्टीला प्रथम आपण दिसताच त्याच्या कोपाची वीज प्रथम आपल्याच माथा कोसळून आपली राखरागोळी होणार ती हे सकट टाळण्यासाठी मनातून परमेश्वराची करुणा भाकीत गर्भगळित वृत्तीने मागें पुढे पहात एकदाची जिना उतरून खालीं गेली जिन्याच्या टोंकाला जाताच अमळ तिच्या जिवात जीव आला ती जिन्याजवळच्या चोर-दरवाजानें पलीकडील दालनात जाऊन लपणार होती तिला त्या दरवाजाच्या आत जाता जाता त्रिंबकरावांच्या तोडचे आणखी शब्द ऐकूं आले, "फितूर ! फितूर ! माझी बायको माझ्या शत्रूला फितूर झाली ! ती त्या गोंडस पोरावर भाळून त्याचा हात धरून निघून गेली अर्थात आता ती मला मेली ! हें पेशव्या चेंच कारस्थान असावे हरामखोर ! माझ्या बायकोला फुस लावून पळवतो काय ! बस्स ! मी याचा पुरेपूर सूड घेणार ! तो पोर व तो पेशवा हातीं सापडताच मी त्याचे मुड्दे पाडणार व त्या मुड्यांवरून पाऊलवाट करून पेशव्याच्या मस्तानीला आणि मोध्याच्या सुनेला त्या पाऊलवाटेनें मी माझ्या जनानखान्यात ओढून आणणार ! हे पत्र कोणी बरें लिहिले असेल ? त्या चाडाळणीला काही लिहिता येत नाहीं, व तें त्या मोघ्याच्या पोरानें आणून दिलें, त्याअर्थी हें काम त्या पोराचेंच असावे रात्रीच्या त्याच्या एकदर रोखावरून तो शत्रूला फितूर झाला असावा यात सशय नाहीं त्याच्या बायकोवर माझा डोळा आहे याचा त्याला सुगावा लागला असेल, म्हणून त्याचा सूड घेण्यासाठीं त्याने हा नीचपणाचा मार्ग पत्करला असेल ह्या अपराधाबद्दल त्याला शिक्षा म्हणून त्याला मी कैद करीन व त्याच्या डोळ्यासमोर त्याच्या बायकोची विटबना करून नतर तिच्या काचोळीचा गळफास त्याच्या गळ्याला लावून त्याचा प्राण घेईन आणि ती कुलटा ! मला दगा देऊन पळून गेली काय ? पण ए लुच्चभवाने ! तू पळून जाऊन जाशील तरी कुठें ? तुला मी सप्तपाताळातून शोधून आणीन, व

तू ज्याच्या नादाने फितूर होऊन पळालीस, त्याच्या आतड्याच्या माळा तुझ्या गळ्यात घालून नगरभर तुझी गाढवावरून धिंड काढून तुला ठार करीन. आजपासून तुझा व माझा संबंध तुटला !" हे शेवटचे शब्द उच्चारताना त्यावर त्रिंबकरावानीं विशेष जोर दिला, व त्या आवेशासरसें आपल्या हातातील गिरिजेचें मंगळसूत्र कच्कन् तोडून जिन्याच्या दरवाजाबाहेर फेंकून दिले दासीला तें मंगळसूत्र तोडलेलें दिसले नाहीं, पण त्रिंबकरावाचे प्रतिज्ञावजा बोल मात्र तिला ऐकूं आले संतापाच्या भरात आपण आपल्या बायकोचे मंगळसूत्र तोडले, म्हणजे तिच्या सौभाग्याची इतिश्री करून स्वतःचा मरणलेख स्वतःच्या हातानी लिहिला, अशी शंका तेव्हा त्याच्या मनाला शिवली देखील नाहीं. त्यावेळी सर्वभक्षक काळ बाजूला उभा राहून विषादपूर्वक हसून म्हणाला असेल, " जशी इच्छा तसें फळ !"

त्रिंबकराव तसाच संतापाने हातपाय आपटीत जिन्यावरून धडाधड पावलें टाकीत खाली आला, तों त्याचा दास–दासीवर्ग ठिकठिकाणीं भयभीत चित्ताने चोरासारखा उभा असलेला त्याला दिसला त्रिंबकरावाच्या त्या अकाडताडवा मुळें त्या दासदासींनीं एवढा मात्र कयास बांधला की, आपली धनीण कोणाच्या तरी नादाने पळून गेली मस्तानीवर त्याचा डोळा आहे हे सर्वांना पूर्वींच ओझरतें ऐकून माहीत होतें. त्या माहितींत 'मोघ्याच्या सुनेवरही सेनापतिसाहेबाचा पापी डोळा पूर्वींपासून आहे' ह्या नव्या शोधाची भर मात्र पडली. तेवढ्या तुटपुंज्या वेळात त्या दासीनें धनीसाहेब अमक्या कारणासाठीं अतोनात संतापले आहेत व त्यानीं प्रळय मांडला आहे ही बातमी सर्व सेवकवर्गात फैलावून सोडली होती. गिरिजा कशी पळाली याविषयीं त्रिंबकरावानें प्रत्येक दास–दासीपाशीं कसून चौकशी केली, पण त्या बिचाऱ्याना जर काहींच माहीत नव्हते, तर त्याच्या तोंडून उत्तर तरी काय मिळणार ? नाहीं म्हणावयाला पहांटेच्या वेळीं बळवंतराव वाड्यात आला होता व त्याच्याशी गिरिजाबाईसाहेब काहीं बोलत होत्या येवढा सुगावा मात्र लागला, व तोही त्रिंबकरावाच्या परमविश्वासातील सयाजी गायकवाडाच्या तोंडून त्यामुळें त्रिंबकरावाच्या पूर्वसंशयाला जोड मिळून त्यानीं सयाजीला आज्ञा केली, " सयाजी ! ही कामगिरी मी तुझ्यावरच सोंपवितों तू त्या दोघाचाही तपास लावलाच पाहिजेस तसेंच मोघ्यांच्या घरची एकूण एक मंडळी आजच्या आज कैद झाली पाहिजे."

" मोघ्याची सून रुक्मिणी देखील ? " सयाजीनें विचारलें त्यानें हा प्रश्न मुद्दाम खोंचून कां विचारला, हे आपणाला पुढे कळेलच.

" रुक्मिणीदेखील " त्रिंबकराव गर्जून उत्तरला, " रुक्मिणी नुसती कैद होऊन भागावयाचें नाहीं, ती माझ्या जनानखान्यात येऊन पडली पाहिजे " दाभाड्याच्या घरांत–प्रत्यक्ष त्याच्या अंतःपुरांत फितुर करणाऱ्या मोघ्यांना हें कळून आलेंच पाहिजे कीं, ही गोष्ट इतकी सोपी नाहीं "

" सेनापतिसाहेबांच्या हुकुमावरून मी त्या छेलछबेलीला पकडतो तर खरी ! मग ती मला वश होते कीं सेनापतींना वश होते तें पाहीन " असें स्वगत पुटपुटत सयाजी त्रिंबकरावांना म्हणाला, " ठीक आहे. मी सेनापतींच्या आज्ञेबरहुकूम वागेन, पण गिरिजाबाईसाहेबांना पकडणें—"

" बस्स ! माझी आज्ञा ! एक अक्षरही माझ्या आज्ञेवर कोणी बोलता उपयोगीं नाहीं. गिरिजा माझी पत्नी असली तरी ती अपराधी ठरल्यावर मीं एखाद्या सामान्य गुन्हेगार स्त्रीपेक्षां तिला जास्त किंमत देणें हा गुन्हा होईल हा गुन्हा जो कोणी करील तोही मूळ गुन्हेगाराचा साथीदार समजून तितक्याच कठोर शिक्षेला पात्र होईल "

## प्रकरण अठरावें

# हा काय चमत्कार?

त्रिंबकरावाची आज्ञा म्हणजे आज्ञा! त्यावर कोणीही एक शब्द देखील बोललेला त्याला खपत नसे सयाजी जो बोलला, तो त्रिंबकरावाच्या गळ्यातला ताईत म्हणून बोलला, व तें त्याचे बोलही वरकान्ती होते. वास्तविक ही कामगिरी विशेषत: बळवतराव, गिरिजा व रुक्मिणी याना पकडण्याची कामगिरी—आपल्या वाटयाला आल्यामुळे त्याला मनांतून परमसतोष झाला होता सयाजी त्याच क्षणीं 'जशी आज्ञा' म्हणून आपल्या कामगिरीवर निघून गेला जाता जाता तो मनात म्हणाला, "सेनापतीणबाईनाही वश करून घेण्याची ही छान सधि देवानें आपणाला आणून दिली"

सयाजी बाहेर जातो न जातो, तोच कोन्हेरराम तेथें आला व म्हणाला, "सेनापतिसाहेब! तुरुकताजखानसाहेब वगैरे मडळी आपली वाट पहात बसले आहेत. पेशवे आता भेटीला येणार, त्याबाबत त्याना आपणाशीं काहीं बोलावयाचें आहे आपणाला सयाजीने निरोप सागितला नाही का?"

"सयाजीने निरोप सांगितला पण कोन्हेरराम! हे तिघेही दाढीवाले आज इतके फारसे शेफारले आहेत? इकडे माझ्या भेटीला यावयाला त्याचे पाय मोडलेत का?" यावर कोन्हेरराम काही उत्तर देत नाही, असे पाहून त्रिंबकराव पुन्हा म्हणाले, "पेशव्याच्या व आमच्या चुरशीत माझ्यावर कुरघोडी करण्याचा त्याचा विचार आहे का?"

"सेनापतिसाहेब! ते सरदार कसेही वागले तरी या वेळीं त्यांच्याशी इतके बाकून वागण्यात आपलाच तोटा व्हावयाचा पेशव्याचा नि:पात करून मस्तानी-ला हस्तगत करण्यापुरता तरी आपणाला त्याचा उपयोग करून घ्यावयाचा आहे. तोपर्यंत तरी आपण त्याच्या लहरी साभाळल्या पाहिजेत मला आपण विचाराल तर मी सागेन की, या वेळीं ते म्हणतील त्या गोष्टी आपण निमूटपणे मान्य करा मीं इतके दिवस पेशव्याच्या पदरीं राहून कारस्थानें चालविलीं तीं कशीं बरें?"

त्रिंबकराव क्षणभर चितन करून म्हणाले, "हा तुझा कोंकणस्थी कावा मला तितकासा रुचत नाहीं. मी सरळ लढाऊ वृत्तीचा मराठा गडी आहे एक घाव

दोन तुकडे हें माझें ब्रीद आहे. पण तुझ्या ह्या उपाययोजनेंत कांहीच तथ्य नाहीं असें मात्र मी म्हणत नाही आजकालचें राजकारण असल्या डावपेंचांचेच आहे एरव्हीं परवां पडशी खांद्यावर टाकून वर घाटीं आलेले कोंकणस्थ श्रीवर्धनकर भट भिक्षुक आज पेशवे–छत्रपतींचेही छत्रपति कसे बनले असते ? "*

"सेनापतिसाहेब ! आपण जरी कोंकणस्थाना नांवें ठेविलीं, तरी परिणामी कोंकणस्थी कावाच फलदायी होईल हें ध्यानीं ठेवा एवढ्यानेंच काय झालें आहे ? आपणाला अजून पेशव्यांसारख्या कोकणस्थाशीं सामना द्यावयाचा आहे, तो अशा कावेबाजपणाशिवाय तडीला जावयाचा नाहीं त्यांत आपण विजयी झाला तरी पुढें आपणाला आपल्या गळ्यासभोंवार पडलेल्या निजामाच्या मिठीतून आपली मान सोडवून घ्यावयाची आहे, त्यासाठीं आपण फार सावधगिरीनें वागले पाहिजे. मोगलांना आपण सरळवृत्तीचे समजतों, त्यांना गनिमी कावा माहीत नाहीं हें खरें, पण एक तर मोगलानीं आजवर कैक शतकांपासून आपला हिंदुस्थान पादाक्रांत केला, तो आपल्या मनगटमस्तीच्या तरवारीच्या जोरावर पादाक्रांत केला ते मित्र म्हणून प्रथम ज्याच्या ज्याच्या गळ्याला मिठी मारीत आले, त्याचा त्याचा तरवारीनें उघड उघड गळा कापून स्वतः त्याच्या घराचे घरधनी बनले त्यांचाच आज आपणांला पेशव्यांची खोड मोडण्याच्या कामीं उपयोग करून घ्यावयाचा आहे पण पेशवे जमीनदोस्त झाल्यावर हेच उपरे मदतगार प्राप्तीचा सारा वांटा आपलाच असें म्हणावयालाही कमी करणार नाहींत. इतके त्यांना शेफारू देता कामा नये. बरें, त्यांना तुम्ही आज दुखविलें तर ते पेशव्याशीं फितूर व्हावयालाही कमी करणार नाहींत निजामाचे सरदार आहेत ते, त्याच्या तालमेंत ते तयार झालेले आहेत. आज इतके दिवस निजामानें दक्षिणेंत राहून पेशव्याशीं झगडून त्याच्या साऱ्या युक्त्या आत्मसात् करून घेतलेल्या आहेत. कल्पना करा, आपण त्या पठाण सर-

* 'श्रीवर्धनकर भट पडशी व पंचा खांद्यावर टाकून कोंकणांतून देशावर आले, व पेशवे झाले' असे निरर्गल प्रलाप काढून आपली जिव्हा विटाळणारे पेशव्यांचे निंदक जसे आज आढळतात, तसे ते पूर्वीही होते. पण पेशव्यांची परमोज्ज्वल यशोगीतें 'कादंबरीमय पेशवाई'मधून आजवर गाइलीं गेलेलीं ज्यांनीं वाचलीं आहेत अगर पुढें जे वाचतील, त्यांना ह्या आक्षेपांतील फोलपणा आपोआप कळून आला असेल व येईल.

दाराना बिथरविलें, तर ते पेशव्याशी फितूर होऊन त्याच्याशीं तह करणार नाहींत कशावरून ? पेशवे आपणाला घरचे भेदी समजून आपला नि:पात करण्यासाठीं निजामाशीं मैत्री करण्याला कमी करणार नाहीत त्यासाठीं ते निजामाच्या सत्तेची वाढ होण्याला भरपूर अवसर देतील, बादशाही सत्तेलाही वेळी मान्यता देतील, काय वाटेल तें करतील —"

" इतका विश्वासघात निजाम किंवा त्याचे हे सरदार करू शकतील ? "

" यात काय सशय ? सेनापतिसाहेब ! मी हे हवेतले बोल बडबडतों आहे, असे आपण समजू नका सारी रात्र मी त्या सरदाराच्या गोटात राहून त्याचा अंदाज घेत होतों, त्यावरून मी हे अनुभवाचे बोल बोलतो आहे."

" तुझीं त्याच्याशी काय काय खलबतें झालीं ? "

इतक्यात पठाण सरदाराच्या गोटातून त्रिंबकरावाना पुन्हा बोलावणे आलें त्रिंबकरावानीं पुन्हा कपाळाला आठ्या घातल्या, व बोलावणे घेऊन आलेल्या दूता-पाशीं काहींतरी तुटकपणाचा निरोप सागण्यासाठीं त्याचे ओंठ पुटपुटू लागले तें कोन्हेररामानें ओळखलें व त्रिंबकरावाना सावधगिरीची सूचना दिली, " छे ! छे ! सेनापतिसाहेब ! इतक्या स्वाभिमानाने वागण्याची ही वेळ नव्हे जोंपर्यंत नवसाला पावणारा देव आपणाला पाहिजे असतो, तोंपर्यंत आपण दगडाचा देव करून त्याला भजले पाहिजे आपला कार्यभाग आटोपल्यावर मग तुम्ही त्या दगडाची आपल्या दिवाणखान्याला पायरी का बनवाना ! " तो लगेच त्या दूताकडे वळून म्हणाला, " सेनापतिसाहेब आता इतक्यात येत आहेत —त्याना कोन्हेरराम आपणाबरोबर घेऊन येत आहेत असे साग जा " दूत गेल्यावर तो पुन्हा त्रिंबकरावाना म्हणाला, " सेनापतिसाहेब ! आतां अगोदर माझ्याबरोबर तिकडे चला पाहू ! मी तुम्हाला आमच्या रात्रीच्या खलबताविषयीं ब-याच गोष्टी सागणार आहें. त्या आपण जाता जाता बोलूं "

" चला " असें म्हणून त्रिंबकरावानीं एका हुजऱ्याला आपले कपडे आणा-वयाला सागितले तेवढ्या वेळात आपलें मुखमार्जन वगैरे घाईघाईनें उरकून घेण्या-साठीं ते वाड्याच्या मागील बाजूच्या उद्यानातील पुष्करिणीवर जाता जाता म्हणाले, " त्या खलबताची बातमी मला शक्य तितकी लवकर पाहिजे याचें कारण—" त्यांनीं आजूबाजूला पाहिले तों सभोंवार थोड्या फार अंतरावर दासदासी उभीं असल्याचें त्यांना दिसून आलें, त्याबरोबर कोन्हेररामाला म्हणाले, " माझ्याबरोबर जरा पुष्करिणीवर ये. तुला मी एक महत्त्वाची गोष्ट सांगणार आहें."

ही महत्त्वाची गोष्ट कोणती असावी हे दासदासींनी तेव्हाच ओळखले त्या लोकाना कोन्हेररामाचा परिचय नव्हता, पण त्याच्या एकंदर सलगीच्या बोलांवरून तो कोणी तरी त्रिंबकरावाच्या गळ्यातला ताईत असावा, त्याच्या मार्फत कोणा एखाद्या सुंदर स्त्रीचा त्रिंबकरावाना लाभ होण्याचा संभव असावा, हें त्या लोकानी तेव्हाच ओळखलें कारण आठ घटकात त्रिंबकरावाची मर्जी संपादन करण्याचें ह्या जगात दुसरें कोणतेंही साधन नाहीं हें त्याना माहीत होतें इतके असूनही नेमका त्या वेळीं कोन्हेरराम आल्यानें सर्व दासदासींना आनंद वाटला याचें कारण त्यामुळे त्रिंबकराव त्याच्याशीं बोलण्यात गुतून गेले व त्यामुळें यजमानीणबाई बेपत्ता झाल्यानिमित्त दासदासींवर संक्रात यावयाची, कोणाची नोकरी जावयाची तर कोणाच्या पाठीची मार खाऊन चामडी लोळावयाची टळली

पुष्करिणीवर जाताच त्रिंबकरावानीं गिरिजाबाई बेपत्ता झाल्याचा सर्व वृत्तान्त अगदीं मनमोकळेपणाने अथपासून इतिपर्यंत कोन्हेररामाला निवेदन केला, व शेवटी म्हटले, "आता मला असा संशय येऊ लागला आहे की, रागाच्या भरात माझी बायको माझ्यावर सूड घेण्यासाठी पेशव्याना जी सामील होऊ पहात आहे, ती ह्या मुसलमान सरदाराच्या चिथावणीमुळें तर नसेल? आणि बळवतराव, शिवाजीराव, वगैरे मंडळी ऐन वेळीं मला दगा देऊन त्या मुसलमान सरदाराना व त्याच्या मार्फत पेशव्याना तर सामील होणार नसतील?"

"तसेंही असेल नाहीं तरी कोणीं म्हणावें? बाकी, आता आपण गोष्ट काढलीच म्हणून सागतों, आपले मामा मानसिंगराव टोके देखील थोडेसे आपल्या विरुद्ध दिसतात" कोन्हेरराम म्हणाला

"कशावरून बरें?" त्रिंबकरावानीं पुष्करिणीतील पाण्यानें चूळ भरता भरता विचारलें

"रात्रौ मी एथून पठाण सरदारांच्या छावणींत गेलों, तेव्हा ते दोघे व आणखी कोणी एक स्त्री अशीं तिघेजणें आपल्या वाड्यापलीकडील आंबराईतील विहिरीच्या कट्ट्यावर बसून कांहीं मसलती करीत होतीं त्याच्या काय मसलती चालल्या होत्या तें मला नीटसें ऐकू आलें नाहीं पण जें काय ओझरतें ऐकलें, त्यावरून माझी खात्री झाली कीं, तीं आपल्याविरुद्ध कट करीत होतीं"

"बळवंतराव ह्या कारस्थानाच्या मुळाशीं असावा असा माझा अदाज प्रथम-

पासूनच होता पण तो थेरडाही त्या दोघांना सामील झाला आहे काय ! अरे हरामखोरा !" त्रिंबकराव संतापाने थरथरत उद्गारले

कोन्हेररामानें त्या तिघाना रात्रीं आंबराईमधील विहिरीच्या कठ्यावर बसून बोलतांना पाहिलें असेल, व त्याना काहीं गोष्टी बोलताना ऐकलें असेल, पण ती बातमी नेमकी ह्याच वेळीं त्रिंबकरावांना सांगण्यात आपल्या मतें मोठ्या चतुराईनें एका दगडानें तीन पक्षी मारले पूर्वी कधीं मानसिंगराव टोक्यांनीं कोन्हेररामाच्या भावाची, भास्कररामाची, त्यानें त्यांच्या घरातील कोणा एका स्त्रीशीं असभ्यतेची वर्तणूक केल्यामुळे खाशी कणिक तिंबली होती, त्याप्रसंगीं भावाला वाचविण्यासाठीं कोन्हेरराम धावून गेला, तेव्हा त्यालाही मानसिंगरावाच्या हातातील आसुडाचे पाच चार खरपूस फटके खावे लागले होते त्या फटक्यांच्या जखमा बुजाल्या तरी मावा मात्र शिल्लक होत्या, व अंत:करणाला झालेली अपमानाची जखम तरी अजून ओली जणू काय आजच झाली इतकी ताजी होती त्या अपमानाचा सूड कोन्हेररामाला केव्हा तरी घ्यावयाचा होता बळवंतराव मोघे त्या दोघाही भावांना त्याच्या कुटिल वृत्तीबद्दल हरघडी नावें ठेवी, तो आपणाला इथेंही नावे ठेवील असें कोन्हेररामाला भय होतें, म्हणून त्याच्याविषयी त्रिंबकरावाचे मन कलुषित करणे त्याला अवश्य वाटत होतें. आणि तिसरी गोष्ट, त्याला त्रिंबकरावाचा विश्वास संपादन करून त्याना आपल्या हातांतील बाहुली—नव्हे, दुधारी तरवार बनविण्याची त्याची उत्कट इच्छा होती. बळवंतराव मोघे, मानसिंगराव टोके व आणखी बरेच लोक ह्या दोघां कोल्हटकर बंधूवरून साऱ्या कोंकणस्थ ब्राह्मणाना सर्पाच्या जातीचे म्हणत. तें खरें नसलें तरी कोन्हेरराम व भास्करराम हे दोघेही मात्र सर्वतोपरी त्या उपमेला पात्र होते. सर्पाला स्वतःचें घर बांधतां येत नाही, तो मुंग्या वगैरे कामसू कीटकांनीं अपरिमित कष्टानीं बांधिलेल्या वारुळात घुसून तेथला वतनदार होतो, म्हणूनच 'आयत्या बिळांत नागोबा' ही म्हण रूढ झाली आहे. कोन्हेरराम देखील प्रथम पेशव्यांच्या पदरीं नोकरीला राहिला तेव्हां त्यानें सभोंवारच्या ज्या लोकांच्या शिफारशींचा पेशव्याची मर्जी संपादन करण्यासाठीं उपयोग करून घेतला, त्या लोकांविषयीं पेशव्यापाशीं चुगल्या करून त्यानें स्वतः प्रतिष्ठापूर्वक पेशव्यांचा विश्वास संपादन केला, व तेथें अर्धचंद्र मिळाल्यावर तेथून तो त्रिंबकरावाकडे आला होता, तेथेंही त्याला तेंच करून स्वतःची प्रतिष्ठा वाढवावयाची होती. पति-

पत्नीचे संबंध अत्यंत नाजुक असनात, हे त्याला माहीत होते त्या संबंधांत ढवळाढवळ करून स्वतःचे स्तोम माजविण्याचा त्यानें पेशव्याच्या पदरीं असतांना जो प्रयत्न केला, तो बऱ्याच अंशीं फलद्रूप झाला होता त्या अनुभवाचा फायदा घेऊन त्रिंबकराव व त्याची पत्नी यांच्या बेबनावाचा स्वतःच्या उत्कर्षाच्या कामीं उपयोग करून घेण्याची बुद्धि त्याला त्रिंबकरावाच्या तोंडून गिरजाबाई बेपत्ता झाल्याची बातमी ऐकताच सुचली, व त्या दिशेनें त्याचे कुटिल विचार सुरू झाले.

सत्यासत्याच्या झगड्यात परिणामी सत्याचाच जय होतो ह्या नियमाप्रमाणें कोन्हेररामाच्या ह्या असत्याचरणाचा परिणाम भविष्यकाळीं काहींही व्हावयाचा असला तरी त्या वेळेपुरती तरी विजयश्रीने त्याला माळ घातली त्याच्या एका दगडाच्या फेंकीसरसे तीनही पक्षी मग्न पडले बळवतरावाविषयीं त्रिंबकरावाचें मन पूर्वीच कलुषित झालें असून त्याला जिवन किंवा मेलेला पकडून आणण्याची कामगिरी त्रिंबकरावांनीं सयाजीला पूर्वीच सांगितली होती मानसिंगरावाविषयींही त्याचें मन प्रथमपासूनच फारसें शुद्ध नव्हतें मानसिंगराव हा त्रिंबकरावांचा सावत्र मामा होता. तो खंडेराव दाभाड्याच्या वेळेपासून सेनापतींकडे नोकरीला होता मात्र एवढें खरें कीं, त्रिंबकरावाची आई उमाबाई व तिचा हा सावत्र भाऊ मानसिंग यांचें बरें नव्हते उमाबाईच्या मनाने उगाच मानसिंगाविषयीं भलता संशय घेतला होता, व त्रिंबकरावांनीं तिचा तोच कित्ता पुढे गिरविला होता त्रिंबकरावांचा बाह्यातपणा प्रथमपासूनच मानसिंगरावाला आवडत नसे तो त्याबद्दल त्रिंबकरावाचा वारवार निषेध करी त्या निषेधाचा अर्थ उमाबाई असा घेई कीं, मानसिंगरावाला आपल्या मुलाचा उत्कर्ष पाहवत नाहीं व तो कां पाहवत नाही, तर तो सावत्र बहिणीचा मुलगा म्हणून ! उमाबाईचेंच व्रत त्रिंबकरावानींही ह्या बाबतींत पुढे चालविलें होतें खंडेरावाच्या पश्चात् लौकरच मानसिंगरावाला नोकरीला मुकावें लागले होतें पण पेशव्याशी झगडण्यासाठीं त्रिंबकरावांना मनुष्यबळाची अतोनात गरज असल्यानें त्यांनीं नाइलाज म्हणून मानसिंगरावाला पुन्हा आपल्या बायकोमार्फत नोकरीवर बोलावलें, व तोही मागील गोष्टी मनात न ठेवता आपल्या सावत्र भाचीच्या शब्दाला मान देऊन नोकरीवर आला गिरिजाबाईला लहानपणापासून ह्या मानसिंगरावानेंच कटिखांद्यावर खेळविलें होतें,व त्रिंबकरावाशीं तिचें लग्न झालें तेंही त्याच्याच मध्यस्थीनें झालें होतें. मध्यतरीं जरी त्या दोन घराण्यात वैमनस्य उत्पन्न झालें

होतें, तरी मानसिंगराव व गिरिजा यांच्यामधील शुद्ध व जिव्हाळ्याच्या प्रेमाचा जिवंत निर्झर सतत झुळझुळ वहातच होता. म्हणूनच त्रिंबकरावाच्या सूचनेवरून गिरिजाबाईनें मानसिंगरावाना भीड घालून स्वतःच्या कुंकवाची शपथ घालून बोलावले, व म्हणूनच मानसिंगराव आला अर्थात कोन्हेररामाच्या संशयाप्रमाणे त्या रात्री आमराईतील विहिरीच्या कट्ट्यावर बसून मानसिंगराव व बळवतराव यांच्याशीं खलबत करणारी स्त्री गिरिजाच असली अथवा नसली, तरी अशा निर्वाणीच्या वेळचा आधार म्हणून तिचें मन मानसिंगरावाकडे जाणें अगदीं संभवनीय होतें तोच संभव यावेळीं त्रिंबकरावाना खरा वाटला, व त्यांनीं रागाच्या भरांत कोन्हेररामाच्या तोंडावर मानसिंगरावाला लाखोली वाहून, त्याच्याच फुसलावणीने गिरिजा आपणावर इतकी उलटली असली पाहिजे असे ठामपणें ठरवून म्हटले, "बस्स ! हा थेरडा व ते चुलते—पुतणे मोघे या तिघानीं मिळून माझ्याविरुद्ध कट करून गिरिजेला फुरुलावून घराबाहेर काढले असले पाहिजे व पेशव्यांशीं फितूर होण्याचा त्यांचा इरादा असला पाहिजे ह्या सर्व फितुराचा एकजात नींमोड झाला पाहिजे" ते कोन्हेररामाला म्हणाले, "कोन्हेरराम ! माझा विश्वासू दोस्त सयाजी गायकवाड व तुम्ही मिळून दोघानी ह्या चार माणसाचा तपास करून त्याना माझ्यासमोर आणलें पाहिजे माझे अन्न खाऊन धडधडीत माझ्या घरात फितूर करतात म्हणजे काय बिशाद आहे !"

कोन्हेररामाने ही कामगिरी आनदाने आपल्या शिरावर घेतली हें सांगावयाला नकोच तरीपण सयाजीविषयीं त्रिंबकरावांनीं इतका विश्वास दाखविलेला त्याला सहन होईना त्यानें त्या क्षणींच स्वतःच्या मनात निश्चयाची खूणगांठ बांधली, "सेनापतींचा पूर्ण विश्वास फक्त मी एकट्यानें संपादन करण्याच्या कामीं हा सयाजी मला नडण्याचा संभव आहे. याचाही काटा मीं माझ्या मार्गातून काढून टाकला पाहिजे एका म्यानांत दोन तरवारी सलोख्यानें नांदणें कधीच शक्य नाहीं"

मुखमार्जन वगैरे आटोपल्यावर त्रिंबकराव कपडे करून कोन्हेररामासह त्रिवर्ग खानाच्या भेटीला जावयास निघाले. वाटेनें त्रिंबकरावांनीं मस्तानीची गोष्ट काढली. तिला हस्तगत करण्यासाठीं कसकशी उपाययोजना करावी, वगैरे वाटाघाटी त्या दोघांत किती तरी झाल्या असतील, त्या त्यांच्या त्याना माहीत, कीं सर्वसाक्षी परमेश्वराला माहीत !

त्या दोघाना मार्गातून जातांना एक विचित्र दृश्य दिसलें. एक पारधी समोरच्या

वृक्षावर बसलेल्या कोकिळेची शिकार करण्यासाठी आपल्या धनुष्यबाणाला प्रत्यंचा लावून एकाग्र चित्ताने तिकडे पहात उभा होता त्याचे त्या कोकिळेकडे इतके चित्त वेधले होते की, त्याच्या मागील बाजूला एका मोठ्या वृक्षाच्या मुळाशी असलेल्या वारुळापाशी एक सर्प दबा धरून बसणाऱ्या चोराप्रमाणे अगदीं अंग चोरून बसलेला होता, तिकडे त्याचे मुळींच लक्ष्य नव्हतें तेथून काहीं अंतरावर असलेल्या महाकालीच्या देवालयांत एक साधु धुनी पेटवून तिच्यासमोर ध्यानस्थ बसला होता त्रिंबकराव व कोन्हेरराम हे तो देखावा पाहून जागच्याजागींच क्षणभर थबकले व आता पुढें काय होते तें लक्षपूर्वक पाहू लागले इतक्यांत देवालयातील साधु मोठमोठ्याने ओरडून म्हणाला, " भल्या माणसा ! शुद्धीवर ये ! ज्या मापानें द्यावे त्या मापाने घ्यावें ! हा जगाचा न्याय आहे, हे ध्यानीं आणून वाग, नाहींतर फुकट मरशील ! "

पण त्या साधूचे शब्द त्या पारध्याला काहीं ऐकू गेले नाहीत, इतका तो कोकिळेचा बळी घेण्याच्या प्रयत्नांत भान हरपून उभा होता 'आता कसे होईल ? तो सर्प त्या पारध्याला डसणार असे दिसतें त्या साधूने एवढ्या मोठ्यानें हांक मारून ओरडून सांगितले तरी देखील त्याला कसें ऐकू येत नाहीं ?' अशा अर्थाची कुजबूज त्रिंबकराव व कोन्हेरराम यांच्यात चालली आहे, त्या पारध्याला सावध करण्यासाठी तेही त्याला मोठमोठयानें हाका मारीत आहेत, तोंच पारध्याने तिकडे मुळींच लक्ष्य न देतां डावा पाय किंचित् उचलून पवित्रा ठोकला व कोकिळेवर बाण सोडण्यासाठीं धनुष्याची दोरी ओढली पण ओढलेली दोरी सुटता सुटता त्याचा डावा पाय सर्पाच्या शेपटीवर पडल्यामुळें सर्प फोफावत उलटला व त्याच्या पायाला कडकडून डसला त्यामुळें पारध्याच्या हातांतील बाण सुटला पण नेम चुकून त्याच वृक्षावर त्या कोकिळेच्यीं पिले खाण्यासाठीं टपून बसलेल्या बोक्याला लागून बोका मरून पडला, कोकिळा उडून गेली व पारधी सर्पदंशाच्या प्राणांतिक वेदनानीं विव्हळत भुईवर कोसळून गडबडां लोळूं लागला.

त्रिंबकराव व कोन्हेरराम हा विस्मयजनक देखावा पहात किंकर्तव्यमूढ बनून थोडा वेळ तेथेंच उभे होते. ते त्या पारध्याजवळ गेले. इतक्यांत तो देवालयांतील साधूही तेथे आला पारधी विव्हळत 'अहो ! मला कोणी वांचवा हो ! मी मरतों !' असा टाहो फोडीत होता.

साधु गभीर मुद्रा करून उत्तरला, " पातक्या ! तुझे शंभर अन्याय भरले,

म्हणून मी 'सावध हो' 'सावध हो' असें ओरडून तुला सांगत असताही ऐकण्या ची बुद्धि तुला झाली नाहीं आता आपल्या कर्मांचीं फळे भोग."

एवढे बोलून तो साधु तेथून निघून जाऊ लागला.

"चला सेनापतिसाहेब! आपणाला जावयाला उशीर होतो. आपणापाशीं औषधही नाहीं व मंत्रही नाहीं, त्यामुळें आपण कांहीं ह्या अभागी माणसाला वांचवूं शकणार नाहीं"

"चला" त्रिंबकराव कोन्हेररामाबरोबर पुढे जावयाला निघता निघता म्हणाले, "भलें झालें ह्या हरामखोर पारधी त्या निरपराधी कोकिळेला ठार करू पहात होता, त्याला परमेश्वरानें यथायोग्य प्रायश्चित्त दिलें"

"म्हणूनच बाबानो! जरा पायाखालीं पाहून चालत जा" तो साधु जातां जातां मागे वळून त्या दोघाकडे पहात म्हणाला

"सेनापतिसाहेब! जरा पायाखालीं पाहून चाला." कोन्हेरराम त्रिंबकरावांना म्हणाला त्रिंबकराव पायाखाली पाहून चालू लागले ते दोघेही काहीं अंतरावर गेले, तेव्हा पूर्वोक्त साधु बराच वेळ त्याच्याकडे टक लावून पहात होता पण तिकडे त्या दोघाचेही लक्ष्य नव्हतें

मनुष्य विकारवश होऊन कसल्याही मोहजालात एकवार सांपडला, कीं त्याला आपल्या पायाखालीं व आजूबाजूला काय जळत आहे हें डोळे असून दिसेनासे होते, व आपणाविषयीं कोण काय म्हणते ते कान असून ऐकू येईनासे होतें त्रिंबकरावाची आज थेट तशीच अवस्था झाली होती ते जर भानावर असते, तर कोन्हेररामानें जेव्हा आपण निजामाच्या सरदाराकडे जाऊन आलों असें सांगितले, तेव्हा तो तिकडे का गेला असावा अशी शंका तरी त्याच्या मनाला शिवली असती, व तें नाणे पारखून घेण्याची इच्छा त्याना झाली असती. त्याप्रमाणेच यदृच्छेनें त्याना दिसून आलेल्या पारध्याच्या परिणामावरून पुष्कळच बोध घेता येण्याजोगा होता निदान त्या साधूने भविष्यकालाचे सूचक असे जे उद्गार काढले, त्यांतील गूढार्थ तरी त्यांच्या गळीं उतरला असता. जी अवस्था त्याची, तीच कोन्हेररामाचीही होती साधूनें त्याना पायाखालीं पाहून चालावयाला सांगितलें, म्हणून ते पायांखालीं पाहून चालू लागले. त्यांना बोलत जातांना पाहून तो साधु उपहासपूर्वक स्वतःशीं हसून काहींसें पुटपुटत देवालया-पासून बऱ्याच अंतरावर असलेल्या आंबराईतील विहिरीकडे जाऊन विहिरीच्या

कांठच्या जुनाट औदुंबरावर चढला, व तेथून एकाएकीं दिसेनासा झाला. तो कोठे गेला असेल बरें ? किंवा तो कसा अदृश्य झाला असेल ?

थोड्या वेळानें देवालयाच्या गाभाऱ्यातून कोणी तरी बाहेर डोकावून पाहिलें, पण तेथें तो साधु नाहीं ! आणखी अंमळशानें काहीं माणसे देवदर्शनाला आलीं, त्यानीं देवालयाच्या गाभाऱ्यांत जाऊन देवाला प्रदक्षिणा घातली, पण त्याना तेथे कोणीच माणूस आढळून आलें नाहीं !

प्रकरण एकोणिसावे

# अनाहूत रक्तपात

त्रिंबकराव दाभाडे कोन्हेररामासह तुरुकताजखान वगैरे निजामाच्या सरदारांना भेटावयाला गेले, तेव्हा पेशव्यांच्या वतीने नारायणजी ढमढेरे त्यांच्याशी कांहीं वाटाघाटी करीत बसले असल्याचे त्याना बाहेरच्या बाहेरच कळले त्याबरोबर कोन्हेररामाच्या तोंडचें पाणी खर्रकन् उतरले. इतका वेळ त्रिंबकरावांशीं गप्पा मारताना व पुढील कारस्थाने लढवितांना त्याच्या अतःकरणात ज्या उत्साहाच्या व कर्तृत्वाच्या ऊर्मि उसळत होत्या, त्या एका क्षणात मावळून गेल्या पण ही मनातली चलबिचल मनांत दाबून तो लगेच त्रिंबकरावांना म्हणाला, "सेनापतिसाहेब! मला वाटतें, आपण एकट्यानेच बैठकखान्यात जाऊन खानाना भेटावे"

"आणि तू येत नाहींस?" त्रिंबकरावानीं विचारले

"नाही मी येत नाहीं"

"का बरे? एकाएकीं तुझा विचार का पालटला? तू नारायणजी ढमढेऱ्यानाभ्यालास कीं काय?"

"मी त्याना काय म्हणून भिईन? नारायणजी म्हणजे कुठच्या झाडाचा पाला? मी अशा लुग्यासुग्याना भिणारा कच्च्या दिलाचा माणूस नाहीं मी कोल्हटकर आहें. कैक दिवस पेशव्याना त्यांच्या पदरच्या नारायणजीसारख्या कैक मुत्सद्द्याना मी माझ्या करंगळीच्या टोंकावर नाचविले आहे भय हा शब्दच मला माझ्या वाडवडिलांनीं शिकविलेला नाहीं"

"तर मग तू आंत कां येत नाहींस?"

"मी येत नाहीं याचें कारण असे कीं, नारायणजी तडजोडीची भाषा बोलण्यासाठीं आले आहेत, ते मला पाहताच बिचकतील. त्यांना नक्की संशय येईल कीं, हा पाताळयंत्री कोन्हेरराम ज्याअर्थी इथे आहे, त्याअर्थी याने इथें कारस्थानाचें जाळे पसरून ठेविलें असले पाहिजे, व पेशवे आपल्या परिवारासह त्या जाळ्यात नक्की सांपडणार आपला इथे कांहीं पाड लागावयाचा नाहीं, हे ओळखून सुतानें स्वर्गाला जाणारे ते माणूस आहेत. ते वेळीं बाजिरावांना सांगून तडजोडीची भाषाच बंद करावयाचे व जाळ्यात सांपडलेला सिंह जाळें तोडून निघून जावयाचा.

नारायणजीसारखे उंदीर एरव्ही सिंहाच्या पासगालाही पुरणारे नसले तरी अशा वेळीं ते जाळें कुरतडून सिंहाला बंधमुक्त करावयाला कमी करणार नाहींत"

"पण तू इथें आहेस ही बातमी त्याना आता नाहीं तर मग कळणारच ती गुप्त थोडीच रहाणार आहे!"

"मग कळेना कां? मी म्हणतों, तोवर मी चोहोंकडे इतकी नाकेबंदी करीन कीं, मग पेशवेच काय पण त्यांचा प्रपितामह आला तरी त्याला देखील आम्हीं पसरलेल्या जाळ्याबाहेर पडता येऊ नये! त्याप्रमाणेच गिरिजाबाईसाहेबाना मुठींत घेऊन मोघे चुलतेपुतणेही पेशव्याना सामील होण्याचा संभव आहे. आणखी एका महत्त्वाच्या गोष्टीसाठी तर मला एव्हापासून डोळ्यांत तेल घालून जपलेच पाहिजे नाहीं तर माझ्यावर आपला ठपका यावयाचा."

"ती कोणती गोष्ट?"

"ती मला आपण विचारू नये अशी विनंति आहे कारण त्यामुळे आपण व निजामांचे सरदार यांच्यात वृथा बेबनाव उत्पन्न होण्याचा संभव आहे"

कोन्हेररामानें ती गोष्ट सांगण्याला आढेवेढे घेण्याला सुरवात करताच त्रिंबकरावांची त्या गोष्टीविषयींची उत्कंठा द्रुतगतीनें वाढीला लागली. त्यांनीं आग्रहपूर्वक विचारलें, "ती गोष्ट कोणती?"

"पण आपण ती गोष्ट ऐकल्यावर रागावणार नाहीं, किंवा कोणापाशीं त्याची वाच्यताही करणार नाहीं, असे मला अगोदर वचन द्या आपण खानांवर बसल्या बैठकींत रागावाल व आपल्यात आपसांत फूट पडून त्यामुळें पेशव्यांचे फावेल, म्हणून मी एवढी खबरदारी घेत आहें"

"हें घे वचन" असें म्हणून त्रिंबकरावांनीं कोन्हेररामाला वचन दिले

कोन्हेरराम त्रिंबकरावांच्या कानाशीं तोंड नेऊन कावऱ्याबावऱ्या नजरेनें सभोंवार पहात हळूच म्हणाला, "त्या तिघाही खानाचा मस्तानीवर डोळा आहे. तिला वश करून अथवा पळवून आणण्याची कामगिरी त्यांनीं आपल्या लोकाना सांगितली आहे असें रात्रींच माझ्या कानीं आले त्यांचा डाव साधला, तर मग माझा तेथें कांहींच इलाज चालणार नाहीं. ते आपले दोस्त, म्हणून मला त्यांची मुर्वत राखून स्वस्थ बसावें लागेल; व ह्या साऱ्या भानगडींत आपली मात्र निराशा होईल. म्हणून म्हणतों, मला माझ्या कामगिरीवर वेळींच जाऊं द्या."

"वा:! एकूण ही सरदारांची दोस्ती मोठी मासलेवाईक आहे म्हणावयाची!

पेशवे कैद होऊन त्यांना आपल्या ताब्यांत पाहिजे आहेत, मस्तानीही पाहिजे आहे, पेशव्यांचा पराभव होऊन जे यश मिळेल त्या यशातला मोठा वांटाही पाहिजे आहे, असले लोक दोस्त असण्यापेक्षा उघड उघड शत्रु असलेले फार चागले !"

"पण आपण इथे फार वेळ बोलत उभे रहाता उपयोगी नाहीं कोणी तरी आपले बोलणे ऐकेल व तें मग अनर्थाला कारण होईल म्हणून म्हणतों, आपण मला मोकळा सोडा, म्हणजे मी दरोबस्त बंदोबस्त करतों"

इतक्या नाजुक व अवघड कामाची जबाबदारी कोन्हेररामाने आपल्या शिरावर स्वखुषीनें घेतल्यावर त्रिंबकराव तरी त्याला नको कोणत्या तोंडानें म्हणतील ! त्यानीं त्याला निरोप दिला, व 'हे हरामजादे दाढीवाले मुसडे मला अशाप्रकारें फसवू पहात आहेत काय ? ठीक आहे. वेळ आली म्हणजे पाहून घेईन' असे स्वत.शीं दातओंठ खात म्हणत ते आत बैठकखान्यात गेले.

  

बाहेरील बाजूला त्रिंबकराव व कोन्हेरराम बोलत उभे होते, तेव्हांच आत नारायणजी ढमढेरे, आवजी कवडे व बळिराम यांच्या तुरुकताजखान, बडेखान व गैबखान याच्याशीं वाटाघाटी सुरू होत्या या ठिकाणी हे प्रथम सागून ठेविलें पाहिजे की, नारायणजी व आवजी जे प्रथम तेथे आले, ते पेशव्याच्या वतीनें त्रिंबकराव दाभाडयाना भेटून त्याच्याशी भेटीचा बेत ठरविण्यासाठीं आले होते. पेशव्याचा मुक्काम भडोच येथें झाल्याचें त्रिंबकराव व खान याना पूर्व दिवशींच कळलें होतें, व तेव्हाच त्या निमित्ताने तें वाचकानाही कळले आहे नारायणजी, आवजी व बळिराम थेट त्रिंबकरावाकडेच जावयाचे होते पण मध्यतरीं हे तिघे पठाण सरदार तेथे ठाणें देऊन बसल्याचें व त्याचीच दाभाडयाना खरी मदत असल्याचे त्या दोघाच्या कानीं आले, त्यामुळें प्रथम त्या पठाण सरदारांना आपल्या बाजूला वळविता आले तर पहावे, अशा विचारानें त्या दोघानीं प्रथम त्याचीच भेट घेतली, व युक्तिवादाने त्याची मने वळविण्याचा उद्योग आरंभिला. त्या पठाण सरदाराशी पेशव्यांच्या वतीनें युक्तिवाद करण्याला नारायणजी व आवजी यांना आधार एवढाच कीं, पूर्वी निजाम आणि पेशवे याच्यात मुगीशेवगांव येथें सलोख्याचा तह झाला होता § व त्या तहानुसार निजाम पेशव्याशीं

§ निजामाने चद्रसेन जाधव व कोल्हापूरकर संभाजी यांना सामील करून घेऊन सातारकर छत्रपतींविरुद्ध धुमाकूळ मांडला होता त्याचें पारिपत्य बाजि-

स्नेहभावानें वागण्याला बांधलेला होता मार्गांत त्यानी आजच्याप्रमाणेंच पेशव्याच्या वतीनें निजामाची भेट घेऊन त्याच्याकडूच स्नेहभावाचे आश्वासन मिळवून, तसें आज्ञापत्रही निजामाकडून त्या सरदारांना सादर करण्यासाठीं मिळविलें होतें त्याप्रमाणें निजामाच्या सरदारांनीं दाभाड्यांची बाजू सोडून पेशव्यांना साह्य करण्याचे ठरविल्यास दाभाड्याची बाजू आपोआप लंगडी होईल, व मग ते पेशव्यांशीं सलोख्याने वागावयाला राजी होतील, अशी नारायणजी व आवजी ह्या उभयतांनाही प्रबळ आशा होती त्या दोघांनाही ह्या कामीं सकृद्दर्शनीं बरेंच यश आलें तुरुकताजखान व बडेखान ह्या निजामाच्या सरदारानीं दाभाड्यांच्या वतीनें न लढण्याचें आश्वासन दिलें पण तिसरा पठाण सरदार गैबखान हा बंगषाकडून आला होता, तो काहीं केल्या वळेना त्यानें बुदेलखंडच्या स्वारींतील उखाळ्यापाखाळ्या काढून भांडण्याला सुरवात केली, व स्पष्ट सांगितलें, "तें काहीं नाहीं. पेशव्यानीं आमचे सुभेदार महंमदखान बंगष यांना जैतपूरच्या वेढयात केवळ दगा देऊन फसविले व त्यांच्या जनानखान्यातील खुबसूरत औरत मस्तानी ही आपल्या जनानखान्यात ओढून नेली; त्या अपमानाचा सूड मी घेणारच घेणार ! जशी तेव्हा पेशव्यानीं सुभेदार साहेबाची गत केली, तशी मी आता पेशव्यांची गत करणार नव्हे, सुभेदारसाहेबाना रणांगणांतून नुसता पळच काढावा लागला, पण मी पेशव्याना आज येथून पळून जावयालाही अवसर देणार नाहीं मी त्याना पकडून त्याच्या मुसक्या बाधून

---

रावांनीं पालगड येथें केलें, व निजामाला शरण आणून तह करावयाला भाग पाडलें. ह्या तहाचीं कलमें बाजिरावानीं पुढीलप्रमाणें सुचविली.—(१) संभाजीस आपल्या हवालीं करावें, (२) मोगलांचे सहा सुभ्यांवर मराठयाचे हक्क चालावे; (३) आणि त्या हक्कास हरकत न व्हावी म्हणून ठिकठिकाणीं तटबंदीच्या जागा आहेत त्या मराठयांचे हवालीं कराव्या. ह्या अटींपैकीं शेवटच्या दोन अटी निजामानें मान्य केल्या. मात्र पहिली अट मान्य करण्याची त्याला पाळीच आली नाहीं. कारण संभाजीराजे त्यापूर्वीच पन्हाळ्याकडे निघून गेले होते. त्याबद्दल पाहिजे ती व्यवस्था शाहूमहाराजांनीं करावी असें एक नवें कलम ह्या तहांत घालण्यांत आलें. हा तह मुंगीशेवगांव येथें ता. ६ मार्च इ. सन १७२८ रोजीं झाला होता. याच वेळीं निजाम व शाहूराजे यांनीं परस्परांवरील परचक्राचे वेळीं परस्परांना मित्रभावानें साह्य करावें असेंही ठरलें होतें.

सुभेदारसाहेबासमोर घेऊन जाणार. त्याप्रमाणेच मस्तानीलाही सुभेदारसाहेबाच्या जनानखान्यात ओढून नेणार मग मस्तानी आमच्या सुभेदारसाहेबाची बेगम होऊन बसेल, व त्या जोडप्यासमोर पेशव्यानीं गुडघे टेकून त्याची सपशेल माफी मागितली, तर मग पेशव्याना जिवंत सोडावयाचें कीं नाहीं याचा विचार करण्यांत येईल पण त्याना जिवंत सोडावयाचे झालें तरी प्रथम त्याना आम्ही मुसलमान करू आम्ही बादशाही सत्तेचे कैवारी आहो. त्या सत्तेच्या बळकटी साठीं आम्हाला राजसत्ता व धर्मसत्ता एकाच वेळीं गाजविण्याशिवाय गत्यतर नाहीं ''

गैबखानाचे हे प्रलाप ऐकून नारायणजी व आवजी याना तर मनस्वी चीड आलीच, पण तुरुकताजखान व बडेखान यानाही तें रुचलें नाही त्याना ते न रुचण्याचे कारण असे कीं, मराठशाहींतील दाभाडे, गायकवाड वगैरे प्रबळ मंडळीप्रमाणेच बादशाही-तील अनेक मुसलमान सुभेदाराना आपापले सवते सुभे स्थापन करून स्वतंत्र राजे होण्याची हाव सुटली होती ह्या हावऱ्या सुभेदारांत निजामाचा नंबर पहिला होता त्याला पेशव्याचा अथवा मराठशाहीचा उत्कर्ष व्हावयाला नको होता, त्याप्रमाणेच बादशाही सत्ताही त्याला प्रबळ व्हावयाला नको होती * त्याला येन-केन-प्रकरेण स्वार्थ साधावयाचा होता, व त्या स्वार्थासाठीं तो काय पाहिजे तें करण्याला एका पायावर तयार होता. तुरुकताजखान व गैबखान हे दोघेही त्याच्याच तालमेंत तयार झालेले होते त्यानी बडेखानाची परोपरीनें समजूत घालण्याचा प्रयत्न केला, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं तुरुकताजखानानें बादशाही सत्तेचा वाढता दुबळेपणा व मराठ्याच्या सत्तेचा वाढता उत्कर्ष बडेखानाच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केला, पण त्यानें दाभाड्यासह मांडवीचा किल्ला पाडाव करून व मांडवीचा राजा दुर्जयसिंग याला पळावयाला लावून त्याच्या बायका-मुलाना कैद करून नुक्ताच मोठा विजय संपादन केला होता, त्या विजयोन्मादांत

* तत्कालीन इतिहासाची उपलब्ध साधने पहाता तेव्हाच्या दिल्लीच्या बाद-शहाचे सारेच सुभेदार बादशहातीचा पडता काळ पाहून आपापल्या परीनें सवते सुभे थाटू पहात असल्याचें स्पष्ट दिसून येतें ह्या सुभेदारात निजाम हा विशेष प्रबळ व विशेष कल्पक असल्यानें बादशहा व वजीर यांनाही डोईजड होऊन बसला होता. निजामाचें प्रस्थ तेव्हा एवढें माजलें होतें कीं, त्याला उघड उघड मना करण्याची बादशहा किंवा वजीर यांचीही छाती नव्हती. पण हस्तें परहस्तें निजामाचा नक्षा उतरविला जावा यासाठीं बादशहा व वजीर यांचे आटोकाट प्रयत्न चालले होते.

त्याला पेशव्याशी झगडणें अगदी सोपें वाटलें. नारायणजी व आवजी यांची शिष्टाई बाजूलाच राहिली, व तुरुकताजखान आणि गैबखान यांची बडेखानाशींच लढत जुपली त्या झगड्यात एकमेकानीं एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या काढण्यालाही कमी केलें नाही

"तुझा सुभेदार बगष आम्हाला माहीत आहे जैतपूरच्या वेढ्यात पेशव्यानीं त्याची खाशी रग जिरविली व त्याला दाढी हातात धरून ढुगणाला पाय लावून पळावें लागलें, त्याचाच तू सरदार ना? पेशव्यानीं तुझे देखील नाककान कापून तुझी धिंड काढली तर मग कसे करशील?" बडेखानानें विचारलें

"आणि तुमचा निजाम नाही का पालगडच्या मोहिमेंत पेशव्याच्या पायावर लोटांगणे घालीत आला?" गैबखानानें तितक्याच आवेशाने विचारलें

"तो निजामाचा डाव होता" तुरुकताजखान म्हणाला

"तसाच हाही बगषाचा डाव होता" गैबखान उत्तरला

"वाः! हा खासा डाव! तुमच्या जनानखान्यातल्या मस्तानीसारख्या बिबीना पेशव्यानीं ओढून नेले व ते तुम्हाला निमूटपणानें महन करावे लागलें, हा डाव खासा!" बडेखान म्हणाला

"पण आजच काही दुनिया डुबाली नाही! मी नावाचा गैबखान पठाण आहें मी बगषाचा उजवा हात आहे माडवीचा दुर्जयसिंग असाच शेफारला होता बगषाच्या जनानखान्यातील एक उल्लू पोर अशीच त्या नादान राजाचा हात धरून निघून गेली होती, व तेव्हा तो असाच दिमाख दाखवीत होता पण वेळ आली तेव्हा मीच त्या बेवकूब राजाला सपशेल जमीनदोस्त करून त्या पोरीला तर ऐनमुद्दल हस्तगत केलीच; पण तिच्या व्याजात माडवीच्या राणीलाही मी शोधून काढून माझ्या जनानखान्यात ओढून आणणार आहें तसाच प्रकार मी पेशव्याचाही करीन मस्तानीला तर मी ऐनमुद्दल पेशव्याच्या जनानखान्यांतून ओढून माझ्या जनानखान्यात आणीनच, पण तिच्या व्याजात पेशव्यांच्या औरतींनाही—"

"हां! खानसाहेब! तोंड आटोपा! पुन्हा जर पेशव्याच्या औरतींविषयीं एक तरी वाकडा शब्द तोंडावाटे काढाल, तर इथल्या इथें माझ्या मुठींच्या मेखसूंखालीं तुमचें टाळकें सडकून फोडलें जाईल" बळिराम बसल्या जाग्यावरून ताड्कन् उठून पवित्र्यावर उभा राहून आपल्या वज्रमुष्टी आवळीत म्हणाला त्याला तेवढ्यांत नारायणजी व आवजी यानीं आवरून धरलें म्हणून बरें, नाहींपेक्षां वाणीचा बार व मुठींचा वार यांची क्रिया एकदमच व्हावयाची

तुरुकताजखान व बडेखान यानींही गैबखानाला आवरून धरले, पण त्यामुळें त्याचा आवेश कमी न होतां उलट वाढला मात्र! कांहीं क्षणांपूर्वी ते दोघेही खान गैबखानावर उलटले होते, त्यामुळें गैबखानाला जरा भय वाटत होतें. नाहींपेक्षां बळिरामाच्या तोंडून उपमर्दकारक शब्द निघतांच त्याच्यावर बडेखानानें आपल्या हातांतील तरवारीचा वार करण्याला कमी केलें नसतें आतां आपणाला आपल्या भाईबदाची मदत आहे असें कळतांच तोच बडेखान तरवार उगारून बळिरामावर धावला आता मात्र बळिरामाचा क्रोध अनावर झाला, तो नारायणजी व आवजी यांना आवरेनासा होऊन सरळ गैबखानाच्या अंगावर चालून गेला व गैबखानाने दोनतीन वेळा त्याला 'सुवरका बच्चा' 'हरामजादा' अशा निवडक शिव्या दिल्या होत्या, त्याच शिव्याचा त्याला परत अहेर करून बळिरामानें तरवारीचा वार करण्यासाठीं गैबखानाचा उत्सुक झालेला उजवा हात डाव्या हातानें धरून त्यानें एवढ्या जोरानें हिसकला कीं, त्यासरसा आपला हात बावळ्यापासून निखळला अशा भावनेनें गैबखान मोठमोठ्यानें ओरडू लागला त्या दोघाचा झगडा मिटवता मिटवता सर्वांना पुरेवाट झाली.

तेवढ्यात त्रिबकराव आत आले त्यानी तो प्रकार पाहून विस्मयपूर्वक विचारलें, "हे काय?"

त्रिबकरावाना नारायणजी व आवजी यानी नम्रतापूर्वक वदन करून सारा प्रकार थोडक्यांत सांगण्याला सुरुवात केली. पण त्रिबकराव तें मुळींच ऐकून घेईनात कारण नारायणजी वगैरे पेशव्याकडून आलेल्या मंडळीविषयीं कोन्हेर-रामानें नुकतेंच त्रिबकरावांच्या कानीं विष ओतले होतें त्रिबकरावांनीं काहीं चौकशी न करतां बळिरामाला एकदम शिवी दिली, "हरामखोर! मागें सरतोस की नाहीं?"

"कोण हरामखोर? तू हरामखोर! तुझा बाप हरामखोर!" बळिराम गैब-खानाचा हात तसाच आपल्या हातात घट्ट धरून त्रिबकरावाकडे वळून म्हणाला.

"बळिराम! हे आपले सेनापति त्रिबकराव दाभाडे आहेत. जरा शात होऊन बोल" नारायणजी म्हणाले.

"मग? असतील! सेनापति असले तरी मीं त्याच्या हकनाहक शिव्या सहन करीन कीं काय?" बळिराम पूर्ववत् निर्भयपणानें गर्जत म्हणाला.

"बेवकूब! जरा जीभ सांभाळून बोल!" त्रिंबकराव आपल्या कमरेच्या तरवारीला हात घालीत म्हणाले

बळिरामानें लगेच आवेशाच्या भरात उजव्या हाताने पकडलेल्या गैबखानाच्या हातांतील तरवार डाव्या हातानें हिसकून घेऊन त्रिंबकरावावर चाल करीत म्हटलें, "थांब! मदोन्मत्त रेड्या! तुला मी माझ्या अंगचा वकूब दाखवितो"

"इतकी मगरुरी!" त्रिंबकरावांनीं आपल्या कमरपट्ट्यातून तरवार सर्रकन बाहेर काढून बळिरामाच्या छातीवर एक जोराचा वार करून म्हटले, "हरामखोरा, हें घे तुझ्या मगरुरीचें प्रायश्चित्त!"

त्रिंबकरावांचा वार बळिरामाच्या वर्मी लागला. तो लगेच खालीं कोसळला. त्याच्या फाटलेल्या छातींतून रक्ताचीं कारंजीं उडूं लागलीं. तरी तशा असहाय स्थितींतही त्याने आपल्या उजव्या हातात घट्ट पकडलेला गैबखानाचा हात सोडला नाहीं गैबखानानें आपला शत्रु आता पडला असें पाहून जोरानें त्याला लत्ताप्रहार करून आपला हात सोडवून घेतला तेवढ्यात बळिराम पुन्हा उठला. त्याच्या छातीवरील जखमेंतून रक्त भळभळा वहातच होतें, व त्या रक्तानें त्याचें सर्वांग व खालची जमीनही भिजून ओलीचिंब झाली होती ती जखम उजव्या हातानें दाबून धरून बळिरामाने पहिल्या तडाक्याला त्रिंबकरावावर नेम धरून वार केला पण तो डाव्या हाताचा वार असल्यानें व त्रिंबकराव तेवढ्यांत चट्कन् चार पावलें मागें सरल्यामुळें तो वार योगायोगासारखा गैबखानाच्या मानेवर पडला. तो वार बळिरामानें आवेशानें केला असल्यानें त्यानें गैबखानाचें मस्तक तत्काळ धडावेगळें केले. गैबखानाला 'या अल्ला!' असें म्हणावयालाही अवसर मिळाला नाहीं.

गैबखानाची ही अवस्था झालेली पाहून व नारायणजी आणि आवजी हे बळिरामाचे दोघे साथीदारही प्राप्त प्रसंगाला तोंड देण्यासाठीं आपल्या तरवारी म्यानांतून बाहेर काढून पवित्र्यावर उभे राहिलेले पाहून तुरुकताजखान व बडेखान भीतीनें मागें सरून 'दगा! दगा! काफिरांनीं दगा दिला!' अशी ओरड ठोकूं लागले त्रिंबकराव दाभाडे मात्र त्या प्रसंगालाही डगमगले नाहींत. ते डगमगले नाहींत याचें आणखी कारण एक असें कीं, नारायणजी व आवजी यांनीं आपल्या पुढील कार्याकडे लक्ष्य देऊन त्यांना शांत होण्यासाठीं विनंति केली. त्यांची तंटा करण्याची इच्छा नाहीं असें पाहतांच त्रिंबकरावांनींही आपला हात आंवरता घेतला.

" काय ? तुम्ही त्या हरामखोराशी दोस्ती करता ? हकनाहक मला ठार करूं पाहणाऱ्या चांडाळासमोर तुम्ही हात जोडून उभे राहता ? नारायणजी ! आवजी ! बावळट रे बावळट !—" एवढे बोलून बळिराम शरीराचा तोल न सावरता आल्यामुळे धाड्कन् खालीं पडला. त्याच्या जखमेतून भयंकर रक्तस्राव झाल्यानें त्याला आता बोलवेना तो जो खालीं पडला, तोच त्यानें अखेरचा राम म्हटला

इतक्यात तुरुकताजखान व बडेखान यांच्या आरोळ्या ऐकून पहाऱ्यावरचे सशस्त्र मुसलमान सैनिक तेथे धावून आले तुरुकताजखानानें नारायणजी आणि आवजी याच्याकडे अंगुलिनिर्देश करून त्या सैनिकाना हुकूम केला, " ह्या दोघां काफराना आत्ताच्या आत्ता गिरफ्दार करा "

" आम्हाला गिरफ्दार तुम्ही का म्हणून करणार ? नारायणजींनी " सतापून तरवार उगारून पवित्र्यावर उभे राहून सर्वांना विचारले

नारायणजींचा स्वभाव फारच तापट होता, तितका आवजीचा नव्हता. आवजींनी नारायणजींच्या कानाशीं लागून हळूच सांगितले, " नारायणजी ! ही भांडण करण्याची वेळ नाहीं आपण अमळ त्यांच्या कलानेंच घेतले पाहिजे."

पण नारायणजींच्या कानात आवजी काय बोलले हे कोणालाच ऐकू न गेल्यानें सर्वांना वाटले की, हे आपल्या विरुद्धच काही बोलले, म्हणून दोन्ही खानानीं जास्त चिडून शिपायाना आज्ञा केली, " पहाता काय ? याना पकडा."

" सबूर ! " त्रिंबकराव म्हणाले

आवजी त्रिंबकरावाना हात जोडून म्हणाले, " सेनापतिसाहेब ! हा प्रकार अगदी अनपेक्षित झाला —"

" याच्या ह्या मरून पडलेल्या साथीदारानें गैबखानाना ठार मारलें ! " बडे खान म्हणाला

नारायणजी म्हणाले, " प्रथम गैबखानानी माणुसकी सोडून पेशव्याच्या बायकाना आपल्या जनानखान्यात ओढून आणण्याची मस्तवालपणाची भाषा वापरली, म्हणून आमच्या माणसाला चीड आली "—

" हो ! हो ! त्यानीं मस्तवालपणाची भाषा वापरली. फिर क्या ? " तुरुक ताजखान मगरूरपणानें उद्गारला

" हो ! हो ! काय हो ! हो ! " नारायणजींनीं वसकन् तुरुकताजखानाच्या अंगावर ओरडून विचारलें.

"हो ! हो ! खान बोलले तें बरोबर बोलले" बडेखान शिरा ताणताणून ओरडला.

"काय ? पेशव्याच्या औरती—"

नारायणजींना पूर्णपणें बोलू न देता तुरुकताजखान गर्जून म्हणाला, "होय ! पेशव्याच्या औरती आम्ही आमच्या जनानखान्यात ओढून आणणार !"

"काय ? पुन्हा बोला !" नारायणजींनीं दात ओठ खात विचारलें

"पेशव्यानीं बंगषाची मस्तानी त्याच्या जनानखान्यातून ओढून नेली, त्याचा बदला आम्ही घेणार तुम्ही काफर आम्हा मुसलमानाच्या औरती बळकावता म्हणजे काय बिशाद आहे ! त्याचा सूड म्हणून—मी एकदा सोडून दहादा सांगतों, आम्ही पेशव्याच्या औरतींना आमच्या जनानखान्यात ओढून आणणार !" तुरुकताजखान म्हणाला

'तर मग आम्हीही अशा पशूना, अशा सैतानांना त्याच्या पापाचें असें प्रायश्चित्त देणार" असे म्हणून नारायणजींनी इतराच्या डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच आपल्या हातातील तरवार सरळ तुरुकताजखानाच्या छातीत खुपसली. तुरुकताजखान 'अल्ला ! अल्ला ! तोबा ! तोबा ! मरगया !' असें ओरडत खालीं पडला आवजी कवडेही इतका वेळ जे नारायणजींनी शात राहण्याचा उपदेश करीत होते तेही त्या वेळी खवळले, व तरवार परजीत पुढे आले खानाच्या शिपायांनी दोन खानाचे तेथल्या तेथे मुड्दे पडलेले पाहून नारायणजी व आवजी याना सभोवारून घेरलें पण ते पडले पट्टीचे लढवय्ये ! ते त्या मूठभर शिपायाना थोडीच दाद देतात ! त्या दोघानीं आपसात काय संकेत केला तो तेथल्या गोंधळात इतराना ऐकू जाणे शक्य नव्हते एका क्षणात त्यानी आपणावर ओढवलेल्या प्रसगाची अटकळ करून एकदम त्या सैनिकाच्या घोळक्यात स्वतःला घालून घेतले, व तरवारी गरगर फिरवीत सभोवारच्या सैनिकाची फळी फोडून मार्ग काढला इतके मुसलमान सैनिक तिथे होते, त्याना उत्तेजन द्यावयाला बडेखान व त्रिंबकराव दाभाडेही तेथे होते, तरीही नारायणजी व आवजी ह्या दोघाना ते पकडू शकले नाहींत इतकेंच काय, उलट त्या दोघा वीरानीं विजेच्या झोताप्रमाणें त्या सैनिकातून धावत जाऊन वाट काढताच, तेथले मूठभर मुसलमान शिपायी सपासप कापून काढले. त्या शिपायानींही आपल्या मतें नारायणजी व आवजी यांना अडविण्याची किंवा ठार करण्याची अगदीं

शिकस्त करून पाहिली त्या झटापटींत काहींचे वार नारायणजी व आवजी यांना लागलेही बडेखान पठाण त्या दोघानाही एकदम ठार करण्यासाठीं आवेशा च्या भरात बेसुमार शिव्या हासडीत दोन्ही हातात दोन तरवारी घेऊन त्या गरगर फिरवीत त्यांच्या मागोमाग धावू लागला पण नारायणजी व आवजी वायुवेगानें जे तेथून भिंगरीसारखे उडाले, ते पुन्हा कशाला त्याच्या हातीं ‹ ागतात ! त्याना पकडण्यासाठीं मारे खूप धावपळ झाली बडेखानानें लढाईचा इषारा देऊन ताबडतोबीनें आपल्या सैन्याला तेथें लढाईला पाचारण केलें व नारायणजी आणि आवजी याना पकडून आणण्याची आज्ञा केली, पण सयुक्त सैन्य समोर येऊन उभें राहिलें तरी त्या सैन्याला लढावयाचें कोणाशीं हेंच कळेना ज्याचें पारिपत्य करण्यासाठीं एवढ्या लोकांना बोलावण्यात आलें होतें, त्यानीं केव्हाच धीटपणानें आपल्या हातातील तरवारींनी खानाच्या सैनिकाचीं सपासप मुंडकीं तोडीत तेथून पळ काढला होता त्या गर्दीत नुक्ताच परगांवाहून आलेला एक मनुष्य दिसताच सर्वांना वाटलें कीं, हा त्या दोघापैकींच एक असावा, म्हणून त्यांनी त्यालाच धरून बडवण्याला सुरुवात केली. तो बिचारा 'नको ! मी शत्रु नव्हे ! मी शत्रु नव्हे !' असा ओरडत होता, पण त्या दंगलींत त्याची ओरड कुणाला ऐकूं जाणार ? अखेर त्यानें जेव्हा मोठयानें 'खानसाहेब ! मी निजामाकडून तुम्हाला भेटावयाला आलों आहे' अशी आरोळी ठोकून बडे खानाचें लक्ष्य आपणाकडे वेधलें, तेव्हा कुठे इतर मडळीला वाटूं लागलें कीं, हा खरोखरच आपल्यातला कोणी मनुष्य असावा

## प्रकरण विसावें

# राहु-केतु

"कोण तू ?" त्रिंबकराव दाभाड्यांनी त्या गर्दीतून पुढें जाऊन त्या नव्या मनुष्याला न पहाता विचारलें पण तोंडून प्रश्न निघता निघता त्यांची व त्या मनुष्याची दृष्टादृष्ट होताच त्यांनीच आश्चर्यपूर्वक त्याला हाक मारून विचारलें, "कोण, भास्करराम! तू का तो?"

"होय सेनापतिसाहेब!" भास्करराम उद्गारला

"अरे! तू इकडे केव्हा, कोठून व कसा आलास?"

"मी आताच निजामकडून आलो"

"कौन? भास्करराम? हमारे कोन्हेररामका भाई?" बडेखानानें विचारलें.

"जी हा, सरदारसाहेब!" भास्कररामानें पुन्हा उत्तर दिलें.

"अरे वाः!" त्रिंबकराव सर्व सैनिकांना बाजूला व्हावयाला सांगून भास्कररामाला जवळ बोलावून म्हणाले, "तू प्रथमच आपलें नाव का नाहीं सांगितलेंस? म्हणजे इतका प्रकार झाला नसता"

"मीं पुष्कळ सांगितलें, पण माझें कोणी ऐकेल तर ना?" भास्करराम आपल्या अंगरख्याच्या खिशातून दोन पत्रें काढून एक बडेखानाला व दुसरें त्रिंबकरावांना देऊन म्हणाला, "निजामांनीं हीं पत्रें आपणाला दिलीं आहेत"

त्रिंबकराव व बडेखान ह्या दोघांनींही पत्रें हातीं घेतलीं. व तीं उघडून वाचलीं. बडेखान पत्र वाचून होताच एक दीर्घ उसासा सोडून हुश्श हुश्श करीत त्रिंबकरावाकडे वळून म्हणाला, "पहा! सेनापतिसाहेब! माझाच तर्क बरोबर आहे. तरी मी म्हणत होतों की, निजामानीं पेशव्याशीं सलोखा करा असें आम्हाला लिहिलें कसें?" आता मला सारा उमज पडला

"मग सांगा पाहू, कसें लिहिलें?" त्रिंबकरावांनीं विचारलें, "आणि आजच्या पत्रांत काय लिहिलें आहे?"

"सेनापतिसाहेब! आमचे निजाम किती पाताळयंत्री आहेत याची तुम्हाला कल्पना नाहीं हे पहा, ते आजच्या पत्रांत लिहितातः 'पेशवे अचानक तुमच्या हातीं सापडावे म्हणून त्यांना सेनापतीशीं तह करण्यासाठीं आम्ही मुद्दामच येथें

जावयाला सांगितले आहे, व त्याच्याशीं तडजोड करा असें पत्र तुम्हाला पेशव्यां च्या हस्तकाहातीं दिले आहे पण आपण कोणत्याही कारणाने पेशव्याची गय करू नये त्याना सेनापतींच्या माह्याने भेटीला बोलावून पकडून त्यांच्या सर्व मंडळीसह कैद करून आमच्याकडे पाठवावे पुढें त्याचा काय न्याय करावयाचा तो आम्ही करू!' काय समजला सेनापतिसाहेब! निजामाचे फर्मान हे असें आहे आणि तुम्हाला त्यांनी काय लिहिले आहे?"

"मलाही तसाच मजकूर लिहिला आहे पण निजामाच्या ह्या पत्राचा अर्थच मला कळला नाही. 'पेशव्याना आमच्याकडे पाठवावे' म्हणजे काय? निजामानीं माझ्यावर तरी इतकी हुकमत गाजवावयाला नको आहे मी कोणत्याही निमित्ताने त्यांचा मिंधा नाही. त्याचे व माझे नाते बरोबरीचे आहे"

"सेनापतिसाहेब! तुम्ही निजामाचे मिंधे नाही म्हणता, मग पेशव्याचा नाश करण्यासाठीं तुम्हीं त्याच्यापाशीं का मदत मागितली बरे?" बडेखानाने विचारलें,

"का मदत मागितली हे काय विचारता?" त्रिंबकरावाने रागानें विचारले. "हा शेजारधर्म आहे पेशवे विजयी अथवा पराभूत होण्यावर माझें एकट्याचेच भवितव्य अवलंबून आहे असें नाही, तर निजामांचीही तीच अवस्था आहे इतकेच काय, पण निजामाची परिस्थिति माझ्याहीपेक्षा बिकट आहे मी आणि पेशवे वैरी झालो तरी एका राजवटीचे सेवक व एका देवाधर्माचीं लेकरें आहों. मी आज मित्रभावाने हात पुढे करण्याचा अवकाश, कीं पेशवे व आम्ही एक होऊ पण तुमचे तसे नाहीं खानसाहेब! तुम्हा मुसलमानावर पेशवे इतका विश्वास टाकण्याला कधींच तयार होणार नाहींत यास्तव पेशव्याचे पारिपत्य करून आपली बाजू बळकट करण्यासाठीं तरी निजामांना माझ्याच तोंडाकडे पहात बसणे अवश्य आहे"

"सेनापतिसाहेब! तुम्हाला जर इतका अभिमान असेल, तर होऊन जाऊ द्या आम्ही या मोहिमेंतून अंग काढून घेतों, व तुम्ही पेशव्याना कसे पुरे पडता ते पाहतों" बडेखान नाक फेंदारून म्हणाला.

"तर मग होऊन जाऊं द्या इतकी जर तुम्हांला घमेंड असेल, तर होऊन जाऊ द्या! खानसाहेब! तुम्ही कसल्या भ्रमात आहां? तुम्हा मुसलमानांची मर्दुमकी काय ती आतांच दिसून आली कीं!" त्रिंबकराव पायातळीं मरून पडलेल्या तुरुकताजखान व गैबखान यांच्याकडे बोट दाखवून म्हणाले, "ही पह

तुमची मर्दुमकी आमच्या पायांतळीं लोळते आहे! मराठ्यांच्या समशेरीचा सवाई सपाटा हा असा आहे! काय समजलां? तुम्हाला मीं मदतीला बोलावलें, तें आमचे खदक एरव्हीं बुजत नव्हते ते असे तुमच्यांतल्या मुड्यांनीं बुजविण्यासाठीं नव्हे कांहीं! मी कालपासून तुमचीं लक्षणे पहात आहें, जिथे तिथे 'मी!' असाच तुम्हाला ज्या त्या ठिकाणी मीपणा गाजवावयाचा असेल, तर मी स्पष्ट सांगतों, मला तुमच्या मदतीची मुळींच गरज नाहीं तुमच्या निजामाची मला काडीइतकीदेखील पर्वा नाहीं तुम्ही आताच्या आता खुशाल चालते व्हा. मीं मोहिम आरंभिली आहे, ती तडीला नेण्याचें सामर्थ्य माझ्या अगीं आहे"

त्रिंबकराव इतक्या सडेतोडपणानें बोलले, तेव्हां कुठें बडेखानाच्या डोक्यांत कांहींसा प्रकाश पडला, की सध्या तरी त्रिंबकरावाशिवाय आपले कांहींच चालावयाचें नाहीं. त्याला मनांतून त्रिंबकरावाचा मनस्वी संताप आला होता. पण तो बाहेर दाखविण्याची आता त्याची छाती होईना तेवढयातल्या तेवढयात त्याने स्वतःशी विचार करून पाहिला, 'या वेळीं आपण दाभाडयाशीं फटकून वागलों तर काय होईल? आपण एकटयानेंच पेशव्यांना पाडाव करू शकणार नाहीं काय?' पण लगेच त्याला मनातल्या मनांत उत्तर मिळालें 'पेशव्यांचा वेळीं आपण पाडाव करूं शकलों, तरी दाभाडे आपला पाडाव करावयाला उभे रहातील, व पेशवे त्याना सामील होतील मग त्यांच्या संयुक्त सैन्यासमोर आपला कांहींच पाड लागावयाचा नाहीं' पुन्हा दुसरा प्रश्न त्यानें स्वतःला केला, 'बरें, आपण या वेळी पेशव्याशीं संगनमत केलें तर?' त्या प्रश्नाचेंही त्याला मनोमय उत्तर मिळालें, 'तरीही दाभाडे आपणावर उलटावयाला कमी करणार नाहींत' असा साधकबाधक विचार करतां करता बडेखानाला परिस्थितीची जाणीव होण्याला फार वेळ लागला नाहीं

तेवढ्यांत भास्कररामानेंही त्या दोघासमोर शांतिपाठ गाइला, "खानसाहेब! सेनापतिसाहेब! तुम्ही यावेळीं इथे आपसात भांडत बसा, व तोवर पेशवे तुम्हां दोघाच्याही हातावर तुरी देऊन पळून जाऊ देत!"

कोन्हेरराम तेवढ्यांत घाईघाईनें तेथें आला व म्हणाला, "सेनापतिसाहेब! खानसाहेब! तुम्हीं हें काय आरंभिले आहे? आपसात भांडण्याची ही दुर्बुद्धि तुम्हांला कुठून सुचली? सेनापतिसाहेब! आपण रात्रीं काय बोललों? सकाळीं काय विचार केला? मीं एथवर जें कारस्थान चांगले रंगविले, त्या रंगाचा तुम्ही असा बेरंग करणार?"

" बस्स ! मला यापुढें ह्या परक्यांशीं दोस्ती नको माझ्या स्वतःच्या हिमतीवर मला काय पाहिजे ते करता येईल. यश येणार नाहीं अशी खात्री होऊन दोस्तीच करावयाची झाली, तर मी पेशव्यांशीं दोस्ती करीन तेच मला ह्या मुसलमानांपेक्षां जवळचे आहेत " त्रिंबकराव म्हणाले

कोन्हेररामाने तेथें येताच भास्कररामाला पाहिले, त्याबरोबर त्याला अचंबा वाटला कीं हा इकडे कुठे ? तो भास्कररामाला एकदर वृत्तान्त विचारणार, तोंच त्रिंबकराव पेशव्यांशीं दोस्ती करावयाला तयार झालेले पाहून 'छे ! छे ! सेनापतींचें पेशव्याविषयीं इतके चागले मत होणे मुळीच चागले नाहीं' असें स्वत शीं पुटपुटत तो भावाचा विचारपूस करण्याचे सोडून त्रिंबकरावाना हळूच म्हणाला, " सेनापति साहेब ! तुम्ही मस्तानीवर पाणी सोडणार ? मी आपणासाठी आजवर इतकी खटपट केली ती एकूण फुकटच तर ? गिरिजाबाईसाहेब वगैरे मडळी आपल्या विरुद्ध पेशव्याना सामील आहेत, त्याचा शोध करण्याविषयी मी त्याच्याशीं उगाचच वैर सपादन केले म्हणावयाचें तर ? "

" काय ? गिरिजा पेशव्याला सामील आहे ? "

" यात काय सशय ! "

" आणि मस्तानी—"

" काहीं बोलावयाचे नाही कीं चालावयाचें नाही पण आपणच जर असे हातपाय गाळले, तर मी काय करू ? "

" मस्तानीचे काय झाले ? ' बडेखानाने मध्येच औत्सुक्याने विचारले

कोन्हेरराम त्रिंबकरावाना एकीकडे डोळा मारीत बडेखानाला म्हणाला " खान-साहेब ! पेशव्यांना मार्गातून दूर लोटीपावेतों मस्तानी कोणीं देखील मनात आणूं नये." त्याने खानाला बाजूला घेऊन त्यालाही कांहीं कानमत्र दिला तो कानमत्र खानाला मस्तानीविषयीं आशा लावणारा होता.

" बस्स ! बस्स ! ' बडेखान मनातून मस्तानी आपणाला मिळेल ह्या आशेनें पण बाह्यात्कारीं मारे विचारशीलतेचा आव आणून म्हणाला, " सेनापतिसाहेब ! आपण झाल्या गेल्या गोष्टी विसरून पेशव्याचा समाचार प्रथम घेतला पाहिजे. चला पाहूं ! मात्र सेनापतिसाहेब ! जातां जाता आपणाला एका गोष्टीची तडजोड करावयाची आहे पेशवे आतां आपल्या हातीं कैद होणार यांत तर शकाच नाहीं.

त्यांचा जनानखाना देखील आता अचानक आपल्या हातीं सापडणार, व अपार दौलतही सापडणार तेव्हां ह्या लुटीची वाटणी कशी करावयाची ? ”

कोन्हेरराम म्हणाला, “ पण खानसाहेब !—”

कोन्हेरराम काय म्हणतो तें पूर्णपणे ऐकून न घेता बडेखान म्हणाला, “ मला वाटते, पेशवे, त्याचा जनानखाना व त्याची दौलत असे त्या लुटीचे तीन हिस्से करावे. पैकी पहिल्या दोन हिश्शातला पाहिजे तो हिस्सा पेशव्यानीं घ्यावा, राहिलेला हिस्सा मी घेईन दौलत तुमच्या आमच्या शिपायाना लुटू द्यावी का ? बरोबर आहे की नाही ? ” बडेखानानें कोन्हेरराम व भास्करराम याच्याकडे पहात विचारले

“ पण खानसाहेब ! ” कोन्हेरराम पुन्हा बडेखानाला मनांतल्या मनात हसत म्हणाला, “ आधी लूट मिळू दे तरी ! मग लुटीची वाटणी करा नाहींपेक्षा तुमच्या ह्या बेतात जो वेळ विनाकारण जातो आहे, तेवढ्यात शत्रु सावध व्हावयाचा व तुम्हाला लूट मिळण्याऐवजीं तुम्हीच लुटले जावयाचे ! ”

बडेखान कोन्हेररामाचे हे शब्द ऐकून जरा ओशाळल्यासारखा होऊन नुसते ‘बरें’ असे म्हणून गप्प झाला त्रिंबकरावानीही ‘हे मूर्ख माणूस निजामानीं माझ्या मदतीला कशाला पाठविले नकळे’ असे मनातल्या मनात म्हटलें. पण ते मनात म्हटले, बाहेर बोलून दाखविले नाही

“ कोन्हेरराम ! तू बरोबर येतोस ना ? ” त्रिंबकरावानीं विचारलें

“ छे ! छे ! सेनापतिसाहेब ! मी येता उपयोगी नाही ह्या कारस्थानात माझा हात आहे अशी नुसती गुणगुण जरी पेशव्याच्या गोटात गेली, तरी सर्व कारस्थान फिसकटून जाईल यास्तव मला आणखी काहीं काळ अगदीं नामानिराळा राहू द्या ” कोन्हेरराम म्हणाला

“ होय सेनापतिसाहेब ! आम्हाला सध्या नामानिराळे राहू द्या कारण आमचा व पेशव्याचा बारावा बृहस्पति आहे हे आपणाला माहीतच आहे मी पुण्याहून निघालो तो एथवर येईतों पेशवे व त्यांचे लोक यांची नजर चुकविण्यासाठीं कसकसे वेश पालटून काय काय उलाढाली करीत आलों, ते माझें मला माहीत ! ” भास्कररामानें कोन्हेररामाला पुष्टि दिली.

“ शिवाय माझ्या मागेंही आपण थोडींथोडकीं कामें लावून दिलीं आहेत असें

नाहीं आपण किल्ला सर केल्यावर गढी सर करण्याची जबाबदारी माझ्यावर आहे म्हणून म्हणतो, आपण ती बाजू तेवढी सभाळा" कोन्हेरराम पुन्हा म्हणाला

कोन्हेररामाचा सल्ला त्रिंबकरावांना व बडेखानालाही पटला बडेखान म्हणाला, "आपण इतका वेळ उगाच दवडला ते दोघे बदमाष एथून जिवत निसटले हें तर फार वाईट झालें ते एव्हाशीं आपल्या गोटात जाऊन पोंचले असतील, व त्यांनीं सागितलेल्या प्रकारावरून पेशवे सावधही झाले असतील"

"त्याची एवढी चिता करण्याचें कारण नाहीं पेशव्याच्या छावणीसभोंवार थोड्या अतरावरून आमच्या सैन्याच्या चौंफेर गराडा सकाळपासूनच पडला आहे पेशव्याच्या बाजूच्या एका मुगीलाही त्या गराड्यातून आत किंवा बाहेर रिघाव मिळणार नाहीं" त्रिबकराव म्हणाले

"कोण दोघे निसटले ?" कोन्हेररामानें विचारलें त्याला पूर्वी तेथें झालेली खणाखणी माहीत नव्हती

"ते बदमाष !" बडेखान दात ओठ खात दाढीवरून हात फिरवीत म्हणाला, "तुमचे नारायणजी व आवजी"

"असे ? त्याना तर मीं आताच त्या पडक्या देवालयाजवळ त्या साधूशीं बोलताना पाहिलें मला पहाताच ते गाभाऱ्यात जाऊन दडून बसले पण मला तेव्हां सशय आला नाहीं"

"हा अनर्थ त्यानीं केला !" त्रिंबकराव तुरुकताजखान व बडेखान यांच्या मुड्द्यांकडे बोट दाखवून म्हणाले

"आणि हा कोण ?" भास्कररामाने तेथेंच बाजूला पडलेला बळिरामाचा मुड्दा पाहून आश्चर्यचकित होऊन उद्गार काढले, "हा तर बळिराम ! हा इकडे कसा आला ?"

"कां बरें ?" कोन्हेररामाने विचारलें

"कां बरें ?" त्रिंबकरावांनींही तोच प्रश्न केला.

"आपण अगोदर तिकडे जा ह्या गोष्टींत मन घालू नका मात्र आपण आतां सांगितलें, त्यावरून मला त्या साधूचा संशय येऊं लागला आहे सकाळीं आपण इकडे येतांनाही आपणाला हाच साधु तेथेंच भेटला होता तो एखाद्या कारस्थानाच्या मुळाशीं असावा असा संशय घ्यावयाला पुष्कळ जागा आहे" कोन्हेरराम म्हणाला.

"तर मग त्याला प्रथम कैद केलें पाहिजे." त्रिंबकराव म्हणाले

" त्या हरामजाद्यासकट तें देऊळ जाळून पोळून जमीनदोस्त केलें पाहिजे हरामखोर काफर देवळांत लपून बसतात काय ? बस्स ! जिथें जिथें देऊळ सांपडेल तिथें तिथे ते पाडून त्याच्यावरून गाढवाचा नागर फिरवला पाहिजे "

" ह ! खानसाहेब ! तुमची जीभ पुन्हा सैल सुटली ! मी हिंदु आहें हें तुम्ही विसरला काय ? " त्रिंबकरावांनीं बजावलें

" तुम्ही तर दोस्त ! तुमच्याविषयीं मी कुठें काय म्हणतों आहें ? " बडेखान ताळ्यावर येऊन म्हणाला

" तुम्ही आम्ही दोस्त कोठवर ? राजकारणांत तुमचें आमचें ध्येय एक आहे तेथवर हिंदु-मुसलमान हा भेद मनात आणून तुम्ही मुसलमानासारखे वागू लागाल, तर आम्हालाही हिंदूसारखे वागावे लागेल तुम्ही आमचीं देवळें फोडावयाला निघाला तर आम्हीही तुमच्या मशिदी व दरगे फोडून जमीनदोस्त करू म्हणून म्हणतों, जरा विचारानें बोला " त्रिंबकरावानें पुन्हा बजावलें.

कोन्हेरराम म्हणाला, " ते खरें, पण गुन्हेगाराचा शोध तर लागला पाहिजे ! कीं वळचणीचे विच तसेच वळचणीला राहू द्यावयाचे ? "

" मी तसें कुठें म्हणतों ? गुन्हेगाराचा शोध जरूर लागला पाहिजे " त्रिंबकराव म्हणाले

" झाले तर मी तरी तेंच म्हणतों आहे " बडेखान हळूच म्हणाला

" तुम्ही तेच म्हणत नव्हता, तुम्ही साऱ्या हिंदूना काफर म्हणून शिव्या देत होता ! " त्रिंबकराव म्हणाले

" बरें, दोस्त ! माझी चूक झाली ! माफ करो मेरे भाई ! माफ करो " असें म्हणून बडेखानानें त्रिंबकरावाच्या दाढीला हात लावला

पाव घटकेपूर्वी सिंहासारखी गर्जना करणारा बडेखान इतक्या थोड्या वेळांत इतका गरीब-अगदीं गोगलगाईसारखा गरीब झाला, हें पाहून त्रिंबकरावानाही त्याची कींव आली त्यांनीं त्याला आणखी तरवारीच्या धारेवर धरलें नाहीं. त्यानीं भास्करराम व कोन्हेरराम याच्या ताब्यात काहीं शिपायी देऊन त्या साधूला व देवळांत नारायणजी आणि आवजी सांपडले तर त्यांनाही कैद करण्या-साठीं जावयाला सागितलें तेवढ्यात त्याना मस्तानीची आठवण झाली, त्या बरोबर त्यांनीं त्या साधूला वगैरे कैद करण्याची जबाबदारी एकट्या भास्कररामा-वरच टाकली व कोन्हेररामाला म्हटलें, " कोन्हेरराम ! तू आमच्या बरोबर पाहि-जेस. एरव्हीं तू जाळ्यांत अडकवून ठेवलेली शिकार आपल्या हातीं यावयाची नाहीं."

" खरेंच, कोन्हेरराम ! तू बरोबर असल्याशिवाय आमचें काम व्हावयाचें नाहीं ' बडेखान म्हणाला

त्रिंबकराव व बडेखान, दोघेही बोलले ते एकाच अर्थाने बोलले व त्याचा एकच अर्थ कोन्हेररामाच्या ध्यानीं आला पण त्या दोघांना मात्र आपले संदिग्ध बोलणें दुसऱ्याला कळलें नाहीं असेंच वाटले कोन्हेररामानें जसें त्रिंबकराव दाभाडयाना, तसेच त्या तिघाही पठाण सरदाराना व शुक्रतीर्थावर येण्यापूर्वी निजामाची भेट घेऊन येताना निजामालाही मस्तानाविषयी नादीं लावून ठेविलें होतें, व एकाला दिलेले वचन दुसऱ्याला कळू नये अशाविषयी मात्र दक्षता राखली होती त्या गोष्टीविषयीं जास्त चर्वितचर्वण होऊन दोघानाही आपल्या थापाथापीचा सुगावा लागू नये म्हणून कोन्हेररामानें फारसे आढेवेढे न घेतां त्यांच्याबरोबर जाण्याला मान्यता दिली

कोन्हेरराम म्हणाला, " ठीक आहे मी येतो पण जरा विलबाने येतों. मीं तुमच्याबरोबरच आलें पाहिजे असे नाही, माझें काम मी करतों "

" मग आताच कां नाहीं येत ? " बडेखानानें विचारलें

कोन्हेरराम म्हणाला, " असे पहा, मला पेशव्याच्या गोटातील माणसें ओळखू शकतील तें मला नको आहे यास्तव मी तिथें निराळ्या स्वरूपात येईन "

" म्हणजे ? " त्रिंबकरावानीं विचारलें

" आपणांला काय त्याचें ? मी येतो म्हटल्यावर येतो. त्या देवालयातील साधूला मी प्रथम हस्तगत करणार आहें ते काम एकट्या भास्कररामाच्या हातून पार पडेल असे मला वाटत नाहीं " कोन्हेरराम म्हणाला

भास्कररामाच्या हातून ते काम पार पडले असतें किंवा नाहीं, हा प्रश्नव निराळा होता पण कोन्हेररामानें ती सबब सागताना भास्कररामाला एकीकडे डोळा मारला, त्यावरून भास्कररामानेही कोन्हेररामाचीच री ओढली त्रिंबकराव व बडेखान यानींही मग जास्त आढेवेढे घेतले नाहीत ते दोघेही बोलत बोलत पेशव्यांच्या छावणीकडे निघून गेले त्याच्या सैन्याच्या दोन तुकड्या त्यापूर्वीच तिकडे रवाना झाल्या होत्या

कोन्हेरराम व भास्करराम ह्या दोघांनीं लगेच त्याच्या वांटणीला आलेल्या शिपायांना आज्ञा केली, " तुम्ही जाऊन महाकालीच्या देवालयासभोंवार थोड-थोड्या अंतरानें पहारा करीत उभे रहा, व देवालयात कोण येतात, यावर नुसती नजर ठेवा. आम्ही तोंवर येतोंच."

प्रकरण एकविसावें

# ही मंडळी इकडे कुठें ?

"एकूण तू एथवर आलास, ठीक झालें पण मी तुला एक महत्त्वाची गोष्ट विचारणार आहें मला थोडया दिवसांपूर्वी असें कळलें कीं, कृष्णरावाच्या संसाराला तू चूड लावलीस खरें का हे ? " कोन्हेररामानें भास्कररामाला विचारलें.

" मी ? छे ! मुळींच नाहीं " भास्करराम उत्तरला. पण हे उत्तर देताना त्याची चर्या एकदम उतरली चर्या उतरण्याला कारण असें कीं, कोन्हेररामानें त्याला जो प्रश्न विचारला, त्यात बरेंच तथ्य होतें पेशवे, कृष्णराव वगैरे मडळी मोहिमेवर निघून गेल्यावर देवकी व राधा ह्या सास्वासुना भास्कररामाच्याच घरांत त्याच्या आश्रयाला रहात होत्या हें वाचकाना माहीत आहेच भास्कररामाच्या मनांत राधेविषयीं वसणारी पापबुद्धि निःशेष झाली नव्हती, इतकेंच काय पण ती कैक दिवस त्याच्या अतःकरणात तशीच दबा धरून बसली होती मत्स्यसहार करण्याच्या पापबुद्धीनें नदीच्या तीरावर साळसूदपणें बसून रहाणाऱ्या बगळ्याच्या ध्यानधारणेप्रमाणें भास्कररामानें बाह्यतः मात्र पश्चात्तापदग्धतेचें व साळसूदपणाचें सोंग घेतलें होतें, व राधा वगैरे मडळी त्याच्या घरीं रहावयाला आली होती पण कृष्णराव, बळिराम वगैरे मडळी आपल्या कामगिरीवर निघून गेल्यावर तो आपलें खरें हिणकस स्वरूप दाखवू लागला, तेव्हा देवकी व राधा यांचे डोळे उघडले. पण दोघींचेही डोळे उघडले असें म्हणण्यापेक्षा राधेचे डोळे उघडले व देवकीचें मन कलुषित होऊन तिची दृष्टि राधेच्या बाबतींत विकारवश झाली, हेंच खरें. राधेची एकच चूक ! तिनें लोकापवादाच्या फाजील भयानें प्रथमपासून भास्कररामाच्या अनीतिमूलक आचारविचारांवर पांघरूण घालून त्या निमित्तानें स्वतःची अब्रु बचावण्याचा प्रयत्न केला. राधाच या बाबतींत चुकली असें नाहीं हा स्त्रीस्वभावातील नैसर्गिक दोष आहे, व ह्या दोषामुळेंच समाजांत आजवर किती तरी निरपराधी व सच्छील स्त्रियांवर भलभलते अपवादात्मक आरोप शाबीत होऊन त्याना जन्मांतून उठावें लागलें आहे.

राधा आपल्या घरच्या माणसांपासून आपलें पूर्वचरित्र लपवून ठेवूं पहात आहे हें धूर्त भास्कररामाच्या ध्यानीं, प्रथम राधा रागानें आपल्या माहेराचा त्याग करून पुण्यांत

आली तेव्हां आले, व त्या व्रणावर काकदृष्टि ठेवूनच त्या दिवशीं भास्कररामानें तिला खुषीनें अथवा अडचणींत अडकवून वश करण्याचा मनोमय निर्धार करून साळसूदपणाचे ढोंग पाघरले होते राधा व देवकी एकट्याच सापडल्यावर त्याने राधेशीं दिवसेंदिवस विशेष सलगी करण्याचा उद्योग आरंभिला पण त्या बाबतींतही तो इतक्या सावधपणानें वागत होता कीं, राधेनें सशय घेऊन नापसती दर्शविली तर त्याला स्वत.ला 'तुझा माझ्याविषयीं उगाच गैरसमज झाला' अशी तिची समजूत करता यावी देवकीला तर प्रथम सशय येण्याचे कारणच नव्हते तिच्या तोंडावर भास्कररामाने राधेचे व आपले बहीण–भावडाचे नाते असल्याचे अनेकवार बोलून दाखविले होते राधेशीं भास्कर‌राम सलगी करू लागला तेव्हा देवकीला थोडासा सशय आला, पण तो राधेविषयीं आला राधा शक्य तों भास्कररामाशीं फटकून वागेना कारण आजवरचें गर्हणीय गुपित उगाच उजेडात येईल हें तिला भय. ह्या राधेच्या मित्रेपणामुळेच भास्कररामाला दुर्वासने-च्या वाटेने एकेक पाऊल पुढे टाकावयाला सवड मिळाली याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला चार सहा दिवसातच शेजाऱ्यापाजाऱ्याना नाही तरी घरच्या माणसाना, विशेषतः भास्कररामाची बायको ताराबाई हिला त्या दोघाच्या वर्तनाबद्दल सशय येऊ लागला ती राधेच्या नावाने धुसपुसू लागली, व देवकीपाशी कागाळ्या नेऊ लागली. देवकीला राधेच्या वर्तनाचा सशय येण्याला अवधि लागला नाही कृष्ण-रावाबरोबर जाण्याला राधा नाकबूल होती, तिच्या मनातून पुण्यातच रहावयाचे होतें, त्याचे कारण हेंच असावे असाही तर्क देवकीला करता आला व तिने राधेवर उघड दुर्वर्तनाचा आरोप करण्यालाही कमी केलें नाहीं हा हा म्हणता हा वाद इतका विकोपाला गेला की, देवकी व ताराबाई याच्या जाचामुळें देवकीला तिथे राहणे अशक्य झाले. 'तू आपल्या माहेरीं चालती हो' असे देवकीने तिला निक्षून सागितलें तेव्हाच भास्कररामालाही लोकापवादासाठी काहीं दिवस तरी पुणें सोडणे भाग पडलें तो ह्या सर्व गैर समजावर पडदा टाकण्यासाठी तारेला घेऊन पाडवगडाकडे निघून गेला व तेथून तो थोड्या दिवसानी पुण्यात माघारा आला त्याचा विचार की, आता काहीं तारा आपणाला विरोध करावयाला नाहीं, आता राधा आपल्या आटोक्यात येईल.

भास्करराम पुण्यात आला तो थेट निजामाकडे जाण्याच्या बेतानेंच आला होता. त्यानें आपला विचार देवकी व राधा याना कळविला, तेव्हा तर त्या

दोघींनाही भय पडले कीं, आपण आता पुण्यात एकट्याने कसें रहावें? बरें; पुण्यात रहावयाचें नाहीं तर जावें तरी कुठे ? देवकीच्या मनातून आपण भास्कररामाच्या सोबतीने आपल्या मुलापाशीं जावें असें होतें. भास्कररामानेंही तिला तिच्या मुलाकडे पोंचती करण्याचें कबूल केलें पण राधा माहेरीं जाण्याला तयार होईना, 'प्राण गेला तरी मी पुन्हा माहेरचें तोंडदेखील पहावयाची नाही' अशी राधेची प्रतिज्ञा होती, व ती प्रतिज्ञा मोडण्याला राधा तयार नव्हती बरें, भास्कररामाबरोबर कुठे जावें असेंही तिच्या मनांत मुळींच नव्हतें भास्कररामाचा नीच हेतु तिला आता पूर्णपणे कळून चुकला होता अशा स्थितींत तिला कृष्णरावाचा शोध करीत त्याच्या मागोमाग जाण्याशिवाय गत्यतर नव्हते. प्रथम तिचा विचार गर्भारपणामुळे प्रवासाची दगदग करू नये असा होता, पण आतां तिला त्याचें देखील काहीं वाटेनासें झाले ती मनात म्हणाली, जिथे स्वतः-च्या अब्रूवर सकट कोसळण्याची भीति, तिथे गर्भारपणचे चोचले काय करावयाचे आहेत ! आणखी एक गोष्ट तिच्या मनाला लागली ती ही कीं, कोन्हेरराम आपल्या व आपल्या पतीच्या नाशावर टपून बसलेला आहे व भास्कररामाचें त्याला साह्य आहे असे तिला कोणी सांगितले कोन्हेरराम तर त्या दोघावर रागावून सूड घेण्याच्या निर्धाराने जळफळत दसऱ्याच्या दिवशीच घरातून बाहेर पडला होता, हे राधेला माहीत होतेच तो आपल्या पतीला कोणत्या ना कोणत्या उपायानी गोत्यात आणण्यासाठी झटेल याविषयीं राधेला शंका नव्हती त्यालाच भास्करराम सामील झाला आहे असें तिच्या कानी यावयाला व भास्कररामाने त्या अर्थाचे उद्गार तिच्यापाशीं काढावयाला एकच गाठ पडली गोष्ट तसे पाहू गेल्यास अगदींच साधी, पण राधा धूर्त असल्याने तिनें तर 'ता' म्हणताच 'ताकभात' ओळखला एके दिवशीं भास्कररामालाच तिच्यापाशीं कृष्णरावाचा विषय काढण्याची बुद्धि सुचली. ती एकटी आहे असें पाहून त्यानें तिला प्रश्न केला, " राधे ! होऊ नये ती गोष्ट जर झाली, कृष्णराव जर ह्या मोहिमेत मारला गेला, तर तू काय करशील ? "

राधेने त्यावर त्याला शुद्धभावाने विनवून सांगितले, " मी तुमची धाकटी बहीण आहें, तुम्हाला माझ्या चुड्याची काळजी नाही का ? "

" तें खरें, पण इतकेंही करून जर होऊ नये ते झाले तर ? "

" मग पुढचें पुढे "

एवढेंच, फक्त एवढेंच संभाषण भास्करराम कावेरीला घेऊन पांडवगडावर आण्यापूर्वी राधा व भास्करराम यांच्यांत झालें होतें. यापेक्षां जास्त स्पष्ट तोही कांहीं बोलला नाहीं व तीही कांहीं बोलली नाहीं पण त्यावरून राधा एवढें मात्र समजून चुकली कीं, यापुढें भास्कररामाची सगत असणे धोक्याचे आहे देवकीचा तिला अजूनही आग्रह चाललाच होता कीं, तिनें माहेरीं जावें, तिनें आपणाबरोबर येऊं नये. असे म्हणण्याला देवकीला मुख्य कारणें दोन होतीं पैकीं एक कारण, राधेची गर्भारपणाची अडचण हें व दुसरें तिला यापुढें राधा आणि भास्करराम यांना एकत्र राहूं द्यावयाचें नव्हते. पहिली अडचण एवढी म्हणण्यासारखी महत्त्वाची नव्हती. दोन अडीच महिन्याच्या गर्भारशा बायकोला प्रवासाचा फारसा त्रास होत नाहीं हे देवकीला स्वानुभवावरूनही माहीत होते. पण प्रवासांत झाला तरी राधा व भास्करराम यांचा संबध येणारच, म्हणून देवकीला राधा बरोबर नको होती पण राधेला माहेरीं पाठवावयाचें झालें तरी भास्कररामाशिवाय दुसरा कोण तिला पोंचवावयाला जाणार ! अखेर देवकीनें निरुपायास्तव राधेला आपणाबरोबर कृष्णरावाकडे नेण्याचे ठरविले त्यांना सोबत भास्कररामाची होतीच !

त्या तिघांचे प्रवासात कांहीं दिवस गेले. मार्गांत भास्कररामाचें 'प्रियाराधन' सुरूच होतें त्याचा अतिरेक होता होता इतका झाला कीं, जसा देवकीला, तसाच राधेलाही तो सहन होईना देवकीला इतके दिवस राधेच्या वर्तनाविषयीं संशय होता, पण आतां भास्कररामाविषयींही संशय वाटू लागला. राधा बाजूलाच राहिली व भास्करराम आणि देवकी यांचेच भांडण झाले. भांडणांत भास्कररामानें मुद्दाम राधेचा कैवार घेण्याचा बहाणा केला. त्याचा परिणाम राधेविषयीं देवकीच्या मनांत जास्त संशय उत्पन्न होण्यांत झाला. राधा व भास्करराम हीं दोघें एकमताचीं आहेत असें तिच्या मनानें घेतलें.अशा प्रकारें देवकीच्या मनात संशयाचें काहूर उसळून तिनें राधेचा त्याग करावा, ह्राच राधेची तरफदारी करण्यांत भास्कररामाचा हेतु होता. तो त्याचा हेतु कल्पनेबाहेर सिद्ध झाला भास्कररामानें राधेचा कैवार घेतला, व राधा भास्कररामाच्या फाजील वर्तनाबद्दल त्याचा निषेधही करीत नाहीं, यापेक्षां आणखी कोणताच पुरावा राधा व भास्करराम यांना अपराधी ठरविण्याला देवकीला आवश्यक वाटला नाहीं. इतकेंच काय; पण 'पुन्हा जर त्या साध्वीविषयीं असा संशय घेशील तर नरडी दाबून तुझा प्राण घेईन' असें देवकीला निक्षून सांगण्यालाही भास्कररामानें कमी केले नाहीं. भास्कररामानें आपणाविषयीं इतकी

उपमर्दकारक भाषा वापरली व ती राधेनें मुकाटपणें सहन केली, यावरून जो कयास दुसऱ्या कोणाही विकारवश माणसाने बांधला असता तोच देवकीनेंही बाधला, व 'सून अवदसा अगदींच चळली ती व तो चांडाळ हीं एक होऊन आपला खरोखरच नरडी दाबून प्राण घेऊ शकतील' असें भय देवकी ला वाटू लागले, व स्वसंरक्षणासाठीं म्हणून त्याच रात्रौ ती जी भास्करराम आणि राधा याचा डोळा चुकवून बाहेर पडली, ती पुन्हा त्या दोघांनाही कोठेंच आढळली नाहीं भास्कररामानें तिच्या मुळीच शोध न करतां 'म्हातारडी गेली तर गेली, तुला काळजी नको मी तुझा पाठीराखा आहे' अशी राधेची समजूत करण्याला सुरवात केली, व राधा आता पूर्णपणे त्याच्या अंकित अमल्यामुळे तिलाही स्वतंत्रपणें काहींच करता येईना. पण तिला भास्कररामाच्या कावेबाजपणाचा अंत अखेरपावेतों लागला नाहीं प्रथम भास्कररामाने देवकीचे कठोर शब्दानी ताडण करून तिला ठार मारण्याचीही धमकी घातली ती आपला कैवार घेऊनच, अशा भावनेनें राधा तेव्हां गप बसली, व देवकी एकाएकीं बेपत्ता झाल्यावर भास्कररामानें राधेला तिच्या नवऱ्याकडे पोंचती करण्याचे वचन दिले, तेव्हा तर राधेचा भास्कररामाविषयींचा सारा संशय पूर्णपणे दूर झाला व ती त्याच्याबरोबर प्रवास करण्याला आनंदानें कबूल झाली.

आणखी काहीं दिवस भास्करराम व राधा यानीं एकमेकावर पूर्ण विश्वास टाकून प्रवास केला मार्गातच भास्करराम निजामाकडे गेला तरीही राधा त्याच्या बरोबर होतीच तिनें नेहमीं 'कृष्णरावाचा शोध करा व मला त्यांच्याकडे पोंचती करा' असें भास्कररामाला विनवून सागावे, व भास्कररामानेही तिला 'होय' अशी आशा लावावी. त्या आशेचा परिणाम शेवटीं काय झाला असता हे आपणाला कळण्याला काहीं साधन नाहीं का कीं, प्रवासातच राधेला अनोळखी लोक स्वाभाविकपणें भास्कररामाची बायको समजूं लागले, व भास्कररामानेही राधेला हिताचा म्हणून उपदेश करण्याला सुरवात केली कीं, 'बरेच लोक पेशव्यांच्या व कृष्णराव हा पेशव्यांचा एकनिष्ठ सेवक म्हणून त्याच्याही नाशावर टपलेले आहेत त्याना जर तूं कृष्णरावाची बायको आहेस हें कळलें, तर तुझ्यावर मोठा कठीण प्रसग येईल. यास्तव तू लोकांना आपलें खरें नांव व खरें नातें कोणालाही सागू नकोस'.

भास्कररामाने राधेला सुचविली ही युक्ति काहीशी धाडसाची होती तर खरीच;

पण राधेनें तेंही धाडस भास्कररामावर विश्वासून करण्याला मागेंपुढें पाहिले नाहीं कारण काय पाहिजे त्या खटपटी लटपटी करून आपण भास्कररामान्या ओळखीनें एकदां आपल्या पुरुषाच्या पदरीं जावे अशी उत्कठा राधेच्या मनाला लागून राहिली होती. ह्या नव्या युक्तीने राधेचा कितपत बचाव झाला असेल तें कोण जाणे, पण त्या दोघाना नवरा व बायको या नात्याने ओळखणारे मूठभर लोक त्यामुळें जगात निर्माण झाले एवढे मात्र खरे त्यातले कदाचित् काहीं भास्करराम व राधा याना प्रथमपासून ओळखणारे असतील, व त्यानी त्या दोघाच्या तोंडून हें नवे नाते ऐकून त्याचा धिक्कार केला असेल, त्यात काहीं कृष्णरावाच्या किंवा राधेच्या माहेरच्या जिव्हाळ्याचीं माणसें असतील, त्यानीं त्या त्या मडळीला हा शोचनीय प्रकार मुद्दाम कळविला असेल, त्यातल्याच कोणीतरी कोन्हेररामाला हा प्रकार सागितल्यामुळे त्याने ह्या प्रकरणाच्या शिरोभागीं दर्शविल्याप्रमाणे भास्कररामापाशीं ह्या बाबतींतील खऱ्या प्रकाराची चौकशी केली असेल भास्करराम शुक्लतीर्थाजवळच्या एका गावीं नर्मदेच्या काठीं येऊन पोचला, तोही राधेला आपली अर्धांगी या नात्यानेंच घेऊन आला होता बाजीराव पेशव्याचा मुक्काम भडोचला आहे असें कळताच राधेनेंच भास्कररामाला आग्रह कर करून तेथे येण्याचा आग्रह केला होता. तेथें पेशव्याच्या आश्रयाला असलेला आपला पति आपणाला भेटेल अशी तिची खात्री होती भास्कररामाला ही हातची शिकार दवडावयाची नसल्याने तो राधेला पेशव्यांच्या सन्निध आणण्याला तयार होईना. पण पेशव्याचा मुक्काम जवळच आहे असें कळल्यामुळें राधेला तेवढाच धीर आला होता. त्या धीरावर तिनें पेशव्याच्या छावणींत जाण्याचा हेकाच धरला आतां राधा आपल्या हातची जाणार असें पहाताच भास्करराम उलटला त्यानें अतिप्रसग करण्याची वेळ आणली तेव्हां राधा कसल्यातरी निमित्तानें जी आपल्या बिऱ्हाडांतून भास्कररामाचा डोळा चुकवून अपरात्रीं बाहेर पडली, ती आजवर त्याला पुन्हा भेटली नव्हती

ह्या सारा वृत्तान्त भास्कररामानें कोन्हेररामाला थोडक्यांत निवेदन केला अर्थातच तो वृत्तान्त निवेदन करताना त्यानें त्याच्या मुळाशी असलेली आपली पापवासना बेमालूमपणे गुप्त ठेवली त्याचा कोन्हेररामाच्या मतावर इतका इष्ट परिणाम झाला कीं, त्यानें भास्कररामाला राधेविषयीं इतकी निःस्वार्थी कळकळ दाखविल्याबद्दल दोषही दिला !

आपणावर राधेविषयीं येऊ पाहणाऱ्या आक्षेपांचे याप्रमाणें अचूक खडण केल्या- वर भास्कररामाने वाट चालता चालतां साहजिकपणेंच कोन्हेररामापाशीं मस्तानीचा विषय काढला, " दादा ! मस्तानीवर सेनापतीचाही डोळा आहे व बडेखानाचाही डोळा आहे तिकडे निजामही मस्तानी कधीं एकदा हातीं लागते अशी वाट पहात बसला आहे आणि ह्या सर्वांचा भरवसा एकट्या तुमच्यावर आहे याचा अर्थ काय ? "

" त्याचा अर्थ फार गहन आहे " कोन्हेरराम हसून भास्कररामाला म्हणाला, " वस्तुतः मस्तानी निजाम, बडेखान, सेनापति यापैकीं कोणाच्याही पदरीं आली तरी त्याविषयीं मला हर्षविषाद कांहींच वाटणार नाहीं मात्र मस्तानी व पेशवे यानीं माझा जो अपमान केला आहे, त्या अपमानाचा मी पुरेपूर सूड घेणार ! हे सारे लोक स्त्रैण आहेत. एवढा त्याचा स्वभावविशेष ध्यानीं घेऊन मीं ह्या सर्वासमोर मस्तानीचे आमिष धरलें आहे ह्या तिघाच्याही स्त्रैणपणाचा अग्नि चेतवून मी त्यात मस्तानी व पेशवे यांची आहुति देणार, व त्याच अग्नींतली चिमुटभर राख घेऊन ह्याच कारस्थानाच्या नव्या मत्राने ना मंत्रून निजाम किंवा दाभाडे यांच्यात जो कोणी परिणामीं यशस्वी ठरेल त्याच्या कपाळीं लावून त्याला वश करून त्याच्या हातून माझा कार्यभाग साधून घेणार केवळ पराक्रमाच्या जोरावर नशीब काढण्याचे दिवस आपल्या वाट्याला कांहीं येत नाहींत, म्हणूनच मीं हा भाग्योदयाचा रामबाण उपाय शोधून काढला आहे मी जातिवंत भिक्षुक आहे. 'साधले तर बारसें नाहीं तर बारावें' हें माझें ब्रीदवाक्य आहे."

" पण दादा ! यात खरी थोरवी आहे असे तुम्हाला वाटतें का ? " भास्कर रामानें विचारलें

" खरी थोरवी व खोटी थोरवी ! खऱ्याखोट्याचा इतका काटेतोल निवाडा ह्या जगात कुठे होतो ? देखल्या देवाला दंडवत घालणें, उगवत्या सूर्याची आराधना करणें, व वारा वाहील तशी पाठ फिरविणें, हे जनरूढीच्या शाब्दिक शहामतात हिणकस गणलीं जाणारीं कुभाषितेंच प्रत्यक्ष व्यवहारात हेमकारांनें जसकून सत्या च्या कसोटीला उतरतात. खऱ्याची दुनिया आता नाहीं भास्करराम ! काळ आणि आपण याची एकवाक्यता झाल्याशिवाय आयुष्यात मोजही नाहीं व यशही नाहीं काळ आपणाला अनुकूल झाला पाहिजे तरच आपण नशीब काढूं शकतो, व काळाला अनुकूल करून घेण्यासाठीं, जसा काळपुरुष आपल्या लहरीप्रमाणे नाचू लागेल तशी त्याच्या मागेमाग आपण त्याची साथ केली पाहिजे."

"तें खरे, पण केवळ मस्तानीसारख्या बायकाना इरेला घालून राजकारणाचे डाव खेळूं पहाणे यांत मोठासा पुरुषार्थ नाहीं. उद्या निजाम किंवा दाभाडे आपणाला काय म्हणतील ?"

"प्रस्तुतचें राजकारण जर एका मस्तानीवरच झुलत आहे, तर मीं तरी तिलाच इरेला कां घालूं नये ? दाभाडे काय, निजाम काय किंवा तो मूर्ख दाढी-याला बडेखान काय, सारे जी एवढी धडपड करीत आहेत ती मस्तानीसाठींच कीं नाहीं ? ते दोघे दाढावाले तोंकड ठार झाले तेही स्त्रीच्या अभिलाषामुळेच पेशव्यांच्या बायकावर त्यांची पापी नजर होती म्हणून त्यांना ठार मरावें लागलें. आजच्या ह्या मोहिमेचा योगायोगच असा आहे प्रत्येक मनुष्य जो ह्या मोहिमेंत कोणत्याना कोणत्या नात्याने वावरत आहे, त्याच्या त्या स्फूर्तीचे आदिकारण स्त्रीच आहे उलटपक्षीं एवढया साऱ्या मडळींत कोणा स्त्रीच्या मोहपाशात न सापडतां वावरणारा असा मीच एकटा आहें, आणि म्हणूनच विजयश्री शेवटीं मलाच माळ घालणार हे ठरल्यासारखे आहे"

भास्करराम व कोन्हेरराम हे वरच्याप्रमाणें सभाषण करीत महाकालीच्या देवाळयाच्या अनुरोधानें चालले होते, ते पूर्वोक्त विहिरीपासून थोडया अतरावर येतात तोंच त्यांनी दुरूनच एक चमत्कारिक दृश्य पाहिले विहिरीच्या पलीकडील झाडींतून एक तरुण स्त्री लपत छपत विहिरीवर पाणी नेण्यासाठीं मातीची घागर कळशी घेऊन आली तोंच तिच्या मागोमाग एक कोणी तरुण लपत छपत आला, व तिच्याशीं लगट करू लागला त्याने आडदाडपणाने बेलाशक तिचा हात धरला तेव्हा तिनें एका हिसडयासरसा आपला हात सोडवून घेतला त्याच्या झटापटींत कोण विजयी होतें याचा निर्णय होण्यापूर्वींच पलीकडून एक माजलेला बैल त्या दोघा वर रोख धरून तीरासारखा धावत आला. त्याच्या भयाने त्या आडदाड तरुणानें त्या तरुणीचा हात सोडून एका उडीसरशी विहिरीवरच्या औदुंबराची फांदी गाठली व तो त्या झाडावर जाऊन बसला पण त्या तरुणीनें मात्र मुळींच न डगमगतां प्रसगावधान राखून चट्कन् आपला पदर खोचून घेतला, व चालून आलेल्या बैलाचीं शिंगे धरून त्याला मागे रेटलें बैल तिला रेटीत होता व ती बैलाला रेटीत होती पण त्या तरुणीवर निर्लज्जपणानें हात टाकू पहाणाऱ्या त्या तरुणाची काहीं खाली येऊन त्या बैलाचा प्रतिकार करण्याची छाती झाली नाहीं. उलट तो ती तरुणी व बैल यांची झटापट वरूनच खालीं डोकावून पहात स्वतःशीं पुटपुटला "अरे बापरे ! ही तर दुसरी महिषासुरमर्दिनी दिसते !"



"अरे बापरे ! ही तर दुसरी महिषासुर मर्दिनीच दिसते !" वृक्षावर दब धरून बसलेला मनुष्य आश्चर्यपूर्वक खालीं डोकावून पहात स्वतःशी पुटपुटला

भास्करराम व कोन्हेरराम याना थोडा वेळ तरुणी व बैल याची ती झटापट पाहून कौतुक वाटलें तेवढ्यात त्या तरुणीने झाडावर चढून बसलेल्या माणसाला हाक मारली "अरे नामर्दा ! माझ्यावर हात टाकण्यासाठीं तुझ्या अगात सचारलेलें अवसान आता कुठे गेले ह्या बैलाचा प्रतिकार करण्यासाठी मला जरा हातभार लावशील कीं नाहीं ? "

त्या तरुणीच्या हाकेला तो वृक्षावर चढून बसलेला भ्याड काहीं धावून आला नाही, पण भास्करराम व कोन्हेरराम मात्र धावत पुढें आले. तिचा आवाज ऐकूनच तो आवाज राधेचा असावा असा भास्कररामाला सशय आला होता तोच त्याचा सशयच खरा झाला ते दोघे त्या तरुणीपाशीं जाऊन तिच्या तोंडाकडे पहातात तों ती राधाच होती

प्रथम कोन्हेरराम व भास्करराम यानी राधेच्या अगावर चालून आलेल्या बैलाला पिटून लावून राधेची सोडवणूक केली नतर भास्कररामानें राधेला हाक मारून विचारले, " राधे ! तू इकडे कोठे ? "

" तुम्हाला त्याच्याशीं काय करायचे आहे ? तुम्ही तुमच्या वाटेनें जा कसे ! " राधा त्या दोघाविषयीं चर्येवर स्पष्ट तिरस्कार दाखवीत म्हणाली

" राधे ! तुझा इतका शिरजोरपणा माझ्यासमोर चालणार नाही, याद राखून ठेव " भास्करराम मानखडित झाल्यामुळें चिडून उद्गारला

राधेनें यावर रोखठोक प्रत्युत्तर दिले, " रस्त्यानें जाता येता असे कितीही कुत्रे अगावर भुकूं लागले तरी मी त्याना भीत नसते "

इतका वेळ औदुंबरावर चढून बसलेला मनुष्य कोण असावा ते कोन्हेरराम पहातो आहे, तों तो सयाजी—ज्याच्यावर सेनापतींची मर्जी असलेली कोन्हेररामाला सहन होत नव्हती, तो सयाजी गायकवाड होता. कोन्हेररामानें त्याला विचारले, " सयाजी, तू ह्या अबलेवर हात टाकीत होतास ? "

" ती शत्रुपक्षाची आहे. गिरिजाबाईसाहेब, मोघ्याची लक्ष्मी, मानसिंगराम टोके, बळवतराव मोघे, शिवाजीपंत मोघे, वगैरे मडळीने सेनापतींच्याविरुद्ध कट उभारला आहे, त्या कटाची ती एक साथीदार असावी असा माझा तर्क आहे पलीकडील देवालयातील दाढीवाला बुवा हा ह्या कटाचा म्होरक्या आहे मी गेल्या रात्रीपासून याच्यावर पाळत ठेविली आहे ह्या बाईला पकडल्याशिवाय त्याच्या कटाचा सुगावा लागावयाचा नाहीं —"

इतक्यांत कोठल्या तरी अज्ञान ठिकाणाहून बंदुकीची गोळी सूं सूं करीत वेगानें येऊन सयाजीच्या पाठींत आरपार घुसली. त्यासरसा सयाजी 'ओय्! ओय्! मेलों! मेलों!' असा विव्हळत वृक्षावरून खालीं पडला. कोन्हेरराम व भास्करराम तो अकल्पित प्रकार पाहून स्तंभितच झाले!

राधा त्या दोघांना आसन्नमरण सयाजीकडे बोट करून म्हणाली, "हें पहा, तुम्ही बऱ्या बोलानें माझें नांव सोडून आल्या वाटेनें निघून जा; नाहींपेक्षां जी गत ह्या चांडाळाची झाली, तीच तुमचीही होईल."

"काय गत होईल? काय गत होईल?" असें तोऱ्यानें विचारीत भास्करराम राधेच्या पदराला हात घालण्यासाठीं चार पावलें पुढे सरकला, इतक्यांत पूर्ववत् एक गोळी पुन्हा कोठूनशी सूं सूं करीत आली, ती भास्कररामाच्या गालासरशीं चाटून गेली. थोडक्यांत चुकलें, नाहींपेक्षां ती गोळी त्याच्या गालांतून आरपार जावयाची.

ह्या गोळया कोठून येतात याविषयीं भास्करराम व कोन्हेरराम यांना कांहींच कल्पना करतां येईना. पण आपलें जीवित धोक्यांत आहे, अशी मात्र त्यांची खात्री होऊन चुकली. इतक्यांत देवालयासभोंवार खडा पहारा करण्यासाठीं जी सैन्याची तुकडी त्यांनीं पूर्वी पाठविली होती, ती तिकडून सैरावैरा पळत आली. कोन्हेररामानें त्यांना विचारलें, "अरे! पळतां काय?"

त्या पळपुठ्या शिपायांच्या तोंडून 'कोन्हेरराम! पहातां काय? सेनापतिसाहेबांच्या फौजेंत फितूर झाला. मानसिंगराव टोके व शिवाजीराव मोघे हे आपलें सैन्य एकत्र करून अकस्मात् आमच्यावर चालून आले. तो देवालयांतील साधु त्या लोकांना सेनापतींविरुद्ध बंड करण्याला प्रोत्साहन देत आहे. त्यांच्यासमोर आपला मुळींच टिकाव लागावयाचा नाहीं. पळा! पळा!' असे शब्द कोन्हेरराम व भास्करराम यांना ऐकावयाला मिळाले. त्याबरोबर प्रथम त्या दोघांनीं त्या पळपुठ्या सैनिकांना नांवें ठेवून त्यांची निर्भर्त्सना करण्याला कमी केलें नाहीं. पण त्या सैनिकांना नांवें ठेवतां ठेवतां ते स्वतःही त्यांच्याबरोबरच पळाले!

त्या लोकांचा डोळा चुकवून राधा विहिरीजवळच्या वृक्षावर चढून दडून बसली, त्यामुळें कोणीं तिला पाहूं शकलें नाहीं. पळपुठ्या सैनिकांची ती गर्दी जरा कमी झाल्यावर राधा वृक्षाखालीं उतरूं लागली, तोंच तिला हांक ऐकूं आली, "राधावहिनी!"

राधेला 'राधावहिनी' या नांवानें हांक मारणारी एकच व्यक्ति जगांत होती, ती राधेची नणंद--बळवंतराव मोघ्याची तरुण पत्नी लक्ष्मी होय आपणाला हांक मारण्याला आपली वहिनी इथें कशी आली, कीं ही कांहीं भुताटकी आहे, हें पहाण्यासाठीं राधा सभोंवार चौफेर नजर फेंकते, तों त्या वृक्षाच्या ढोलींतून लक्ष्मीनें बाहेर मान काढून पुन्हा हांक मारली, "राधावहिनी! घाबरू नकोस, आंत ये"

"वन्से! तुम्ही इकडे कुठें?" राधेनें किंकर्तव्यमूढ होऊन विचारलें

"सारे कांहीं सांगते तू अगोदर गुपचूपपणें आंत ये" असें म्हणून लक्ष्मीनें राधेला हात दिला त्या हाताच्या आधारानें राधेनें वृक्षाच्या ढोलींत उडी मारली.

प्रकरण बाविसावें

# पेशवे कैद झाले !

नारायणजी व आवजी हे दोघे पेशव्याच्या वतीनें दाभाड्यांपाशी तडजोड करण्यासाठीं निघून गेल्यावर थोड्या वेळानें पेशवे आपल्या बैठकखान्यात बसले असतां हुजऱ्यानें येऊन वर्दी दिली, "कोणी एक म्हातारी सरकारांची भेट घेऊ इच्छिते"

"ठीक आहे. तिला आत पाठवून दे" पेशवे उत्तरले

पहारेकरी बाहेरून माघारी आला, त्याच्या मागोमाग ती म्हातारी आत आली. ती पेशव्याना मुजरा करून म्हणाली, "सरकार ! मी आपणापाशी कृष्णराव व बळिराम याचा तपास करण्यासाठी आले आहे."

"तू कुठून आलीस ?" पेशव्यांनीं विचारलें

"मी पलीकडे सागरखेडे या नावाचे एक गाव आहे तेथून आले" म्हातारी म्हणाली "कृष्णरावाची आई त्या गावीं माझ्या घरीं आहे"

"तिची व तुझी ओळख कुठची ?"

"ओळख कुठची ? आणि ओळख हवी तरी कशाला ? सरकार रजल्या गाजल्याला हातभार लावणें हे प्रत्येकाचें कर्तव्यच नाहीं का ?"

"तसें नव्हे, देवकी पुण्याहून इतक्या दूरवर कशी आली असें मी विचारतों"

"तें काही मला नीटसें माहीत नाही, पण आज बरेच दिवस ती बाई आमच्या घरी आहे ती वारवार आपली कर्मकहाणी मला निवेदन करते, त्यावरून मला तरी माहीत ती पुण्यात भास्करराम नावाच्या कोणा माणसाच्या घरीं रहात होती म्हणे. तिच्या मुलाचा कोन्हेरराम या नांवाचा भास्कररामाचा कोणी भाऊ होता त्याच्याशीं तंटा झाला होता त्या कोन्हेररामाला सरकारानीं नोकरीवरून काढून टाकलें होतें, खरें होतें ना ?"

"होय बरें मग ?"

"मग काय ! त्या दोघा भावांनी एकमतानें बिचारीच्या संसाराचा सत्यानाश करण्याचे योजिलें आहे बिचारीचे पोरगे सरकारांच्या सेवेत रुजू होऊन परदेशीं

गेले, तेव्हा मागें तिचा व तिच्या सुनेचा प्रतिपाळ करण्याचे भास्कररामाने कबूल केलें होते मला तरी तिनें सांगितले म्हणूनच माहीत"

"बरें; मग?"

"तोच ब्राह्मण शेवटीं चांडाळासारखा वागूं लागला देवकी ग्रेंच कायसें सांगत होती ते सारें काहीं माझ्या ध्यानीं नाहीं पण ते दोघेही भाऊ जसे तिच्या कुटुंबाच्या, तसेंच सरकारच्याही हात धुवून पाठीला लागले आहेत एवढें मला तिच्या सांगण्यावरून कळलें आणि विशेष हे की, तिची सून शत्रूंना सामील झाली आहे"

"काय? राधा माझ्या शत्रूंना सामील झाली आहे?" पेशव्यानीं एकदम चमकून विचारलें

"होय सरकार इतकेंच काय, पण ती भास्कररामाबरोबर कुठेंतरी निघून गेली देखील?"

"ग्रायकाची जात निमकहराम!"

"म्हणूनच म्हातारीला इतका खेद झाला बिचारी आपल्या मुलांना भेटण्या साठीं इतक्या दूरवर वणवण करीत आली, ती संकटाखालीं इतकी बेजार होऊन गेली आहे कीं, त्यामुळें ती आता अथरुणाला खिळली आहे ती आता दोनचार दिवसांची सोबतीण आहे तरी पण तशा स्थितींत ती एथवर आली."

"काय? आई एथवर आली?"

"कोणाची आई?"

"कृष्णरावाची ना?"

"होय एकदा आपल्या मुलांना डोळाभर पहावे व त्याच्या मांडीवर डोकें टेंकून प्राण सोडावा अशा अखेरच्या आशेनें ती बिचारी चालवेना तरी रडत रखडत कशीबशी माझ्याबरोबर आली तिच्याच्यानें पुढें चालवेनाच, तेव्हां ती गावाबाहेर एक देवालय आहे तेथे बसली, व मी तिचा निरोप घेऊन पुढें आलें आपल्या दोन्ही मुलांची एकवार दृष्टभेट होण्यासाठीं त्याना पाठवून द्यावें अशी तिच्या तर्फेनें आपणाला विनति करण्यासाठीं मी इकडे आले आहे"

"दृष्टभेट, आता इतक्यात कसली दृष्टभेट व कशासाठीं दृष्टभेट?" पेशवे संतापून दातओठ खाऊन म्हणाले, "बाई! तू जा आणि देवकीला सांग कीं, मर्दुमकी गाजविण्यासाठीं तळहातावर शीर घेऊन घराबाहेर पडलेले तुझे मुलगे

मर्दुमकी गाजविल्याशिवाय तुला येऊन भेटणार नाहींत. तोंपर्यंत तिला म्हणावें, आपल्या मुलांच्या पराक्रमाच्या गोष्टी ऐकण्यासाठीं तूं जिवत राहिलेंच पाहिजे निदान तुझ्या शत्रूचा निःपात तुझ्या मुलांच्या हातून झाला, हें ऐकण्यासाठीं तरी तू जगलेंच पाहिजे "

" देवकीची आशा केवढी बलवत्तर होती कीं, आपली राधा बाळंत होईल, तिला मुलगा होईल, तोंवर कृष्णराव पेशव्यांचे कृपेनें मोठ्या योग्यतेला चढून सरदार दरबारात मोडू लागेल अशा सरदाराला मुलगा झाल्याची आनंदाची वार्ता सर्वांना जाहीर करण्यासाठी मग त्याच्या इतमामाला साजेशी हत्तीवरून साखर वाटण्यांत येईल आपण या नातवाला कांही वर्षे कटिखाद्यावर खेळवून लहानाचा मोठा करू दरम्यान बळिराम मर्दुमकीचा वीरसा चमकू लागला कीं त्याचेंही लग्न होईल त्यालाही मुलगा होईल अशा गडगंज संसारांत आपल्या दोघां पराक्रमी पुत्रांच्या मांडीवर मस्तक ठेवून आपण सुखानें प्राण सोडू अशी देवकीची महत्त्वाकांक्षा होती सरकार, देवकीनें इकडे येताना बळिरामासाठीं एक सोयरीकही पाहून ठेविलेली आहे."

इतके ती म्हातारी बोलते, तोंच एका हेरानें येऊन वर्दी दिली, " सरकार, आपला डाव फसला ! "

" काय झाले ? " पेशव्यांनीं विचारले.

" नारायणजी व आवजी यांची शिष्टाई फुकट गेली खानाशीं बाचाबाच होऊन प्रकरण हातघाईवर आले व गैबखान आणि तुरुकताजखान हे दोघे त्या झटापटींत बळिरामाच्या हातून मारले गेले "

" बळिरामाच्या हातून मारले गेले ना ? " पेशव्यानी तशा खिन्न मनःस्थितींतही उतावळेपणानें समाधानाचे उद्गार काढले, " धन्य ! धन्य त्याची ! शौर्याच्या बाबतींत त्यानें माझ्यावरही ताण केली, पण बाचाबाची होण्याचें कारण काय ? "

" तें मला माहीत नाहीं. पण खानानीं सरकारच्या कबिल्याच्या बाबतींत अनुदारपणाचे उद्गार काढले व बळिरामाला ते सहन न होऊन त्यानें खानांना ठार केलें एवढें मात्र खरें." बातमीदार म्हणाला.

" एकूण धन्यासाठीं दादानें स्वतःचा बळी दिला; तो मरून अजरामर झाला यांत मला आनंदच आहे मी त्याच्यासाठीं शोक मुळींच करणार नाहीं."

पेशवे 'शोक मुळींच करणार नाहीं' असें तोंडानें म्हणाले खरे, पण ते शब्द उच्चारतांना त्यांच्या शोकाच्या हुंदक्यांमुळें क्षणोक्षणीं अडथळा होत होता देवकी-कडून आलेली म्हातारी हा प्रकार पहात जवळच उभी होती जासूदही उभा होता. पेशव्यांनीं बळिरामाला 'दादा' या नांवानें संबोधून त्याचा गौरव केला व त्याच्यासाठीं त्यांना अंतःकरणापासून खेद झाला, हें पाहून त्या दोघांनींही मनांत म्हटलें, 'धन्य असे सेवकासाठीं आपलेपणानें झटणारे धनी, व धन्य असे धन्या साठीं स्वतांच्या प्राणांवर पाणी सोडणारे सेवक !' त्या म्हातारीला याहूनही अचंबा वाटला होता तो राधा व देवकी यांची वार्ता ऐकून पेशव्यांना इतका खेद झाला त्याचा आणि त्याबरोबरच देवकीचा एक पुत्र मृत्युमुखी पडला म्हणून तिला वाईटही वाटलें

पेशव्यांनीं लगेच दोन दीर्घ उसासे सोडून विचारलें, " बरे, नारायणजी व आवजी यांची काय खबर आहे ? "

" त्यांची खबर कांहींच मिळाली नाहीं. झटापटींत तीन मृत्यु झाले, एवढा गवगवा बाहेर झालेला माझ्या कानीं आला, तेवढा सरकारांच्या कानांवर घालण्या-साठीं मी धांवत आलों " बातमीदार म्हणाला.

" ठीक आहे. आतां तू असाच जाऊन त्या दोघांविषयीं चौकशी करून ये." पेशवे म्हणाले बातमीदार 'आज्ञा सरकार !' असे म्हणून निघून गेला बातमी-दार निघून गेल्यावर पेशवे म्हातारीकडे वळून म्हणाले, " एकूण ती कुलटा अखेर इतकी बहकली अ ! " पेशवे स्वत.शींच म्हणाले म्हातारीला आतां जास्तच दुग्धा पडली कीं, पेशवे आपली मस्तानी शत्रूच्या स्वाधीन होण्याच्या ऐन विचारात आहे तरी देखील जितके डगमगत नाहींत, तितके राधेविषयी कां डगमगतात ? कृष्णरावावर त्यांचें अलोट प्रेम आहे, म्हणून तर नव्हे ना ? इतक्यात पेशव्यांनीं पुन्हा प्रश्न केला, " काय ग ? राधा मूळपासूनच अशी बहकलेली होती का ? "

" तें मला कांहीं माहीत नाहीं सरकार ! " म्हातारी म्हणाली

" पण ती पुण्यांत होती, तेव्हां तिची वर्तणूक बरीच सशयास्पद होती असें देवकी तुझ्यापाशीं बोलली नाहीं का ? "

" होय ती असें म्हणाली होती. एवढे खरे "

" पेशवे भुंवया चढवून उद्गारले, " कृष्णराव पेशव्यांबरोबर मोहिमेवर याव-याला निघाला तेव्हां राधेला बरोबर आणण्याची त्याची इच्छा होती, पण राधाच

त्याच्याबरोबर यावयाला खुषी नव्हती. तसेंच भास्करराम राधेशीं किती प्रेमानें वागत होता! त्यानें मुद्दाम तिला डोहाळेजेवण केले होते. देवकी तुझ्यापाशीं ह्या गोष्टी बोलली असेलच"

"सरकाराना अगदीं कान्याकोपऱ्यांतल्या गोष्टी देखील माहीत आहेत म्हणायच्या! कृष्णरावानें सरकारांना हें सारें सांगितलें असेल देवकीही मजपाशीं तसें बोलली होती"

"कोणी का सांगेना? पण हें खरें ना?"

"बायकांची जात बेइमान! शहाण्या पुरुषानें बायकोवर कधींही विश्वास ठेवूं नये. पायातली वहाण नेहमी पायातच पाहिजे ती डोकीवर घेऊन नाचतां उपयोगी नाहीं."

"सरकार म्हणतात तें मात्र अक्षरशः खरें" म्हातारी म्हणाली "बायकांची जात बेइमान! सुरूप, कुरूप, गरीब, श्रीमंत, तारुण्य, वृद्धपणा, यांचा कसलाही निर्बंध बायकाना इमानी राखायला अपुरा पडतो भास्करराव व कृष्णराव यांची वाटेच्या चोराने तुलना केली तरी कृष्णरावाच्या नखाची देखील सर भास्कररामाला यायची नाहीं, असें देवकी म्हणत होती मीं काहीं त्या दोघानाही पाहिलेले नाहीं खरे, पण ती म्हणाली तें काही खोटें नसेल मी आणखी असेही ऐकले होते कीं, सरकार! मस्तानीबाईसाहेबानी देखील सरकाराशीं विश्वासघात केला—"

"भार्या रूपवती शत्रु!" पेशवे म्हातारीच्या बोलण्याकडे दुर्लक्ष्य करून म्हणाले "अशा बायकाशीं संसार करण्यापेक्षा मरण पत्करलें"

"कृष्णरावाला जर हा प्रकार कळला तर तो देखील आपणासारखाच हळहळेल?" म्हातारी म्हणाली. एवढ्यात पुन्हा हुजऱ्यानें येऊन वर्दी दिली "कोणी दोघे इसम सरकाराची भेट घेऊं इच्छीत आहेत"

"ते कोण आहेत?" पेशव्यानीं विचारलें

"ते मीं त्यांना विचारले, पण नावें सांगण्याची त्यांची इच्छा दिसली नाहीं. त्यांच्या अंगावरील कपडे रंगपंचमीचें रंगवणी उडविल्याप्रमाणे रक्तानें माखलेले आहेत, व रक्ताने लालबुंद झालेल्या तरवारी त्यांच्या हातीं आहेत." हुजऱ्या उत्तरला

"ते आपले लोक आहेत कीं शत्रूचे लोक आहेत?" पेशव्यांनीं विचारलें.

" ते शत्रूचे लोक असावेत असें वाटत नाहीं त्याच्या नजरेंत व वाणींतही आपलेपणा दिसतो " हुजऱ्या उत्तरला.

पण हुजऱ्याच्या शब्दावर फारसें विसबून रहावे असे पेशव्याना वाटेना. हे दाभाडे किंवा निजाम यांच्याकडचे कोणी मारेकरी तर नसतील, असाही संशय त्यांच्या मनात तेव्हांच आला तसाच प्रसंग पडला तर आपले खरे साह्यकारी नारायणजी व आवजी हेही जवळ नाहींत, यामुळें त्याना जास्त फिकीर वाटू लागली ते त्याच हुजऱ्याला 'आपल्या शिपायांना सावध रहावयाला सांग' असें सांगून परमेश्वराचे नांव घेऊन तरवारीसह बाहेर जाऊ लागले तोच ती दोन माणसें आंत आलीं देखील त्यांना पाहतांच त्यांपैकीं एकाला पेशव्यानीं ओळखलें तो बळवंतराव मोघे होता पेशव्यांना पहाताच बळवतरावाला जितका आनद झाला, तितका त्याला पाहून पेशव्यांना झाला नाहीं उलट त्यांना वाटलें कीं, ही मडळी आपला घातपात करण्यासाठीं आली आहेत, म्हणून त्यानीं धैर्यानें त्यांना विचारलें, " बळवतराव ! एथवर तुमच्या देशद्रोहाची व स्वामिद्रोहाची मजल गेली ना ? आणि हा दुसरा साथीदार कोण गाठलात ? "

शिवाजीराव म्हणाले, " सरकार ! आपल्या सभोंवारचें वातावरण इतकें दूषित झालेलें आहे कीं, आपणाला आमच्याविषयीं असा सशय वाटणें अगदीं शक्य आहे "

" मग काय ! तुम्ही माझे शत्रु म्हणून येथें आला नाहीं ? " पेशव्यानी विचारले.

" नाहीं इतकेंच काय, पण आपला स्नेही, आपला सेवक, आपला साह्यकर्ता म्हणून आम्ही आपणाकडे आलों आहों आपण इथे सेनापति व पठाण सरदार याच्याशीं तडजोड करण्यासाठीं आलों आहों खरे, व तोंडदेखली तडजोडीची भाषा त्या मडळीनें आपणाशीं सुरू केली आहे, हेही आम्हाला माहीत आहे, पण आपण त्या भाषेवर विश्वास ठेवूं नका त्या मडळीचा आपणाला दगा देण्याचा बेत आहे "

" इतकेंच काय, पण आपल्या स्त्रियांवरही त्या चांडाळाचा पापी डोळा आहे." बळवतरावाबरोबर आलेला तिसरा तरुण म्हणाला, " म्हणूनच मला ह्या बाबतींत मन घालावें लागलें. राज्याच्या उलाढालींपेक्षा स्त्री-पुरुषाच्या शीलाला माणसानें ज्यास्त महत्त्व दिले पाहिजे. शीलवान् स्त्री-पुरुष ज्या राष्ट्रात असतील

तें राष्ट्र दैन्यावस्थेला पोंचले असलें तरी त्या राष्ट्राचे सुपुत्र व सुकन्या आपल्या त्या मायभूमीचें परममंगल करतीलच करतील याच्या उलट एखादें राष्ट्र अत्यंत भरभराटलेलें असलें तरी त्या राष्ट्रातील स्त्री-पुरुष शीलभ्रष्ट व बद्नेकीचीं असल्यास त्यांच्या हातून त्या राष्ट्राचा विनाश व्हायला वेळ लागणार नाहीं मोगलाचे साम्राज्य धुळीला कशानें मिळत आहे ? साधुसत, देवधर्म व स्त्रिया यांची विटंबना करण्याचे महापाप मोगलानीं जोडलें, म्हणून आज त्याची अशी दशा होत आहे व त्याच्या नादानें वागणाऱ्या घरभेद्या मराठ्याचीही तीच दशा होणार ”

“ पण मोगल तर अजूनही शिरजोर आहेत, व सेनापतींसारखे मराठे त्याचें साह्य करीत आहेत ” पेशवे मध्येच म्हणाले

“ होय. पण ते स्वत:च्या हातानें स्वत:ला गाडण्यासाठीं खड्डा खणीत आहेत.” तो दुसरा तरुण गभीरपणें म्हणाला “ श्रीरामाच्या हातून रावणाला व श्रीवामनाच्या हातून वळीला जसा मोक्ष मिळाला, तसा आपल्या हातून त्याना मोक्ष मिळण्याची वेळ जवळ आली आहे आयाना मुलाचा व पत्नींना पतींचा मोहही कर्तव्यापुढे आठवेनासा होईपर्यंत लोकजागृतीची मजल येऊन ठेपली, ती भविष्य काळाच्या उज्ज्वलतेची साक्ष देण्यासाठींच होय, असें सरकाराना नाहीं वाटत ? ”

ते दोघेजण आत आल्यापासून पेशवे त्या अनोळखी तरुणाकडे एकसारखे टक लावून पहात होते. त्या तरुणाचे लावण्य, त्याच्या डोळ्यात खेळणारें पाणी व चर्येवरील कोमलता पाहून कुणालाही त्याच्याकडे पहात उभें रहावें असेंच वाटलें असतें ओठावर मिसरुडीची लंव देखील फुटलेली नाहीं, इतका लहानगा हा वीर इतका स्वाभिमान व स्वदेशाभिमान दाखवितो, हें पाहून पेशवे क्षणभर चकित होऊन गेले त्यांनीं बळवतरावाला विचारलें, “ हा तरुण कोण ? ”

बळवतरावानें काहीं उत्तर न देता एकवार त्या तरुणाकडे पाहिले त्याबरोबर तो तरुण उत्तरला, “ सागायला काहीं हरकत नाहीं मी सत्पक्षाचा कैवार घेतें आहे मला भय कोणाचें आहे ? ”

त्या तरुणाच्या तोंडून ‘मी सत्पक्षाचा कैवार घेतें आहें’ असे शब्द ऐकताच पेशव्याना विचार पडला कीं, ही व्यक्ति पुरुष आहे कीं स्त्री ! त्यांनीं पुन्हा एकवार त्या व्यक्तीच्या चर्येकडे निरखून पाहिले, तों ती स्त्री असल्याविषयीं त्याना खात्री वाटू लागली. ती स्त्री तिच्या चेहऱ्यावरील रुबाबावरून थोरामोठ्याच्या घराण्यातील

असावी असेंही पेशव्याना वाटलें. त्याचा तर्क खरा ठरला बळवंतराव उत्तरला, " सरकार !—" इतक्यात त्यानें एकवार आजूबाजूला पाहिलें, व कोणी परकें माणूस आपण काय बोलतो तें ऐकत नाहीं असें पाहून म्हटले, " सरकार ! ह्या आपल्या शत्रूच्या सहचारिणी गिरिजाबाई दाभाडे "

" गिरिजाबाई ह्या ? आणि अशा वेशात इकडे कशाला आल्या ? " पेशव्यानीं आश्चर्यपूर्वक विचारलें

" सरकार ! माझ्या कर्तव्यानें मला एथवर अशा स्थितींत ओढून आणलें आहे. आपणाला, आपल्या घरच्या मडळीला अपायकारक असे चाळे सेनापतींना सुचले आहेत, त्यापासून आपणा सर्व सत्पक्षीयाचा बचाव करणे, व ह्या महान् अपराधाबद्दल आपण सेनापतींना माझ्या सौभाग्यदेवतेला कठोर शासन करू नये अशी आपणाला विनति करणे, अशा दुहेरी कर्तव्याच्या दुधारी तरवारीवर सध्या मी उभी आहें एवढ्यासाठीं मीं माझ्या पतींचा रोष सहन केला आहे." गिरिजा आपल्या डोकीचा मदिल काढून व अगरख्याचे वरचे बंद सोडून उघडा गळा पेशव्याना दाखवीत म्हणाली, " पेशवे सरकार ! माझा गळा पहा ! हा मगळसूत्राविणें ओका ओका आहे. कर्तव्यपालनासाठीं हें सौभाग्याचें लेणें गळ्यावेगळे करून मी एथवर आले आहें मी एकटी आहें असे आपण समजू नका हे बळवतराव, शिवाजीराव, मानसिग मामा टोके वगैरे सत्पक्षाचे अभिमानी वीर माझे साह्यकारी आहेत आम्ही सर्व मिळून आपणाला साह्य करण्याचे ठरविलें आहे मात्र ह्या सेवेच्या मोबदल्यांत आपण माझ्यासाठी एक गोष्ट केली पाहिजे. मला आपली बहीण समजून मला चुडेदान केलें पाहिजे —"

गिरिजाबाई एवढें बोलते, तोंच बाहेरून कोणाच्या तरी मुखातून शब्द निघालेले त्या मडळीला ऐकू आले, " नाहीं, नाहीं. तें कालत्रयींही शक्य नाहीं." सर्व मडळी चपापून बाहेरील कानोसा घेतात, तोंच त्याना त्याच व्यक्तीचे आणखी बोलणे ऐकू आलें, " सरकाराच्या परवानगीशिवाय मी तुम्हाला आत जाऊ देणार नाहीं."

" बाहेर कोण आलें आहे ? " पेशवे कानोसा घेत म्हणाले. " कोणी तरी परके लोक आत येण्यासाठीं वडपडत असावे, म्हणून त्याना आमचा पहारेकरी प्रतिबध करतो आहे "

इतक्यात 'तुम्ही का ते ? मीं तुम्हाला ओळखलें नाहीं' असे त्याच पहारेकऱ्याचे सौम्यपणाचे शब्द त्या मडळीच्या कानांवर आले, व त्या शब्दांचा ध्वनि हवेंत

विरतो न विरतो, तोंच अंगावरील कपड्याच्या फाटून चिंध्या झाल्या आहेत, अंगावर ठिकठिकाणीं जखमा झाल्या आहेत व त्या जखमातील रक्ताने फाटके कपडे भिजून ओलेचिंब झाले आहेत, असे नारायणजी व आवजी आंत आले त्या दोघांनींही थेट पठाण सैनिकाप्रमाणें पेहेराव केला असल्यामुळें पहारेकरी प्रथम बिचकला होता, पण पेशव्यांनी दुरूनच त्याच्या आवाजावरून त्यांना ओळखलें होते त्यामुळें ते आंत येतांच पेशवे मुळींच डगमगले नाहींत पुरुषवेषातील गिरिजाबाई व बळवंतराव मात्र त्या दोघांना पाहून बिचकले, व आपापली हत्यारें सरसावू लागले, पण पेशव्यांनीं त्यांची समजूत केली व त्या दोघाना विचारलें, " हें काय ? "

बळवंतराव, गिरिजाबाई पहाताच नारायणजी व आवजी हे जरा चिकले नारायणजींच्या तोंडून खासगी असे अर्वाच्य शब्द निघत होते, ते त्यांनीं तोंडांतल्या तोंडांत गिळले व पेशव्यांना म्हटले, " सरकार ! आता वेळ गमावतां उपयोगी नाहीं. दाभाड्याशी तडजोड होण्याची आशा पार खुंटली आतां आपण प्रथम स्वसंरक्षण केले पाहिजे "

" आता मला वाटते, स्वसंरक्षण करण्याजोगें कांहींच उरले नाहीं. मारूं किंवा मरूं असा निर्धार करून समरांगणांत उडी घ्यावयाची व शत्रूला मारता मारतां मरून जावयाचे, एवढेंच बाकी राहिले आहे तुम्हीं येण्यापूर्वींच मोहिमेची बातमी मला आमच्या बातमीदाराकडून कळली माझ्या जिवाचा जिवलग असा एक मोहरा धन्याचा कैवार घेतां घेता ठार झाला—" बोलता बोलता पेशव्यांच्या डोळ्यांत आसवें उभीं राहिलीं

आवजी पेशव्यांना हाताने आवरते घेण्याची खूण करून म्हणाले, " सरकार ! बळिराम बळी पडला, तो मरून चिरंजीव झाला त्याच्यासाठीं आपण असा शोक करणें चांगले नाहीं."

पेशवे आपल्या अंगरख्याच्या बाह्यानीं आसवें पुशीत स्फुंदत स्फुदत म्हणाले, " आवजी ! सत्कार्यासाठीं—कर्तव्यासाठीं मरून चिरंजीव झालेल्यासाठीं रडत बसणारा नामर्द मी नाहीं."

" मग आपल्या डोळ्यात हीं आंसवें का उभीं राहिलीं ? " आवजींनीं विचारलें.

" हीं आसवें ! " पेशवे पुन्हा आंसवें पुशीत हुदके आवरीत म्हणाले, " हीं आसवें जिवंतपणींच मरून किंवा पिशाचयोनींत जाऊन भलभलते चाळे करणाऱ्या

लाग्याबांध्याच्या माणसासाठीं मी ढाळतों आहे. प्रत्यक्ष लग्नाची बायको इतकी नादान निपजावी, यापेक्षा माझें दुर्दैव तें कोणतें ? ”

पेशव्याच्या तोंडचे हे शब्द ऐकून नारायणजी व आवजी यांना गारगल्यासारखे झाले त्यानी पेशव्याना जरा आडवशाला बोलावून नेले. आता तेथे बळवतराव पुरुषवेशातील गिरिजा व देवकीचा निरोप घेऊन आलेली ती म्हातारी एवढीं तिघेच होतीं पेशवे दूर गेलेले पाहून म्हातारी बोलती झाली, “ अरेरे ! धनी आणि नोकर सारखेच अभागी ! ”

“ काय झाले ? ” गिरिजेनें म्हातारीला विचारले

“ नाही, म्हटले पेशवे सरकार व कृष्णराव दोघेही कमनशिबी ! याची बायको अशी व त्याची तशी, दोघीही बहकल्या ! ” म्हातारी म्हणाली

“ काय म्हणालीस तू ? ” बळवतराव एकदम चमकून म्हातारीकडे वळून म्हणाला, “ तू कोण कुठची ? तू काय म्हणालीस तें मला समजलें नाहीं.”

म्हातारीने जो वृत्तान्त पेशव्याना थोडया वेळापूर्वी निवेदन केला होता तोच वृत्तान्त आतां बळवतरावाना निवेदन केला. तिला बिचारीला राधा ही बळवतरावाची बहीण आहे हे काय माहीत ? तिनें उलट पूर्वीच्यापेक्षांही जास्त शिव्याशाप राधेला देऊन तिचा अपराधीपणा बळवतरावाचे मनावर ठसविण्याचा प्रयत्न केला ओघाबरोबर ती ‘राधेने दोन्ही कुळाचे तोंड काळे केले’ असे म्हणावयास चुकली नाही बळवतरावाला निसर्गतःच आपल्या कुलाचा व कऱ्हाडया बाण्याचा अत्यंत अभिमान होता त्याला राधेची हकीगत ऐकून जणु आपले नाक कापल्या सारखे वाटले तो संतापून कपाळावर हात मारून खिन्नावलेल्या अंतःकरणानें म्हणाला, “ असली बहीण जन्मालाच न येती, अथवा जन्मताच मरती तरी फार बरे झालें असतें ”

“ बळवतराव, राधा ही तुमची बहीण ? ”

“ हो ! ती माझी बहीण ! पण आजपासून ती मला मेली आणि मी तिला मेलो ” बळवतराव उत्तरला.

इतक्यात पेशवे, नारायणजी व आवजी हे आपली मसलत आटोपून बाहेर आले गिरिजा, बळवतराव व ती म्हातारी यानीं पेशव्याच्या चेहेऱ्याकडे पाहिलें तों तो अगदीं काळवडलेला दिसला; पण त्या मंडळीला वाटले मस्तानीनें विश्वासघात केला त्यामुळें पेशवे इतके खिन्न झाले असतील.

पेशव्यानी बाहेर येताच त्या म्हातारीला निरोप दिला, "देवकी आईला साग कीं, तुझा कृष्णराव शक्य तितक्या लौकर तुला भेटेल मात्र बळिराम झटापटींत मारला गेला हें तू तिला मुळींच सांगूं नकोस" लगेच म्हातारी गेली असें पाहून ते गिरिजेकडे वळून म्हणाले, "गिरिजाबाई, तुमच्यासारख्या साध्वीचा शब्द मी कधींच मोडणार नाहीं, पण जितक्या मनमोकळेपणानें तुम्ही बोलला तितक्याच मनमोकळेपणानें मीही बोलतों कीं, तसाच प्रसग आला तर मला महाराष्ट्रसुदरीच्या कपाळीचा कुकुमतिलक कायम ठेवण्यासाठी तुमच्या कपाळाचे कुकू पुसावे लागेल तुम्हाला यामुळे खेद होणार नाहीं अशी मला आशा आहे. मी सागितली ही अगदीं निर्वाणीची गोष्ट सागितली, या थराला गोष्टी येतीलच असें नाही, पण आल्याच तर मला माझ्या कर्तव्याला जागावें लागेल"

गिरिजा बाजिरावाचे पाय धरून त्याच्या पावलावर आपल्या रेशमासारख्या मऊ लाबलचक काळ्याभोर केसाचें आच्छादन घालून केविलवाण्या मुद्रेने त्यांचेकडे पहात म्हणाली, "सरकार, मी आपली बहीण आहें, प्रत्यक्ष आपल्या बहिणीच्या कपाळींचे कुकू पुसण्याइतका अत करणाचा कठोरपणा आपणासारख्या कनवाळू लोकनायकाचे ठायीं सभवेल तरी का?"

"का सभवणार नाहीं?" पेशवे म्हणाले, "गिरिजाबाई, जो परमेश्वर सृष्टीची उत्पत्ति आणि जोपासना करतो तोच परमेश्वर सृष्टीच्या विनाशालाही कारण होतो उत्पत्ति, स्थिति आणि लय ह्या त्रिविध सामर्थ्याचा त्रिशूल हातीं घेऊन सृष्टीची नियत्रणा करणाऱ्या परमेश्वराला साक्ष ठेवून मी माझे कर्तव्य करू लागलों कीं, आई बाप, बायको, मुले, बहीण, भाऊ असलीं कोणतींही ससाराचीं कृत्रिम बधने मला आडवू शकणार नाहीत"

पेशव्याच्या तोंडचे वाक्य बोलून पुरे होतें न होतें तोंच त्याच्या गोंटासभोवार 'शत्रू आला' 'शत्रू आला' असा एकच हलकल्लोळ माजून राहिला व सर्वत्र घाबराघुबरीची धावपळ सुरू झाली हा काय प्रकार आहे हें पहाण्यासाठी पेशवे पुढें, गिरिजा त्याच्या मागाहून व तिच्या मागाहून इतर मडळी बाहेर जाऊ लागली पेशवे बाहेर जातात न जातात तोंच त्रिबकराव दाभाडे पाच चार सशस्त्र निवडक लोकांसह दत्त म्हणून समोर उभे!

त्रिबकराव खानाबरोबर इकडे यावयाला निघाले तेव्हा त्याच्या अत.करणात पेशव्याविषयींच्या सहानुभूतीला थोडा तरी अवसर होता त्रिबकराव जिनका

स्वाभिमानी व स्वयंमन्य होता तितका दुष्ट नव्हता त्यामुळें पेशव्यानीं आपण। समोर मस्तक नम्र करून आपली करुणा भाकली म्हणजे त्यांच्याशीं सख्य करा-वयाला हरकत नाहीं, असा त्रिंबकरावाचा पूर्वीचा विचार होता, पण योगायोगा सारखी गिरिजा त्याला पेशव्याच्या पाठीशीं उभी असलेली दिसली. त्याचक्षणीं त्याच्या सर्वांगाची लाही लाही झाली जखमेवर मिठाचें पाणी शिंपडले जावें त्याप्रमाणे बळवतराव मोघेही त्रिंबकरावाला नेमका गिरिजेच्या मागे उभा असले-ला आढळला रात्रीं गिरिजा नापत्ता झाल्यापासून हा वेळपर्यंत नानापरींच्या विकल्पानी त्रिंबकरावाचे डोके भणाणून सोडले होतें कोन्हेररामाने त्यात स्वत च्या आगलावेपणाची भर घातल्यामुळे त्रिंबकरावाच्या पत्नीविषयक संशयाला व सशयात्मक त्वेषाला काही मर्यादा उरली नव्हती गिरिजा पेशव्याच्या मागे उभी असलेली व बळवतराव तिच्या मागे उभा असलेला या स्वरूपात त्या तिघाना पाहताच त्रिंबकराव दात ओठ खात म्यानातून तरवार सर्कन् बाहेर काढीत गिरिजेवर धावून गेले व “ दगलबाज ! चाडाळीण ! पेशव्याचा हात धरून येथवर आलीस काय ? ” असें म्हणून त्यानी गिरिजेच्या मानेवर तरवारीचा एक जोराचा वार केला. त्या एका वारासरशीं गिरिजा गतप्राण होऊन धरणीवर कोसळली पेशवे तेवढ्यात गिरिजेला पाठीशीं घालण्यासाठी पुढें सरले व “ अबलेवर आणि तेंही गिरिजेसारख्या पतिव्रतेवर हात टाकणे हें नामर्दाचें काम आहे. सेनापति, तुमच्या साध्वी सहचारिणीवर देखील तुमचा विश्वास बसू शकला नाहीं, इतकें तुम्हाला संशयाच्या पिशाच्चाने पछाडले आहे ” असें म्हणून त्रिंबकरावाना आवरण्याचा प्रयत्न केला, पण तो अर्थानच फसला त्रिंबकराव पेशव्याच्या दडाला धरून त्याना दूर लोटीत म्हणाले, “ पेशवे ! तुम्ही एखाद्या नीच चोरट्यासारखे लोकांच्या बायकाना भुलवून नादीं लावू पहाता तो वेळ आपल्या घरच्या बायकांचे रक्षण करण्यात व त्यांच्यावर नजर ठेवण्यात तुम्हीं खर्च केला तर फार बरें तुम्ही कसल्या भ्रमात आहात ! जरा डोळे उघडून पहा म्हणजे तुम्हाला, आढळून येईल की, तुमच्या बायका बडेखानाच्या जनानखान्याची वाट चालत आहेत.” ते लगेच बळवतरावाकडे वळून म्हणाले, “ आणि हरामखोरा ! गिरिजाबाईला फितविण्यात तूच प्रमुख होतास हे मला माहीत आहे, पण जी गत पेशव्याच्या बायकाची तीच गत तुझ्याही बायकोची झाल्यावर तू काय करशील ? ”

“ हा ! सेनापतिसाहेब ! आपणाला रात्रीच्या प्रसगाची आठवण असेलच.

आपणाला आजकाल जगात बायकाशिवाय दुसरे काहीच दिसत नाहीसे झालें आहे आपण आजकाल बायकाचे बाबतीत दुरात्म्या कीचकासारखा धिंगाणा माजविला आहे, पण लक्षात ठेवा की, इतिहासाची पुनरावृत्ति होत असते तुमची खोड मोडून तुम्हाला रसातळाला नेण्याला कारणीभूत होणारी एकादी सैरंध्री तुमच्याकडून गाजल्या गेलेल्या अनेक स्त्रियांतून एकादी तरी खास निर्माण होईल व भीमार्जुनासारखे पराक्रमी पाठिराखे तिचा कर्तव्यतत्परतेनें पाठपुरावा करून तुमची वाताहात उडविल्याशिवाय रहाणार नाहीत ”

त्रिंबकरावाना बळवंतरावाचे हे बोल कसे सहन व्हावे ! ते एकदम तरवार उगारून बळवतरावावर धावून गेले, पण तेवढ्यांत पेशव्यानी मध्ये पडून त्रिंबकरावाचा हात वरच्यावर घट्ट धरला त्रिंबकरावानीं आवेशाच्या भरात पेशव्यांच्याच अंगावर तरवारीचा वार केला एवढा प्रकार होत आहे तोंच त्रिंबकरावाच्या हस्तकानें बाहेर जाऊन सैन्याला आतील दंगलीची खबर दिल्यामुळें हा हा म्हणता सुमारे शंभर सशस्त्र सैनिक आत घुसले. तोवर आत पेशवे व त्याच्या पक्षाचे लोक बहुतेक झटापटींत जखमी होऊन पडले होते त्यामुळे त्रिंबकरावानीं आपल्या सैनिकाना पेशवे व त्याचे लोक याना कैद करण्याला सागताच ते कार्य पार पडण्याला फारसे श्रम लागले नाहींत सुमारे अर्ध्या पाव घटकेच्या आत पेशवे, नारायणजी, आवजी व बळवतराव हे चौघेही सेनापतींचे बंदिवान् झाले. बाहेर गोटासभोवार पेशव्याचे जे सैन्य होतें, त्याला त्रिंबकरावाच्या अफाट सैन्यानें हा हा म्हणता कापून काढलें ! ती सारी जागा आंतून व बाहेरून पेशवे पक्षाच्या लोकाच्या रक्ताने सारवून निघाली !

लगेच त्रिंबकरावाच्या आज्ञेवरून सर्व कैद्याना बदोबस्ताने त्रिंबकरावाच्या गोटांत रवाना करण्यात आलें इतक्यात एक उमदा मुसलमान कोठूनसा तेथे अकस्मात् आला व पेशव्याकडे पाहून म्हणाला, “ पेशवे सरकार, आपण मला व माझ्या भावाला हकनाक शासन करून देशोधडीला लावलें होतें त्या आपल्या दुष्टाव्याची फेड ही अशी झाली आता त्या मुद्दलावरचें इतक्या दिवसाचे व्याज मी फेडणार आहे त्याप्रीत्यर्थ आजच आपली आवडती मस्तानी आमच्या सेनापतीची शृंगारदासी झालेली आपणाला पहावयास सापडेल ” तो लगेच त्रिंबकरावांकडे वळून म्हणाला, “ सेनापतीसाहेब, आपण पेशव्याना जिवत पकडलें हे एका परीनें चागले झाले.”

" मी आता जे शब्द बोललों ते खरे होण्यानें आपणालाही बदल्याचा न्याय मिळणार आहे यास्तव निदान मस्तानी आपल्या जनानखान्यात झळकूं लागे-पावेतो तरी आपण पेशव्यांना जिवत ठेवले पाहिजे. बडेखान पठाणानाही मीं हेंच सांगितलें आहे आपण असल्या गुन्हेगाराला एकदम मरू दिलें तर आपण तो अस्थानीं उपकार केल्यासारखें होईल."

कोन्हेररामाचे हे शब्द पेशव्यांना चीड आणणारे होते यात सशय नाहीं पण ते यावर काहीं बोलले मात्र नाहींत कोन्हेरराम आपल्या कृत्रिम दाढीमिशा उपटून काढीत त्रिंबकरावाना पुन्हा म्हणाला, " चला, मीं जी भूमिका घेतली, ती बहुताशीं पार पाडली पेशवे व त्याचे साथीदार आपल्या हातीं सापडलेच. आता आपल्या शत्रूपैकीं हातीं सापडावयाचे असे दोघे राहिले आहेत एक शिवाजीपत मोघे व दुसरे आपले मामा मानसिंगराव टोके त्यानीं तिकडे हैदोसधुळा माडला आहे त्याना ता जोगाडही सामील झाला आहे."

" कोणता जोगडा ? " त्रिंबकरावानीं विचारलें.

" तो देवालयातील जोगडा त्याने फार दूरवर कारस्थाने चालविलीं असावीं असें एकदर प्रकारावरून दिसतें "

" त्याला तुम्हीं अखेर कैद केलें नाहींच का ? एकट्या भास्कररामावरच ती जबाबदारी टाकून आला ? "

' त्याला कैद करणें तुम्हा आम्हाला वाटतें तितके सोपे नाहीं. आपल्यानलेच शिवाजीराव, त्यांचे हे दिवटे पुतणे व आपले दिवटे मामा असे घरभेदे त्याला साह्य करावयाला धावून गेल्यावर तो शिरजोर होऊन बसेल नाहीतर काय होईल ? " कोन्हेरराम म्हणाला त्यानें आपल्या व आपल्या भावाच्या न्याड-पणावर पांघरूण घालण्याचा हा प्रयत्न केला पण तो तितकासा साधला नाहीं त्रिंबकरावानी थोडक्यात पण कसून त्या प्रकरणाची चौकशी केली त्या चौकशींतून खरा प्रकार ओघाओघानें आपोआपच बाहेर आला लक्ष्मी हातीं लागली नाही व राधा एथवर येऊन पोहोंचली आहे, तिनें भास्कररामाला चागलाच हात दाखवला व तिच्यापायीं सयाजी गायकवाड हकनाहक बळी पडला वगैरे प्रकार कोन्हेर रामाच्या तोंडूनच त्रिंबकरावांना ऐकावयाला मिळाला त्यामुळे साहजिकपणेंच त्यांच्या मनांत कोन्हेररामाबिषयीं अनादर उत्पन्न झाला. त्या अनादाराला जोड

देण्यासाठींच कीं काय बडेखान घाबऱ्याघाबऱ्या तेथें धावत आला व त्रिंबकरावांना सांगूं लागला, "सेनापतीसाहेब, तुम्हीं आमच्याशीं एकंदरींत दगलबाजीनें वागता."

"खानसाहेब, तुम्हीं पुन्हा पूर्वपदावर आलां मी स्वतःच्या कर्तव्यापुढे लग्नाच्या बायकोची उभ्या जन्माची लग्नगाठही एका हिसक्यासरशी तोडून टाकली गिरिजा मला जे सांगत होती, ते माझ्या हिताचेच सांगत होती, पण तिचें सांगणें मीं ऐकलें नाहीं, व तुमच्या तंत्राने वागलो, तरीही तुम्ही मला दगलबाज म्हणता! परमेश्वर कृपेने,—" त्रिंबकराव कैद केलेल्या मंडळींतील पेशव्यांकडे बोट दाखवून म्हणाले, "हे एवढे सावज आपल्या हातीं लागले आहे यामुळें मला एवढेंच सुख होत आहे, की, भार्यानाशाचें दुःख त्यापुढे मी कःपदार्थ मानतों आतां आपले उभयतांचे मनोरथ पूर्ण होण्याला फारसा अवकाश उरलेला नाही. तुम्ही आम्ही मिळून आतां उभ्या गुजराथ माळव्यांत पेशव्याचें नाव देखील निघणार नाहीं अशी बेमालूम उपाययोजना हां हां म्हणतां करू, तोंपर्यंत तरी आपण आपली बुद्धि चळ देऊं नका"

'सेनापतीसाहेब!' बडेखान उपहासपूर्वक हासून म्हणाला, "तुम्हां सर्वच मराठ्यांचे दाखवावयाचे व खावयाचे दात निरनिराळे असतात, हे मला आतां चांगले कळूं लागले आहे"

"खानसाहेब! जरा डोकें ठिकाणावर असूं द्या तुम्ही सर्वच मराठ्यांना एक मापानें मोजूं लागला तर तें मी मुळींच सहन करणार नाहीं मला तुमच्या ह्या बाचाळतेपासून एवढाच अर्थ घेता येतो कीं, मस्तानीला हस्तगत करण्याच्या कामीं तुमचे दात तुमच्या घशात आले असावे खरें ना?" त्रिंबकराव खानाच्या चेहऱ्याकडे न्याहाळून पहात म्हणाला "तुमचा चेहेराच तुमच्या फजितीची साक्ष देतो आहे"

"आणि तुमचे बोल तुमच्या दगलबाजीची साक्ष देत आहेत मस्तानी मुळींच जाग्यावर नसता तुम्हीं व तुमच्या हस्तकानीं आमच्या डोळ्यात धूळ फेंकण्यासाठीं मस्तानी येथें आल्याची खोटीच गप्प उठवली."

"काय म्हणालांत?" त्रिंबकरावांनीं विचारले.

बडेखानाची तक्रार व त्या दोघांचें रागारागाचें संभाषण ऐकून पेशवे, बळवंतराव वगैरे कैदी मंडळींच्या चर्येवर कुतूहल उत्पन्न झालेले दिसत होतें, तर कोन्हेरामाची चर्या भीतीनें काळवंडली होती मस्तानी तेथें मुक्कामाला आल्याची खबर

त्यानेंच आपण होऊन त्रिंबकराव व खान याना दिलेली होती त्या एका बातमी-पायींच खान व त्रिंबकराव एकजात उल्लू बनले होते व गैबखान आणि तुरुक-ताजखान सकाळच्या झटापटींत बळी पडले त्याचे कारणही अप्रत्यक्षतः मस्तानीचा अभिलाष हेंच होतें. आताच त्या साधूला कैद करण्याचे बाबतींत कोन्हेर रामाला स्वतःची फटफजिती झाल्याकारणाने त्रिंबकरावाची इतराजी सहन करावी लागली होती त्यातच मस्तानीविषयींच्या आताच्या बातमीची भर पडली व त्रिंबकरावानाही त्याच क्षणाला मनोमय असा सशय आला की, कोन्हेरराम हा मूर्ख तरी असावा किंवा फितूर तरी असावा तरीही कोन्हेररामाने स्वतःवर येणार आक्षेप शक्य तों टाळण्याच्या हेतूनें मखलाशी केली, " खानसाहेब ! मस्तानीनें तुमच्या डोळ्यात खाशी धूळ फेकली असावी " तो त्रिंबकरावांकडे वळून म्हणाला " सेनापतीसाहेब ! ही नाजुक कामगिरी आपण एकट्या खानावर सोंपविली हें बरें केले नाही "

बडेखानाला कोन्हेररामाचे हे कुरघोडीवजा शब्द ऐकून सताप आला तो एक-दम जंबिया घेऊन कोन्हेररामावर रोख धरून धांवून जात म्हणाला, " बदमाष ! सर्वांशींच इतकी फंदफितुरी ? " तेवढ्यात कोन्हेरराम त्रिंबकरावाच्या पाठीमागें लपला म्हणून बचावला बडेखानाचा त्यामुळे नाइलाज होऊन तो म्हणाला, " सेना-पतीसाहेब ! असल्या एकजात फितुराला तुम्ही पाठीशीं घालता, मग तुमचा सशय कोणाला येणार नाहीं ? "

त्रिंबकराव किंचित शांत होऊन म्हणाले, " हा काहीतरी समजुतीचा घोटाळा आहे "

बडेखान आपले टपोरे डोळे गरगर फिरवीत व नाक फेदारीत म्हणाला, " यांत घोंटाळा मुळींच नाहीं कोणाचीही सहज समजूत पटण्यासारखी ही गोष्ट आहे मला असें ठाम वाटतें कीं, तुम्हीं ह्या तुमच्या बदमाष हस्तकामार्फत मस्तानीला अगो-दरच आपल्या जनानखान्यांत नेऊन आमच्या तोंडाला पानें पुसलीं असलीं पाहिजेत. किंवा मी आतांच तिकडे ज्या बातम्या ऐकल्या त्यांवरून ह्या बदमाषानें तुम्हां आम्हां दोघानाही एकजात फसविलें असले पाहिजे " तो कैद झालेल्या पेशव्याच्या तोंडाकडे पहात म्हणाला, " हा तरी खरा पेशवा आहे अशी तुमची खात्री आहे का ? "

खडेखानाचा हा सवाल ऐकून सर्वांच्या चर्या क्षणात पालटल्या त्रिंबकराव, कोन्हेरराम व बळवतराव, पेशव्याच्या तोंडाकडे टकमक पाहू लागले बळवतरावाच्या दृष्टीत जिज्ञासेचे पाणी खेळू लागले, तर कोन्हेररामाची दृष्टि अधिकच घाबरट दिसू लागली त्रिंबकरावांनी बराच वेळपर्यंत पेशव्याकडे सारखी टक लाविली होती काहीं वेळाने ते खडेखानाकडे वळून म्हणाले, " हा पेशवा नसेल तर दुसरा कोण बरे असावा ? खानसाहेब ! तुमच्या शकित बोलण्यावरून माझ्या मनातही नसत्या शकाकुशका उत्पन्न होऊ पहात आहेत "

खडेखान पेशव्याच्या चेहऱ्याकडे निरखून पहात म्हणाला, " नगासारखा नग दिसतो खरा, पण तो खरा आहे कीं नकली आहे, हें कसे ओळखावें ? मस्तानीच्या बाबतींत देखील माझी अशीच सोळा आणे फजिती झाली मी मस्तानीच्या मकाणासभोंवार इतका कडेकोट गराडा घातला होता कीं, मुंगीलाही आत बाहेर रीघ मिळू नये, पण याउपरदेखील मस्तानी माझ्या हातावर तुरी देऊन निसटलीच व तिच्याऐवजीं एक गोरापान खुबसूरत, छेलछबेला समोर येऊन बातमी सागू लागला की, " मस्तानी केंव्हाच पेशव्याकडे निघून गेली "

" पण हा पेशवा तर येथे आहे ! " त्रिंबकराव आश्चर्यपूर्वक म्हणाले

त्या दोघाचे वरच्याप्रमाणे सभाषण चालले होतें तेव्हाच पेशवे, नारायणजी व आवजी याच्यात नेत्रपल्लवी सुरू होती साक्षात् काळाच्या जबड्यात उभे असताना प्रसन्न चित्तानें बेदरकारपणे वागणाऱ्या त्या त्रिकुटाला पाहून त्याच्या कट्टया शत्रूलादेखील कौतुक वाटलें असते त्याप्रमाणें त्रिंबकरावाना कौतुक वाटतही होतें बळवंतरावाच्या कुतूहलाला तर सीमाच नव्हती आता त्याची नजर कसली तरी महत्त्वाची व पक्की ओळख पटल्याची साक्ष देत होती. त्या साऱ्या मडळींत दुष्टाव्याची तीक्ष्ण नजर अशी एकट्या कोन्हेररामाचीच होती खुनशीपणा, सूडाची जागती भावना, मनाची अनुदारता, स्वार्थाची पराकाष्ठा, स्वाभिमानाची शून्यता वगैरे सर्व दुरात्म्याचे दुर्गुण त्याच्या दृष्टींत एकवटले होते. त्याने त्रिंबकरावांच्या तोंडचे शब्द ऐकले न ऐकले तोंच एकदम स्वतःच्या वाचेनें गोपनस्फोट केला, " हा कृष्णराव ! हा पेशवा नव्हे "

प्रकरण तेविसावें

# दाणादाण !

कोन्हेररामाच्या तोंडचे ते शब्द ऐकून बडेखान तर आश्चर्यातिरेकानें हा ।मुर्दा थिजून गेला तो म्हणाला, "पहा मराठे दगलबाज असतात, असें मी म्हणतों त्याचें हे प्रत्यतर पहा"

इतका वेळ स्तब्ध असणारे पेशवे किंवा आता कोन्हेररामाच्या तोंडून गोपन स्फोट झाल्यामुळें खरें बोलावयाचें तर तो कृष्णराव अगदी स्तब्ध होता आता आपले गुपित राखणे शक्य नाहीं असे पाहून तो बडेखानाला म्हणाला, "खानसाहेब ! काम पाहून मुशाहिरा व घोडा पाहून खरारा हे आम्हा मराठ्याचें व्यावहारिक गमक आहे मुद्दयाला मुद्दा व गुद्दयाला गुद्दा कसा द्यावा, वाकड्या मेढीला वाकडी दर कशी खणावी, धटाशीं धट आणि उद्धटाशीं उद्धट कसे व्हाव ही व्यावहारिक कल्पकता उपजतच मराठ्याचे आगीं बाणलेली असते दगलबाजाच्या दग्याला आम्ही भोळेपणाने बळी पडलो तर मराठे कसले ? तुमची शंका बरोबर आहे" तो त्रिंबकरावाकडे वळून म्हणाला, "सेनापतीसाहेब ! इतक्या लौकर तुमच्या मनाचा विरस करण्याचा माझा विचार नव्हता पेशव्याना दगा देण्यासाठीं आपण दुनिया उलथीपालथी करीत होता, पण असल्या नीच मनाच्या शत्रूवर विसंबून वागण्याइतके पेशवे भोळे आहेत, असा जो आपणाला भ्रम झाला होता त्या भ्रमाचा भोपळा आता फुटला, तो नव्हेसा होत नाहीं" कोन्हेररामाकडे बोट दाखवून तो म्हणाला, "चांडाळाहूनही चांडाळ अशा ह्या ब्राह्मणजातीच्या जिवत कलकानें जो शोध लावला तो अक्षरशः खरा आहे तुमच्याहातीं हा जो देह सापडला तो पेशव्याचा नव्हे, पेशव्यांच्या एकनिष्ठ सेवकाचा आहे पेशव्याच्या जिवावरून पंचप्राणाची कुरवंडी उतरण्याला स्वयंस्फूर्तीनें पुढे आलेल्या ह्या कृष्णरावाला आपण काय पाहिजे ते शासन करा, पाहिजे तर ठार मारा त्यामुळें माझा जन्म सार्थकीं लागला असेंच मी समजेन"

"तू कृष्णराव ! पेशव्याचा दीडदमडीचा सेवक ! आणि माझी बायको तुझ्यापायाना मिठी मारते !" त्रिंबकराव दातओठ खात रागारागानें मुठी आवळीत म्हणाला.

" आफ्सोस् ! आफसोस् ! " बडेखान एकाद्या उन्मत्ताप्रमाणे हातवारे करीत, डोळे गरगर फिरवीत व भुवया वर चढवीत म्हणाला

" खानसाहेब ! कसला आफ्सोस करतां ? आठ घटकापुरता पेशव्यांचा पेहराव ह्या सामान्य देहावर चढला न चढला तोंच त्याने तुमच्या व सेनापतीच्या अंत:पुरांतील नायकाना जर एवढी भुरळ पाडली तर प्रत्यक्ष पेशवे समोर दिसल्या-वर त्यांची काय गत होईल आणि नायकानीं लाथाडलेल्या तुम्हा नामर्द मर्दांची कशी दैना उडेल याचा तुम्हीच आपल्या मनाशीं विचार करा "

कृष्णराव बडेखानाशी बोलतो आहे तोंच कोन्हेररामाने त्रिंबकरावाना कानमंत्र दिला, " सेनापतीसाहेब, हीं माणसें मोठी डोक्याची व दगलबाज आहेत यांना आपण हा वेळपर्यंत शाबूत ठेविलें हीच मोठी चूक केली नारायणजी आणि आवजी तेथल्या एवढ्या चक्रव्यूहांतून निसटून एथवर कसे आले तें आपण पाहिलेतच इतक्या सगळ्या गोष्टी ध्यानीं घेऊन आपण या वेळी प्रसंगावधान राखले पाहिजे "

कृष्णराव, बळवतराव, नारायणजी व आवजी या चौघांनींही कोन्हेररामाचा कळलावेपणा ओळखला व आतां जीविताची आशा करण्यात अर्थ नाहीं असा विचार करून मारूं किंवा मरू अशा ईर्षेनें त्यांनी आपल्या बाहूंच्या एका विस्फारणाबरोबर सभोवारचे कैक सैनिक कोलमडून टाकीत 'हरहर महादेव' अशी मोठ्यानें आरोळी ठोकली त्याबरोबरच नारायणजींनी एक विचित्र ध्वनि केला तो ध्वनि सांकेतिक होता तो ध्वनि ऐकताच सभोवार उभ्या असलेल्या त्रिंबकरावाच्या फौजेतून कैक शिपाई त्याच्याजवळ धावत आले, व त्यानीं त्रिंबकरावांच्या सैनिकाशीं हातघाई सुरू केली त्रिंबकराव, कोन्हेरराम व बडेखान यानी तर हा प्रकार पाहून तोंडात बोटें घातलीं. बडेखान म्हणाला, " मघाशीं मीं मस्तानीला पकडावयाला गेलो तेव्हांही असाच प्रकार झाला या दगल-बाजीचा अर्थ काय ?"

" त्याचा अर्थ तोच " कृष्णराव खानाला बेसावधपणे बोलतांना पाहून मागाहून धांवत येऊन खानाच्या वर्मी तरवारीचा वार करीत म्हणाला, " खान-साहेब, याला म्हणतात मराठी कावा मुद्दयाला मुद्दा व गुद्दयाला गुद्दा असें मीं जें तुम्हाला मघा सांगितले, त्याचा अर्थ हा "

खानाला दोन शब्द बोलण्यालाही अवसर मिळाला नाहीं, इतका कृष्णरावाचा

वार त्याच्या वर्मी झोंबला आता ही जिवावर उदार झालेलीं माणसें काय करतील व काय नाहीं याचा कोणालाही भरवसा वाटेना त्रिंबकराव थोडक्यावर बचावले, नाहींपेक्षा तेही कृष्णरावाच्या एकाद्या वाराला अचानक बळी पडावयाचे. तेवढ्यांत त्रिंबकरावानीं स्वत त्याच्यावर शस्त्र उगारले, व आपल्या सैनिकांनाही आज्ञा केली, " हे लोक आणि याचे साथीदार यापैकीं जे जे सापडतील त्याना त्याना जागच्याजागीं ठार करा "

त्रिंबकरावांची ही आज्ञा अमलांत येण्याला कालावधि लागला नाहीं हां हां म्हणता त्याच्या सैनिकानीं तोतया पेशव्याच्या वतीने मालूम वेषांतर करून आपल्या गोटात शिरलेल्या लोकाना तांदळांतल्या खड्याप्रमाणे वेचून काढून यमसदनाला पाठविलें तरीही कृष्णराव, नारायणजी व आवजी या वीरानीं मरतां मरतां त्रिंबकरावाना कानानीं ऐकवणार नाहींत असे शिव्याशाप देण्याला कमी केलें नाहीं कृष्णरावाला त्रिंबकरावाच्या हातातील भाल्याचा तीक्ष्ण वार लागला व तो खालीं पडला, तेव्हा बळवतराव मोघे त्याच्याजवळ उभा राहून कृष्णरावाला न मारण्याविषयी त्रिंबकरावांची परोपरीनें विनवणी करीत होता त्या विनवणीचा उपयोग कृष्णरावाला काहींच झाला नाही, पण बळवतराव मात्र, 'महापूरें झाडे जाती, तेथे लव्हाळे वाचती', या न्यायाने स्वत'चा जीव बचावूं शकला. इतकेंच काय पण त्रिंबकरावांनाही आपल्या हातांतील भाल्याचा तडाखा कृष्णरावाला लागल्यावर तो बळवंतरावाचा मेहुणा असे कळून येतांच आपल्या आततताईपणाबद्दल खेद झाला. गिरिजा पेशव्याच्या गळीं पडली असा जो त्यांचा ग्रह झाला होता तो अजूनही कायम होता पण त्याबद्दल त्याना आतां पेशव्यांनाही दोषी धरता येण्याजोगें नव्हतें, कारण पेशव्यांना त्याची दादही नव्हती आणि कृष्णरावाला दोषी धरता येण्याजोगे नव्हते याचे कारण त्याने पेशव्याची तोतयेगिरीची जी भूमिका घेतली होती, ती अखेरपावेतों यथावत् रगविली

त्रिंबकरावानीं बळवंतरावापाशीं झाल्या प्रकाराबद्दल खेद प्रदर्शित केला त्या नुसत्या प्रदर्शनानें बळवतरावाचें समाधान झालें किंवा नाहीं ही गोष्ट निराळी, पण त्रिंबकरावांनीं कृष्णरावाची शुश्रूषा करण्याची परवानगी बळवतरावाला दिली व स्वत. खट्टू मनानें तेथून निघून जाऊ लागले कोन्हेररामानें पुन्हा लुब्रेपणा करून त्याच्याशीं बोलण्याचा प्रयत्न केला. पण त्यामुळें त्यांच्या रागांत उलट जास्त भर पडली ते एकदम उसळून कोन्हेररामाला म्हणाले, " कोन्हेरराम ! तूं

नीच चांडाळ आहेस तू जातीनें ब्राह्मण आहेस, म्हणून मी तुला आजवर जवळ केले, पण खाल्ल्या घराचे वासे मोजण्याचें ग्राळकट्ट तुला पाजण्यांत आलेलें आहे दानतीचा विटाळ तुलाच काय पण तुझ्या कैक पिढ्याना कधीं झाला नसेल असला माणूस जोडयापाशीं देखील उभा रहाण्याच्या लायकीचा नाहीं.—"

"पण सेनापतिसाहेब ! तेच जोडे आपण शिरीं घेऊन आजवर नाचला !" बळवतराव म्हणाला, "आपणासारख्या शहाण्यासुरत्या माणसाला याच नीचानें आजवर पक्का पागल बनविले याच्या नादीं लागून आपण आमच्याशीं शत्रुत्व आरंभिलें, आपल्या जन्माच्या सोबतिणीविषयींही भलता संशय घेऊन तिची अशी वाताहात उडविली असल्या जगाच्या संकटसतोषाला यापुढें तरी आपण योग्य शासन केले नाही, तर—"

"हू ! बळवतराव ! तोंड आटोप !" कोन्हेरराम बळवतरावाला पुरतेपणीं बोलूं न देता मध्येंच म्हणाला

"अगोदर तू तोंड आटोप व एथून काळें करून चालता हो !" त्रिंबकराव कोन्हेररामाला म्हणाले, "माझ्या रागाच्या धडाडलेल्या अग्निकुंडात विनाकारण आपला बळी देऊ नकोस"

"सेनापतिसाहेब ! धूर्त माणसें विनाकारण काय पण सकारण देखील स्वतः काडीइतकाही त्रास सोसण्याला तयार नसतात तशीच वेळ आली तर आम्ही हा महा नीच माणूस—हा नावाचा ब्राह्मण पण कृतीचा चांडाळ-क्षुल्लक स्वार्थासाठीं अथवा करमणुकीखातरही आपला बळी घ्यावयाला कमी करावयाचा नाही" बळवतराव म्हणाला

कोन्हेरराम आपल्या मर्मभेदक दृष्टीनें बळवतरावाकडे पाहून त्रिंबकरावांकडे वळला व म्हणाला, "सेनापतिसाहेब ! आपण भोळे आहा कोणाही धूर्त ठकसेनानें आपल्या डोळ्यांत सहज लीलेनें धूळ फेकावी—"

"म्हणूनच तुम्हीं त्याच्या डोळ्यात धूळ फेकलीन !" बळवतराव म्हणाला.

"नाहीं, म्हणूनच तू त्याच्या डोळ्यात धूळ फेकीत आहेस" कोन्हेरराम म्हणाला

"खबरदार !" त्रिंबकराव तरवारीला हात घालीत कोन्हेररामाला म्हणाले, "कोन्हेरराम, तू माझा अंत पहात येथें चोंबडेपणानें उभा राहशील तर खबरदार !"

कोन्हेरराम स्वामिनिष्ठेचें ढोंग माजवून म्हणाला, "काय ? सेनापतीसाहेब !

आजवर मी आपणाशी इतक्या नेकीने वागलो, आपले प्रिय करण्याच्या एका ध्येयापुढे मानमान्यता, धनदौलत, कीर्ति, पापपुण्य काही पाहिलें नाहीं, त्या स्वामिनिष्ठेची फेड आपण अशी करणार काय ?"

त्रिंबकरावांचा संताप म्हणजे प्रतिदुर्वासाचा अवतार असे. ते कोन्हेररामाच्या चोंबडेपणा पाहून फारच चिरडीला जाऊन म्हणाले, "माझ्या अधःपाताला कारण तू चांडाळ, मला भलभलत्या नादी तू लावलेंस, व परिणामी माझा केसानें गळा कापलास पेशवे व सेनापति यांच्यातील वाद कितीही तीव्र असला तरी तो तत्त्वाचा वाद होता. त्यात स्वार्थ असला तरी तो पुरुषार्थाला साजेसा स्वार्थ होता. पण त्या माझ्या पुरुषार्थाला काळिमा लावण्याजोगे मोह तू माझ्या मनात भरवून दिलेस माझ्या साऱ्या अधःपाताला कारण तू !"

"गिरिजाबाईसाहेबांविषयीं आपल्या मनात विष यानेच कालविलें" बळवतराव कोन्हेररामाकडे बोट दाखवून म्हणाला, "अशा निर्ढावलेल्या गुन्हेगाराला आपण शासन केले नाही तर मला ते करावे लागेल"

त्रिंबकराव व बळवतराव दोघेही हळुहळू एक विचाराने बोलत आहेत, आता त्यांच्यासमोर आपला काही पक्ष यावयाचा नाहीं, हे ओळखून कोन्हेररामानें आपली मखलाशी आवरती घेतली व "सेनापतिसाहेबाना जर माझी पर्वा नाही, तर मला तरी त्याची पर्वा कशाला पाहिजे !" असे म्हणून तेथून पाय काढला त्यामुळें तेथे व्हावयाचा अतिप्रसंग टळला हा थोडासा वेळ जो विचार करण्यात गेला, तेवढ्या वेळांत त्रिंबकरावाचें मन खाऊ लागले कीं, आपला मार्ग एकदरींत चुकतो आहे त्यामुळे त्याना पुढे पाऊल टाकण्याला हुरूप येईना व मागे पाऊल घेणें त्याच्या दुराग्रही आणि स्वाभिमानी स्वभावाला रुचेना मनुष्याची अशी द्विधा वृत्ति झाली कीं, त्याला काहींच सुचेनासें होते त्रिंबकरावाचेंही तसेच झाले ते तशाच द्विधा वृत्तीने बळवतरावाला कृष्णरावाची काळजी घ्यावयाला सागून तेथून निघून गेले सर्वांना आश्चर्य येवढेच वाटलें की, त्यानी जवळच मरून पडलेल्या आपल्या धर्मपत्नीच्या प्रेताची काही विचारपूस देखील केली नाहीं

बळवतराव कृष्णरावाचे डोकें मांडीवर घेऊन त्याचा समाचार घेऊ लागला, तेव्हा कृष्णरावाने हताशपणे विकट हास्य करीत त्याला म्हटले, "बळवंतराव ! तुमचे हे सारे प्रयत्न आता व्यर्थ आहेत एकतर माझें जिणें सत्कार्यीं खर्ची पडत असल्यामुळे मला त्यात समाधान आहे, व दुसरें, दगलबाज बायकोचा दुबळा

नवरा अशी दुनियेकडून स्वतःची छी थू करून घेण्यापेक्षा मला मरण शतपटीनें बरे वाटत आहे राधेनें कसे काय प्रताप गाजविले हे तू आता ऐकलेच आहेस. अशा पापिणीला तिच्या पापाबद्दल देहान्त प्रायश्चित्त देण्याचा माझा निर्धार होता, पण तें मला आता शक्य नाहीं मी आता केवळ अर्ध्या पाव घटकेचा ह्या जगाचा सोबती आहे. पण जी माझी अब्रू तीच तुझी अब्रू जगाने माझी बायको नादान् म्हटलें काय किंवा तुझी बहीण नादान म्हटलें काय दोहोंचाही अर्थ एकच. तेव्हा माझी अखेरची इच्छा जर तुला पुरवावयाची असेल तर तू एवढेंच कर की, त्या कुलकलंकिनीला ह्या जगात नांदू देऊ नकोस"

कृष्णरावाच्या तोंडचे शब्द पुरे होतात न होतात तोंच तेथें आपणाला पूर्वी देवालयात परिचित झालेला तो साधू बरोबर दोन चार माणसाना घेऊन दत्त म्हणून उभा राहिला त्या साधूबरोबरच्या सर्वच माणसाचे वेष जरी पुरुषाचे होते तरी त्यात दोन पुरुषवेषधारी बायका होत्या त्याची ओळख बळवतरावाला पटण्याला मुळींच अवधी लागला नाहीं त्यातील एक त्याची स्वतःची पत्नी लक्ष्मी होती व दुसरी त्याची बहीण अर्थात् कृष्णरावाची बायको राधा होती त्या दोघींनीं व त्या साधूनेंही कृष्णरावाच्या तोंडचे उद्विग्नतेचे मरणोद्गार ऐकले होते तीं तिघेंही तेथें आलीं, तरी कृष्णरावाचें त्याच्याकडे लक्ष गेलें नाहीं. तो शरीरावरील जखमाच्या प्राणांतिक वेदनामुळे बोलता बोलता श्रमून थाबला होता, तो थोडी उसंत खाऊन पुन्हा म्हणाला, "तसेच माझी आणखी एक अखेरची इच्छा तू पुरी कर माझी आई आम्हाला भेटण्यासाठीं उत्सुक होऊन वणवण करीत येथवर आली आहे नदीच्या काठीं धर्मशाळेत कोठें तरी ती असेल तिला भेटून तू सर्व वृत्तान्त तिला निवेदन कर व तुझे मुलगे तुझ्या इच्छेप्रमाणें स्वामीकार्यासाठीं मरून अजरामर झाले, असें तिला साग. त्याप्रमाणेच तिला म्हणावें, तुझी सून मेली—ती वाटेची आडवाटेला गेली, अर्थात ती—मेल्यातच जमा तुझी आमची भेट आता स्वर्गात एवढें तिला साग व यापुढें आमच्या अभावीं तूच तिला माता मानून आसरा दे माझ्याच्यानें जास्त बोलवत नाहीं आता अखेरची इच्छा म्हणून मी तुला आणखी एक विनंति करतों पेशवे सरकाराच्या जीवितावर व अब्रूवर गिधाडाप्रमाणे टपून बसलेल्या त्या सेनापतीला ह्या जगातून तू नाहींसा कर, कीं माझी ह्या जन्मींची अखेरची वासना तृप्त होईल. व एका जबरदस्त घरभेद्या देशद्रोह्याला जगातून नाहींसा केल्याबद्दल तुला फार मोठें पुण्य लागेल. धन्यासाठीं मरून पुण्य संपादणाऱ्या

माझ्यासारख्या दुबळ्या स्वामिनिष्ठापेक्षा तुझी पुण्याई मग निःसशय अमोल ठरेल मी आता येतों —राम !"

" कृष्णराव ! कृष्णराव !" त्या साधूने कृष्णरावांजवळ जाऊन हाका मारल्या

" दादा ! दादा ! ' लक्ष्मीने हाका मारल्या

पण कृष्णराव इहलोक सोडून गेला होता, तो 'ओ' कोठून देणार ? राधेनें त्याच्या जवळ जाऊन आसवांनी डबडबलेल्या दृष्टीने त्याच्याकडे पाहिले, तेव्हा तिची पाच चार आसवें गळून त्याच्या मुखात पडलीं बळवतरावाच्या मनात अजून राधेविषयींचा सशय कायम होता, व कृष्णरावानें तिला शासन करावयाला सागितलें, ते त्याचे अखेरचे बोलही त्याच्या कर्णरध्रात घुमत होते त्याने त्या आवेशाच्या भरात तरवार उगारून म्हटलें, " राधे ! कृष्णरावाची अखेरची आज्ञा—"

" ती अखेरची आज्ञा आम्हीं सर्वांनी ऐकली आहे" साधूनें बळवंतरावाचा हात वरच्यावर धरून म्हटलें, " बळवतराव ! राधा किती पवित्र आहे याची तुला खात्री नसली तरी मला आहे. तू मला ओळखलेस का ? "

" नाही " बळवतराव म्हणाला.

" राधा श्वेतकुष्ठाने जन्मापासून पीडित होती, त्या रोगापासून तिला मुक्त मींच केलें राधा ही परम पतिव्रता आहे व तिच्या उदरीं अतुलपराक्रमी पुत्र जन्माला येणार आहे असे भविष्य मींच तेव्हा वर्तविले होते तेव्हाच तिच्या कपाळीं अकालवैधव्याचा कुयोग असल्याचेंही मीं सागितले होते ते भविष्य—ती भवितव्यतेची योजना आता तंतोतत खरी होऊं पहात आहे"

' गोष्ट खरी, पण आपण राधेच्या पापावर पांघरूण का घालता ? "

" तिने पापे केलींच नाहीत, तर त्याच्यावर पांघरूण कशासाठी घालावयाचे ? तिला जर पापमार्गाचें अवलंबन करावयाचें असतें, तर ती एथवर वणवण करीत कशाला आली असती ? राधा पूर्ण निरपराधी आहे, व हा सारा त्या नीच कोल्हटकर बधूच्या कृष्णकारस्थानाचा प्रभाव आहे, एवढेंच मी तुला तूर्त सागून ठेवतों आपणाला सध्या शत्रूचे पारिपत्य करण्यापुढे स्वजनाचा छळ करण्याला फुरसत नाहीं." साधु म्हणाला

" आपण असें सांगता तर माझा आपणावर पूर्ण विश्वास आहे आपली आज्ञा मला शिरसा मान्य आहे " बळवतराव म्हणाला

" तुमच्यावर सोपविलेली कामगिरी तुम्ही केली का ? " साधूनें विचारलें, " पेशवे सुखरूपपणे नर्मदेपार झाले का ? "

" पेशवे एथें आलेच नाहींत "

" म्हणजे काय ? "

" म्हणजे तेच–कृष्णरावच–पेशव्याचा वेष घेऊन इकडे आले होते, व कोन्हेर-राम ऐन वेळीं इथें आला नसता तर तोतया पेशव्याचें हे कारस्थान अखेरपावेतों उजेडात आलें नसतें " बळवतराव म्हणाला

" तसे व्हावयाला नको होतें. यामुळे होईल काय, सेनापतीचा पेशव्यांच्या मागचा ससेमिरा काहीं केल्या हलावयाचा नाहीं पेशव्याच्या बाबतींतील त्याची सूडबुद्धि अजून कायमच असेल आता याला उपाय काय ? " साधूनें विचारलें

' याला उपाय ? " राधा कृष्णरावाच्या शवाचे मस्तक मांडीवर घेऊन ढळ-ढळा रडत होती, ती शोक आवरून म्हणाली, " आता याला उपाय एकच, सेनापतीवर सूड घ्यायचा—"

" राधे ! एवढ्या मोठ्यानें असे बोलू नये या घटकेला आपण दुबळीं आहों " बळवतराव म्हणाला

" दुबळीं असलों म्हणून काय झालें ? दुबळेपणाचें भय तुम्हाला वाटत असेल तर तुम्ही भिऊन वागा, पण मला आता कशाचेंही भय नाहीं गमावण्यासारखें काहींच माझ्यापाशीं उरलें नाहीं माझ्या सर्वस्वाची राखरांगोळी ज्या चांडाळानें केली, त्याची राखरांगोळी मी करीन " राधा कृष्णरावाच्या निस्तेज प्रेतमुखावरून हात फिरवीत म्हणाली, " माझ्या मंडळीची अखेरची इच्छा मी पूर्ण करणार सेना-पतीनें त्या नराधमानें माझ्या कपाळींचें कुंकू पुसलें त्या ऐवजीं मीं त्याच्यावर सूड घेऊन त्याच्या बायकोच्या कपाळींचें कुंकू पुसणार ! "

" सेनापतींची बायको त्याच्याच हातून ठार मारली गेली ! " बळवतराव म्हणाला.

' असें झालें ? एकूण ती परमेश्वराची होती म्हणायची तर ! आणि खरेंच, मी तिच्यावर सूड का म्हणून घ्यावा ? नवऱ्याच्या अपराधाबद्दल तिला प्रायश्चित्त

का म्हणून ? बस्स ! मी खुनाला खून घेईन, त्या चांडाळाच्या रक्ताने पतींचें तर्पण करीन, आणि मग आनंदाने सती जाईन."

"काय म्हणालीस सती जाईन ? "साधूनें राधेकडे वळून विचारले, "राध ! सती जावयाला तू मोकळी तरी आहेस का ? सती जाऊन तू बालहत्येचें पातक जोडणार ? स्त्रिया सती कशासाठीं जातात ? आपलें पतीवरील आत्यंतिक प्रेम सार्थ करून पुढील जन्मी पतीसमवेत उत्तम लोकाची जोड मिळविण्यासाठींचना ? मनुष्यमात्राला पुण्य समाधान वगैरे इहपारलौकिक महल्लाभ साधावयाचे ते कर्तव्यपालनानेंच साधतात. तुझ्या पतीची अखेरची आज्ञा तू पाळली पाहिजेस, ज्या सद्वंशविस्ताराचें पवित्र कार्य पार पाडण्यासाठीं तू तुझ्या पतीशीं विवाहबद्ध झालीस, त्या वंशाचा अंकुर तुझ्या उदरीं उगवला आहे. त्याची जोपासना करून वंशवृक्षाची वाढ करण्यासाठीं तू तत्पर असलें पाहिजेस राधे ! अशीं विविध कर्तव्यें तुला अजून पार पाडावयाचीं असताना तू सती कशी जाशील ? परमेश्वर मनुष्यमात्राला मनुष्याचा जन्म देतो, त्याबरोबरच मनुष्यमात्रासाठीं कांहीं कर्तव्येही त्यानें नियोजिलेलीं असतात तीं कर्तव्यें प्रत्येकानें पार पाडणें अवश्य असतें या न्यायानें तुझ्यासारख्या गर्भवती स्त्रीचें सती जाणें हें कर्तव्य ठरू शकत नाहीं"

"ज्यानीं माझ्या कपाळींचे कुंकू पुसलें, त्याना मी ह्या जगातून नाहीसे करीन —" राधा म्हणाली

"शाबास ! बरोबर बोललीस" साधु म्हणाला

राधा पुढें म्हणाली, "इतकेंच काय, पण माझ्या हातून हा सूड पुरा करण्यासाठीं व माझे पति विद्यमान राहिल्यानें त्याच्या हातून जी देशसेवा झाली असती ती पूर्ण करण्यासाठीं मी चादोरकराच्या वंशांकुराला जिवापलीकडे जतन करून वाढवून लहानाचा मोठा करीन"

"हेंच हेच तू करावें, असा माझा मनोदय होता व आहेही अशा बहिणीचा भाऊ म्हणवून घेण्यात मला केव्हाही अभिमानच वाटेल वीरपत्नी, वीरभगिनी तशीच वीरमाता शोभून आपत्तींच्या ऐन वर्षावांतदेखील आपल्या जन्माचें सार्थक करणाऱ्या तेजस्विनी ! तुला शतश. धन्यवाद असोत" बळवतराव म्हणाला.

साधु उद्गारला, "बळवतराव ! नुसत्या धन्यवादानीं एथें कार्यभाग उरकावयाचा नाहीं प्राप्त प्रसंगाची तीव्रता, भेसूरता आपणां सर्वांना माहीत आहेच.

तुमच्यावरचा प्रसग आता काहींच नाहीं, असा प्रसग आता राष्ट्रावर ओढवण्याचा फार सभव आहे निजाम व बंगष याचे सरदार तुमच्या हातून मेले, त्याबद्दल परिणामीं पेशवेच अत्राबदार धरले जातील व पेशव्याविरुद्ध कुरापती काढण्याला निजामाला वगैरे आयतें फावेल सेनापतीही आता इतके बिथरले आहेत कीं, ते वेळीं उघड उघड शत्रूला मिळावयालाही कमी करावयाचे नाहींत आजच्यासारखी मानखडना सहन करणारे ते सेनापति नाहींत शाहूमहाराजाच्या पदरचा असला अव्वलींचा मोहरा शत्रूच्या कक्षेत गेला तर त्याचा प्रतिकार करणे मग आपणाला फार जड जाईल यासाठीं काय पाहिजे ते करून आपण हा काटा आपल्या मार्गांतून प्रथम काढला पाहिजे ”

“ आपणाला मनुष्यबळही नाही, द्रव्यबळही नाहीं ! ” बळवतराव म्हणाला

“ पण परमेश्वराचे पाठबळ आपणाला आहे ” लक्ष्मी इतका वेळ अगदीं स्तब्ध होती ती म्हणाली, “ तसेंच राधावन्ससारख्या पतिव्रताची पुण्याई आपली पाठीराखी आहे ”

“ आणि मनुष्यबळ व द्रव्यबळ आपणाला नाहीं अशी समजूत तरी तुम्ही का करून घेता ? तुम्ही माझे ऐका व प्रथम याच पावलीं उद्योगाला लागा प्रथम ह्या पापभूमीचा त्याग करा मग पुढचे बेत ” साधु म्हणाला

साधूचे विचार सर्वांना पटले हे सागावयाला नकोच सर्व मडळी त्याच्या नेतृत्वाखालीं तेथून निघाली जाताना राधेने पुन्हा एकवार आपल्या मृत पतीकडे पाहून सेनापतीवर सूड उगविण्याची मनोमय शपथ घेतली

## प्रकरण चोविसावें

# सामना

बाजीराव पेशवे पुण्याहून मोहिमेवर निघाल्यापासून त्यांची आजवर काय अवस्था झाली हे वाचकाना कळणे अवश्य असल्याने आपणाला प्रथम त्या काळातील पेशव्याच्या हालचालीचें सिंहावलोकन करणे अवश्य आहे दसऱ्याच्या सुमाराला बाजिरावाचा मुक्काम पुण्यात मुळा-मुठेच्या सगमावर असताना माडवीच्या दुर्जयसिंगाचा गोवर्धन नावाचा जासूद दुर्जयसिगाकडून पत्र घेऊन पुण्याला आला व त्याच्याजवळचे पत्र वाचून पाहताच बाजिरावानीं आपली मोहिमेबाबतची पूर्व योजना जरा बदलून नारायणजी, आवजी, कृष्णराव वगैरे मडळीवर दाभाड्याशीं सख्य करण्याची कामगिरी सोंपवून स्वतः स्वतत्रपणे आपल्या सैन्यासह गुजराथ माळव्याकडे मोर्चा वळविला त्यांची प्रियतमा मस्तानी त्यावेळीं त्याच्या बरोबर होती. मस्तानीच्या वर्तनाच्या बाबतींत पुण्यातच जे सशयाचे वातावरण निर्माण झालें होतें, त्याचें पर्यवसान कोदडाच्या वाड्याला अज्ञातवास येण्यात व पुढे पेशव्यानी मस्तानीचा त्याग करण्यात झालें, हें वाचकांना माहीत आहेच मस्तानी, कोदड व तो गोवर्धन यांचें पुढें काय झालें तें पुढें आपणाला कळणारच आहे त्याखेरीज आणखी ऱ्याच महत्त्वाच्या गोष्टी बाजीराव पेशव्यांनीं पुणें सोडून मोहिमेवर निघाल्यापासून भडोच येथें पूर्वोक्त अघटित घटना घडून येईपावेतों केल्या होत्या दुर्जयसिगाकडून पत्र घेऊन आलेला गोवर्धन बाजिरावांना पुण्यांतच भेटला होता, व त्या पत्रावरून त्यांना अभयसिगाची बातमी मिळाली होती बाजिरावानीं त्या बाबतीत मार्गांत आणखी बातम्या काढून दाभाडे, निजाम, अभयसिंग वगैरे मडळींचा नक्की अंदाज काढला, तेव्हा एकदर परिस्थितीचें चित्र आरशासारखें त्यांच्या मनश्चक्षू-समोर उभें राहिलें, दिल्लीची बादशाहात तेव्हा बरीच डबघाईला आली होती. बादशहा किंवा त्याचा वजीर खान डौरान याचा त्याच्या वजिरावर मुळींच वचक नव्हता प्रत्येक सुभेदार बादशाहीच्या पडत्या काळाचा फायदा घेऊन आपापला सवता सुभा स्थापण्याच्या विचारात गढून गेला होता, निजाम व बगष यांचीं व त्यांच्या हस्तकाचीं दाभाड्याशीं कारस्थानें सुरूच होतीं सरबुलंदखान हा बादशहाचा सुभेदार तेव्हा गुजराथ प्रातावर होता व तोही आपल्या परीनें स्वतत्र होण्यासाठीं बादशहाविरुद्ध बड करण्याच्या विचारांत होता, त्याचें पारिपत्य करण्यासाठीं म्हणून

वजीर यानीं एक विचाराने अभयसिंगाला गुजराथच्या सुभ्यावर पाठविलें तेव्हा बादशहा व त्याचा दिल्लीच्या बादशहातींत बादशहाच्या विश्वासाला पात्र झालेल्या रजपूत माडलिकात अभयसिंग व जयसिंग हे दोघे प्रमुख होते ते बादशहाची सुभेदारी पत्करून होते. त्यांनीं जेव्हां इतर सुभेदार स्वतंत्र होण्याच्या पंथाला लागले असें पाहिलें तेव्हा आपणही आपल्या राज्याचीं क्षेत्रें वाढविण्याचें ठरविलें. त्याप्रमाणे अभयसिंगानें सरबुलंदखानाला कैद करून दिल्लीला पाठविलें, व अहमदाबाद काबीज करून तेथें तळ ठोकला त्यानें गुजराथ धुतल्याप्रमाणे लुटून कोटयावधि रुपयाची व हजारों तोफांची लूट जोधपुरात–आपल्या राजधानींत–नेली. ह्या सर्व गोष्टी बाजिरावांना त्याच्या बातमीदारामार्फत प्रत्यहीं कळत होत्या अभयसिंगालाही बाजिरावांच्या मदतीची आवश्यकता असल्यानें त्यानें त्यांना मुद्दाम गौरवपूर्वक भेटीला बोलावले.* त्यांनीं धूर्तपणानें अभयसिंगाशीं ह्या आगळिकीबद्दल तटा माडण्याचें सोडून बादशहातीपासून त्याला फोडून आपल्या बाजूला वळवून घेण्यासाठीं त्याची अहमदाबाद एथें शाहीबागेत भेट घेतली, व 'तुम्ही आम्ही हिंदु एक, बादशहा आपणां सर्वांना परकाच राज्यविस्तार तुमचा झाला तरी तो हिंदु राज्याचाच झाला त्यात आम्हांलाही आनद आहे पण निजाम, बंगष हे मुसलमान सुभेदार आपणा हिंदूच्या विरुद्ध असून आपला पाडाव करण्यासाठींच त्यांनीं सेनापति दाभाडयाना हाताशी धरिलें आहे यास्तव सेनापतींची बडाळी यावेळीं मोडलीच पाहिजे' अशी अभयसिंगाची समजूत करून त्याला आपल्या बाजूला वळवून घेतले केवळ हिंदु-पद-पादशाहीच्या अभिमानानें अभयसिंग बाजिरावाना वळला असें नाहीं, या वेळीं बाजिरावाना आपण मदत न केल्यास ते आपल्यावरच उलटावयाचे, किंवा सेनापतींची सरशी झाल्यास निजाम, बंगष वगैरे सारे मुसलमान सुभेदार आपल्या छातीवर नाचू लागावयाचे त्याप्रमाणेच पिलाजी गायकवाड बडोद्यात बदोबस्त करून राहिला होता, तोही अभयसिंगाचा अगदीं निकटचा शत्रु होता, तोही ऐनवेळीं उलटावयाचा, त्यापेक्षा पेशव्यांना साह्य करून त्याची सहानुभूति सपादन करणेंच श्रेयस्कर होय असा पोक्त विचार अभयसिंगानें करून बाजिरावाना साह्य केलें पिलाजी गायकवाड हा सेनापति दाभाडयांचा

* गोविंदभाईकृत 'गुजराथनो इतिहास' या ग्रंथांत व इतर साऱ्या प्रमाणभूत इतिहासग्रथांत बाजीराव पेशवे व अभयसिंग याच्या शाहीबागेंतील उपरोक्त भेटीचा वृत्तान्त दिलेला आहे

उजवा हात, व असामीही भारी हा सेनापतींचा उजवा हात प्रथम तोडला पाहिजे असा बाजिरावांचाही मानस होताच त्यामुळें पिलाजीला बडोद्यातून हुसकून लावण्याच्या मुद्दयावर दोघांचेही एकमत झालें. अभयसिंगाला पिलाजीला बडोद्यां-तून काढून लावण्याच्या कामीं बाजिरावानीं मदत करावी व त्या मोबदला अभय सिंगानें बाजिरावाना गुजराथेतील चौथाईचा करार पुरा करून द्यावा अशी योजना उभयपक्षीं ठरून अभयसिंगाची फौज बाजिरावाच्या फौजेबरोबरच बडोद्याच्या रोखानें रवाना झाली *

बाजिरावाचे डावपेच याप्रमाणे चालले होते, तेव्हांच निजाम व बंगष यांचीं दाभाड्याबरोबरचीं खलबतेंही अगदी ऐन रंगात आली होती त्या दोघांची नर्मदे वरील अकबरपूरच्या उतारावर भेट होऊन खलबतें सुरू झाली त्या दरम्यान् नारायणजी व आवजी यानीं परस्पर निजामाला भेटून त्याच्याशी वाटाघाट करून राजकारण ठरविलें त्या राजकारणाची पुढे काय वासलात लागली हे आपण मागील प्रकरणीं पाहिलेच आहे ह्या वाटाघाटी चालल्याची बातमी बाजिरावाना वारवार मिळत होतीच त्यामुळें त्यानी त्या लोकांना तिकडे वाटाघाटी करीत ठेवून इकडे आपल्या योजना तांतडीनें अंमलात आणण्याचा सपाटा चालविला होता त्यानीं अभयसिंगाशीं तडजोड सुरू करतानाच चिमाजीअप्पांना दुर्जय-सिंगाच्या मदतीला पाठविलें होतें तिकडे अप्पानीं दुर्जयसिंगाला साह्य करून आपल्या बाजूला वळवून घेतले होतेंच व ते दोघे मिळून नुक्तेच बाजिरावाना येऊन मिळाले होते इतके सारे खटाटोप करूनही बाजिरावापाशी सैन्याची पुरी भरती काहीं होईना दाभाडयाचें सैन्य एकदरींत चाळीस हजारांच्या सुमारानें होतें व बाजिरावाचें सैन्य अभयसिंग आणि दुर्जयसिंग याची मदत धरून पचवीस हजारावर जात नव्हतें तरीही बाजिरावानीं नाउमेद न होता प्राप्त प्रसंगाशीं तोंड द्यावयाचे ठरवून ते उद्योग करीत होतेच. जेथे शक्तीने काम होत नाहीं तेथें युक्तीने काम करण्यात बाजिरावाचा हातखंडा होता दाभाडयाशीं एकदम समोरा-समोर सामना देऊन आपला टिकाव लागावयाचा नाहीं हें ओळखून त्यानीं दाभाडयाच्या पक्षाची पांगापाग कशी करतां येईल याचाच विचार प्रथम केला, व प्रथम पिलाजी गायकवाडाला पायबंद लावण्यासाठीं बडोद्याच्या रोखानें चाल केली.

* अभयसिंग व बाजीराव यांची संयुक्त फौज सावळीपर्यंत ता २५।३।३१ च्या सुमारास आली होती.

मजल दरमजल करीत पुढे जाता जाता बाजिरावांच्या सैन्याचा मुक्काम बडोद्याच्या अलीकडे बऱ्याच अतरावर भिलापूर-डभईच्या मैदानावर पडला तोंच चिमाजी-अप्पा व दुर्जयसिग याच्याकडील बातमीदारांनीं बाजिरावाकडे येऊन दाभाडे आपल्या अफाट सैन्यासह चाल करून येत असल्याची खबर त्यांना दिली. त्याबरोबर बाजिरावानी सेनापतींच्या फौजेची सर्वत्र पागापांग करण्याचा विचार सोडून डभईच्या मदानावरच सेनापतीशी सामना देण्याची तयारी चालविली त्यासाठीं त्याना आपली चोहीकडे पागलेली फौज एकत्र करणे अत्यत अवश्य झाले ही सामन्याची तयारी सुरू असताच त्याना भडोचकडे जो रक्तपात झाला त्याची बातमी समजली, पण ती अर्धवट समजली पेशव्यांना सेनापतींनीं ठार केलें अशी ती बातमी होती. ती ऐकून बाजिरावाना अचंबा वाटला की याचा अर्थ काय ?

अशा चिंतेत बाजीराव असताच वाचकाच्या व बाजिरावांच्या पूर्वपरिचयाचा व चिमाजीअप्पांच्या रोषाला पात्र झालेला कोदड अकस्मात् एकेदिवशी तेथे येऊन हजर झाला व बाजिरावाना आदरपूर्वक त्रिवार मुजरा करून म्हणाला, " सरकार! मी आपल्या परिचयाच्या गोवर्धनाकडून आपणाला पत्र घेऊन आलो आहें "

गोवर्धनाचे नाव ऐकतांच बाजिरावाच्या चर्येवर एकदम तिरस्काराच्या रेषा उमटल्या त्यानी रागानें विचारले, " गोवर्धन कुठें आहे ? "

" ते मारें त्या पत्रात लिहिलेलें आहे " कोदड उत्तरला

" आणि मस्तानी कुठे आहे ? " बाजिरावानीं पुन्हा प्रश्न केला.

कोदडाने पुन्हा पूर्वीचेच उत्तर दिले.

" तू त्या दगलबाज जोडग्याचा साथीदार आहेस ! " बाजीराव कठोर वाणीनें म्हणाले.

तरीही कोदडाचें उत्तर पूर्वीचे तेच ! इतक्यांत चिमाजीअप्पा व दुर्जयसिंग तेथें आले. कोदडाला पहाताच चिमाजीअप्पा म्हणाले, " हा बदमाष इकडे कुठें ? " सभोवारच्या सेवकाना उद्देशून त्यानी आज्ञा केली, " याला आताच्या आतां कैद करा."

कोदड निर्भयपणें म्हणाला, " धाकटे सरकार ! मी आपला चाकर व आपण माझे धनी आहां पण धन्याचा धनी कोण आहे ! आपणाला माझ्याविषयीं जो सशय आला आहे तो सकारण आहे. पण ज्या कारणामुळें आपणाला संशय

आला ती कारणेंच खोटीं आहेत अशी आपली खात्री झाल्यावर तरी आपण मला दोषमुक्त कराल ना ? "

" बस ! मला कारणेंबिरणें काहींही नकोत मला एका गोष्टीचा जबाब दे तू गोवर्धनाचा तपास लावलास काय ? " चिमाजीअप्पानीं विचारलें.

" त्याच्याकडूनच पत्र घेऊन मी आलों आहें " कोदंड उत्तरला त्यानें कमरपट्ट्यांतून पत्र काढून चिमाजीअप्पाच्या हाती दिलें पत्र बाजिरावांच्या नांवचें होतें तें त्यांच्या समतीनें अप्पानीं उघडून वाचले, तों त्यात पुढील आशयाचा मजकूर होता

" सेनापति दाभाडे आपणावर चालून येत आहेत त्यान्या सैन्यात फितूर 'करून त्यांचा पक्ष दुबळा करण्याची कामगिरी आम्ही करीत आहों आपले 'नारायणजी, आवजी, कृष्णराव व बळिराम हे निजामाचे बडेखान 'व तुरुकताजखान हे सरदार, बंगषाचा गैरखान सरदार व सेनापति 'याच्या हातून ठार मारले गेले पण याच्या उलट ते तिघे सरदारही ठार 'झाले मस्तानीचा अभिलाष त्या सरदाराच्या नाशाला कारण झाला. 'बळवतराव मोघे, शिवाजीराव मोघे व सेनापतीचा मामा मानसिगराव 'टोंके यानीं आपल्या पक्षाचा अंगिकार केला आहे आपली मस्तानी मज 'पाशीं सुरक्षित आहे तिच्या व माझ्या वर्तनाविषयीं आपणाला जो संशय 'आला आहे, तो मी योग्य वेळीं प्रत्यक्ष दूर करीन मात्र आपण राजे 'दुर्जयसिंग यांची पाठ राखण्यात कसूर करू नये, एवढी आपणाला विनंति 'आहे दुर्जयसिंगजी आपणाला भेटल्यास त्याना सागावे कीं 'तुमची राणी 'देखील तुमचें चोहोंकडे फाकलेलें सैन्य एकत्र करून तुमच्या साह्याला 'येत आहे तुमच्या जीवितावर व वैभवावर तुमच्या राणीचेंच जीवित, 'वैभव व सौभाग्य अवलंबून आहे असेंच केवळ नसून माझेंही भवितव्य 'केवळ त्या एका गोष्टीवर अवलंबून आहे' दुर्जयसिंगजींना हा निरोप 'कळवावा निजाम व बंगष यांचा एकत्र होऊन आपणावर चालून येण्याचा 'विचार आहे खरा, पण आम्ही त्यांचा विचार अचूक हाणून पाडतों. 'मात्र आपण सर्वांनीं मिळून नेटानें व तातडीने सेनापतीशीं सामना देऊन 'ह्या मोहिमेचा सोक्षमोक्ष करून घ्यावा "

" **गोवर्धन** "

" हा गोवर्धन कोण ? " दुर्जयसिंगानें बाजिरावाकडे वळून प्रश्न केला

" म्हणजे ? हा तुमचा जासूद ना " बाजिरावानी विचारलें.

चिमाजीआप्पा व दुर्जयसिंग यांचे या बाबतींत पूर्वींच बोलणें झाले होतें. त्यावरून गोवर्धन हा दुर्जयसिंगाचा जासूद नव्हे एवढे दुर्जयसिंगाच्याच तोंडून चिमाजीआप्पांना कळून चुकलें होतें, व त्यामुळें चिमाजीआप्पाना मस्तानी व गोवर्धन याच्या वर्तनाविषयीं जास्तच सशय वाटू लागला होता पण बाजिरावानीं यापूर्वींच मस्तानीवर दुर्वर्तनाचा आरोप करून तिचा त्याग केला असल्यानें त्यांना जास्त मनस्ताप होऊ नये म्हणून त्यानीं तो प्रकार ह्या वेळपर्यंत मुद्दाम गुप्त ठेवला होता, तो आता उघड करणें त्याना प्राप्त झाले

" हा दुर्जयसिंग कोण ? " बाजिरावानीं कोदडाला प्रश्न केला.

" सरकार ! मला क्षमा करा, पण हा खरा प्रकार मला इतक्यात आपणाला निवेदन करता येत नाहीं मस्तानी बाईसाहेब व दुर्जयसिंगजी योग्य वेळीं आपणाला भेटतील, तेव्हा ह्या गोष्टीचा आपोआप उलगडा होईल "

" आपल्या पाठच्या बहिणीच्या पापावर पांघरूण घालणारा असा नेभळट भाऊ हा आजच मी पहिल्यानें जगात पहातो आहे " बाजीराव म्हणाले " तूही मस्तानी व गोवर्धन यांच्या कटाचा साथीदार असला पाहिजेस " लगेच त्यांनीं अप्पांना आज्ञा केली, " अप्पा ! याला आताच्या आता कैद करा "

" कोदड ! तू खरा प्रकार सांगशील तर सुटशील " चिमाजीअप्पा म्हणाले

" धाकटे सरकार ! " कोदड हात जोडून म्हणाला, " अब्रू, कुलाभिमान आपणासारख्या रावाना असतो व आमच्यासारख्या गरिबाना नसतो असें नाहीं मला आपणाला एवढेच सागता येईल कीं, माझी बहीण जर खरोखरच अपराधी असती, तर ती रावाची राणी असताही मी तिला वैरीण मानून शासन करावयाला कमी केले नसतें. पण ज्याअर्थीं मीही तिचा कैवार घेतो आहें, त्याअर्थीं ती निरपराधी असली पाहिजे, असें आपण समजावयाला पाहिजे होतें यापेक्षां जास्त मला तूर्त कांहींच सांगतां येत नाहीं मला आपण कैद करणार तर खुशाल करा. पण माझी मनोदेवता मला स्पष्टपणे सागत आहे कीं, योग्य वेळीं ह्या रहस्याचा उलगडा आपणासमोर होईल, तेव्हां ज्या कोदडाची आपणाला आज निर्भर्त्सना करावीशी वाटते, त्याच कोदंडाचें गुणगौरव गाण्यात आपणाला धन्यता वाटेल."

कोदंड ज्याअर्थीं इतक्या निग्रहानें मस्तानी व गोवर्धन यांची बाजू सांभाळून

बोलत आहे, त्याअर्थी हे काहीं तरी गूढ रहस्य असले पाहिजे अशी बाजीरावाची ठाम समजूत झाली व कोदंडाविषयींचा त्याचा राग तेवढाच कमी झाला. चिमाजीअप्पाच्या मनातील संशय मात्र अजून कायम होता त्याना वाटलें कीं, निजामाने आपणाला गाफील ठेवण्यासाठी ही एखादी युक्ति तर योजिली नसेल? कोदंड त्या युक्तीला बळी तर पडला नसेल? दुर्जयसिगाचा चिमाजीअप्पांच्या संशयाला पाठिंबा मिळाला त्याचा परिणाम एवढाच झाला की, बाजिरावांची इच्छा कोदंडाला मोकळा सोडण्याची असताही चिमाजीअप्पा व दुर्जयसिग याच्या आग्रहामुळे त्याना कोदंडाला कैदेंत लोटावें लागले सर्वानुमतें त्याला बजावून सागण्यांत आलें, "तू आणलेले पत्र जर खरें ठरले व गोवर्धन हा कोणी आमचा हितकर्ता आहे अशी जर आमची खात्री झाली, तर तुझ्या अटकळीप्रमाणें तुला बंधमुक्त करण्यात येईल व तुझा गौरवही केला जाईल, पण जर का याच्या विरुद्ध अनुभव आला, तर—"

कोदंडाने बेफिकीरपणे बाजिरावाच्या तोंडचें वाक्य आपल्या शब्दात पुरें केलें, "तर आपण मला तोफेच्या तोंडी द्या, माझा कडेलोट करा, किंवा तापलेल्या तेलाच्या कढईत मला लोटा. मग तर झालें?"

कोदंडाचा प्रश्न तेवढ्यावरच मिटला तात्पुरती कैदेची शिक्षा त्याच्या वाटणीला आली, व त्याप्रमाणे त्याची काही शिपायाहाती कैदखान्यात रवानगी करण्यात आली

त्यानतर गोवर्धनाच्या पत्रावरून ध्यानीं आलेल्या मजकुराबद्दल बाजीराव, चिमाजीअप्पा व दुर्जयसिग याच्यात बरीच भवति न भवति झाली नारायणजी, आवजी, कृष्णराव व बळिराम हे चौघेही वीर सेनापतींशीं तडजोड करण्याच्या वाटाघाटींत मारले गेल्याची वार्ता ऐकून सर्वांनाच विस्मय वाटला कीं, असें कसें झालें?

पण हा त्याचा विस्मय फार वेळ टिकला नाहीं गोविंदपत बुदेले पेशव्यांच्या वतीनें बऱ्याच दिवसापूर्वी सेनापतींकडची बातमी काढण्याच्या कामगिरीवर गेला होता, तो त्याच दिवशीं माघारा आला त्यानें तिकडची खित्तबातमी आणून पेशव्याना निवेदन केली त्यावरून खरा प्रकार सर्वांना समजला. त्यावरून आणखीही अनेक गोष्टींचा उलगडा झाला गोविंदरावानें कृष्णरावाला पेशव्यांच्या सेवेंत रुजू करून घेण्यासाठीं इतकी मेहनत घेतली, ती कृष्णरावाचा चेहरा थेट बाजि-

रावाच्या चेहऱ्यासारखा होता म्हणूनच, सेनापतींशीं तडजोड करावयाची तिचा त्याच्यावरच जास्त भर देण्यांत येत होता. व दसऱ्याच्या दिवशीं रात्रौ त्याला पेशव्याचा वेष देऊन सैन्यातून सर्वत्र हिंडवून आणण्यात आले, त्याचेंही कारण तेंच ह्या सर्व गोष्टींचा उलगडा बाजिरावाना आता होऊन त्या मंडळीच्या चातुर्याचें व कृष्णरावाच्या अपूर्व स्वार्थत्यागाचे परमकौतुक वाटलें पण त्या कौतुकापेक्षांही असे एकाहून एक स्वामिनिष्ठ मोहरे बळी पडल्यामुळे त्याच्या मनाला खेदच फार झाला

" एकूण देवकीला तेव्हा अशुभ शंका घेण्याची जी वासना झाली तीच परिणामीं फळाला आली ? आतां देवकी जर मजपाशीं आली, तर तिला मी कोणत्या तोंडाने हा वृत्तान्त सांगू ? " पेशवे म्हणाले

" सरकार ! देवकी आता आपणाला भेटणें शक्य नाहीं. ती इहलोक सोडून गेली मार्गातच ती मला भेटली व माझ्याबरोबर इकडे यावयाला निघाली होती पण ती फारच अशक्त झाली असल्यानें मार्गातच तिनें राम म्हटला " गोविंदपंत उद्गारला

" अरेरे ! बिचारी म्हातारी अखेर गेली ! पण झालें तेही एका अर्थी बरें झालें पुत्रनिधनाची वार्ता ऐकून तिच्या हृदयाला जबरदस्त धक्का बसला असता, तो प्रसंग तरी यामुळे टळला " बाजीराव म्हणाले

" नाहीं सरकार ! तिला पुत्रनिधनाची वार्ता कळली पण त्यामुळें तिला आपल्या अटकळीप्रमाणे शोक न होता उलट एका अर्थी समाधान वाटले आपल्या पुत्राचें जिणे सत्कार्यी खर्ची पडले, असें म्हणून तिनें त्यातच आनंद मानला याहूनही आणखी एक गोष्ट अचानकपणे तिच्या समाधानाला कारण झाली "

" ती कोणती ? "

" कोन्हेरराम व भास्करराम हे दोघे राहु केतु जसे आपल्या तसेच म्हातारीच्या कुटुंबाच्याही हात धुवून पाठीं लागले होते सेनापतींना चेतवून विकोपाच्या ह्या थराला आणण्यात कोन्हेररामच प्रमुख होता. इतकेंच काय, पण मस्तानीबाईसाहेबाना फसवून सेनापतींच्या घरात नेऊन घालण्यासाठींही त्याचे भगीरथ प्रयत्न चालले होते भास्करराम तर राधेच्या अब्रूवर तिलांजलि घेऊन उभा होता. त्यानेंच म्हातारीच्या मनात राधेविषयी अतिशय काळेंबेरें भरवून दिले होतें, पण अचानक रीतीनें त्या राहू केतूचीं कारस्थानें उघडकीला येऊन सेनापतींचाही त्याच्यावरचा

विश्वास उडाला व देवकीचीही राधेच्या पवित्रपणाविषयीं खात्री झाली अखेर देवकीनें राधेला आशीर्वाद देऊन समाधानाने देह ठेवला. राधेला श्वेतकुष्ठापासून मुक्त करणाऱ्या साधूनें ह्या कामीं पुढाकार घेतला, त्यामुळे हा सुयोग जुळून आला मात्र तिने सरकाराना एक अखेरची विनति केली आहे"

"ती कोणती ?"

"राधा गर्भवती आहे तिच्या उदरीं बालक येईल त्याच्या प्रतिपाळाचा भार म्हातारीनें विनतिपूर्वक सरकारावर सोंपविला आहे, व आपल्या वतीनें ती विनंति मी मान्य केली आहे"

"विनतीच काय, पण मला अशी आज्ञा करण्याचा देवकीला हक्क आहे. पण राधा कुठे आहे ?"

"तिचा पत्ता मिळाला नाहीं तिचा पत्ता आपण जरूर लावला पाहिजे. मला देवकीमार्फत एवढे मात्र कळलें की, राधा, बळवंतराव मोघे, शिवाजीराव मोघे, बळवंतरावाची बायको लक्ष्मीबाई, ही मंडळी तिला भेटून जी गेली ती पुन्हा माघारी आली नाहीं"

मोघे मंडळीही आपल्या वतीने सेनापतीविरुद्ध झगडत आहे हें कळताच पेशव्यांचा मोघ्यांवरचा राग बऱ्याच अशानें दूर झाला त्याना ज्या साधूचें पाठबळ आहे तो साधु कोण, हें जाणण्याची सर्वांनाच इच्छा झाली पण गोविंद-पताला अथवा अन्य कुणालाही त्याचा ठावठिकाणा माहीत नसल्यानें सर्वांचीच ती इच्छा अपुरी राहिली दुर्जयसिंगाला आपली राणी सैन्य जमवून आपल्या साह्या-ला येत आहे असें कोदंडानें आणलेल्या पत्रावरून कळले होते, व तिचा ठाव ठिकाणा जाणण्यासाठी तोही अत्यन्त उत्सुक झाला होता. पण कोदंडानें त्या बाबतींत कोणतीच माहिती देण्याचे साफ नाकारल्यामुळें तेथेही सर्वांचा नाइलाज झाला होता.

  

निरनिराळ्या बातमीदारानीं प्रतिपक्षाच्या हालचालींविषयीं ज्या बातम्या आण-ल्या होत्या, त्या खऱ्या ठरण्याला दिवसगत लागली नाहीं पेशव्यांच्या बातमी-दारांनीं शत्रुपक्षाच्या बित्तबातम्या आणल्या, त्याप्रमाणेच पेशव्याकडील बातम्या शत्रुपक्षाच्या गोटांत पोंचविणारे बित्तबातमीदारहि शत्रुपक्षाकडे होतेच पेशव्या-च्या तातडीच्या तयारीच्या बातम्या त्याच्यामार्फत शत्रुपक्षाला कळल्यामुळें शत्रु

पक्षानंही चढाई करण्याच्या कामीं शक्य तेवढी चपळाई केली एका बाजूनें सेनापति व दुसऱ्या बाजूने पिलाजी गायकवाड आपल्या प्रचड सैन्यासह पेशव्यांच्या सैन्यावर निकराने चालून आले व शिवाय आनदराव पवार, कुवरजी पवार, उदाजी पवार, आणि बळवतराव मोघे, चिमणाजी दामोदर मोघे, शिवाजीराव मोघे, मानसिगराव टोके वगैरे शूर सरदारही सेनापतींच्याच वतीनें चालून येत असल्याची बातमी पेशव्याच्या गोटात येऊन थडकली मोघे मडळी आपल्या बाजूनें आहेत, अशी आशा जी पेशव्याना गोवर्धनाच्या पत्रावरून उत्पन्न झाली होती, तिच्यावर ह्या नव्या बातमीनें विरजण पडलें, पण त्याविषयीं विचार करीत बसण्याला पेशवे व त्याचे साथीदार यांना अवसर कुठें होता !

  

तो घनघोर युद्धसग्राम कैक दिवस चालला होता, पहिले काहीं दिवस उभय पक्षातील अनुयायाच्या ठायीं ठायीं झटापटी होण्यात गेले. त्या झटापटीत एकेक म्हणता म्हणता सेनापतीच्या बाजूचे बरेच मोहरे बळी पडले. या झटापटींतील विशेष हा कीं, पेशव्याच्या बाजूने प्रत्यक्ष रणक्षेत्रावर लढणारे लढवय्ये असे बेताचेच असूनही त्याच्या वतीने सेनापतीच्या सैन्याशीं सामने एकसारखे सुरूच होते व त्या सामन्यात सेनापतीचे लोक पटापट मारले जाऊन त्यांच्या सैन्याची सारखी कत्तल होत असताना पेशव्याच्या सैन्याचे काही म्हणण्याजोगें नुकसान होत नव्हतें इतकेंही करून पेशव्याची परिणामीं सरशी होण्याचीं काहीं निश्चयात्मक चिन्हे दिसेनात. कारण त्यांची फौज मुळातच थोडी होती बळवतराव मोघे, चिमणाजी दामोदर मोघे, शिवाजीराव मोघे, मानसिंगराव टोके, वगैरे शूर वीरही सेनापतींच्या वतीनें चालून येत असल्याची बातमी पेशव्याच्या गोटात येऊन थडकली मोघे मडळी आपल्या बाजूनें कशी वळली याविषयीं बाजिरावाना जी शका होती, ती या नव्या बातमीनें आपोआपच दूर झाली त्या शंकेच्या उदरीं उत्पन्न झालेल्या त्याच्या आशेवर ह्या नव्या बातमीनें विरजण पाडलें. गोवर्धनाचें पत्र त्याना आले होते त्या पत्रात दुर्जयसिगाची राणीही स्वतः सैन्य जमवून चालून येत आहे असें लिहिण्यात आलें होतें. त्याविषयीं अगदीं अखेरच्या पूर्व दिवसापर्यंत कांहीं अदाज लागेना बरें, पेशवेच याप्रमाणे हवालदील होते असें नाहीं, तर सेनापतीच्या गोटातही अशीच हवालदिली सर्वत्र माजलेली बातमीदारांनीं आणलेल्या बातम्यावरून पेशव्याना कळून चुकली होती. सेना-

पतींचे मानवी प्रयत्नच या मोहिमेंत पदोपदीं ढासळत होते असें नाहीं, तर त्यांचें दैवही त्याना प्रतिकूलता दाखवीत होतें ही मोहीम हातीं घेतल्यापासूनच अपशकुनांनीं सेनापतींचा पाठपुरावा केला होता. आज काय, सेनापतींच्या डेऱ्याची कनात पेटली, उद्यां काय, सेनापतींच्या डेऱ्यावर तारा तुटून पडला, परवां काय, सेनापतींच्या सैन्यांत रक्ताचा पाऊस पडला, असे अपशकुनाचे प्रकार प्रत्यहीं सेनापतींच्या छावणींत होत व त्याचा बोभाट होण्याला फारसा अवकाश लागत नसे त्यातच पेशव्याच्या सैन्यानें जागोजागीं केलेल्या पराजयाची भर पडावी, व वारंवार निराशेचीं घनदाट अभ्रें सेनापतींच्या छावणींत दाटावीं

इतकें झालें तरी अजूनही बाजीराव पेशव्यांचें मन त्याना सागत होतें कीं, झाला एवढा उभयपक्षींचा संहार पुरे झाला, आतां तरी उभयतांची एकी झाल्यास बरी पण ही एकीची तडजोड करण्यासाठीं सेनापतींकडे जाण्याला आता बाजिरावाच्या पक्षातील कोणीही वजनदार माणूस राजी होईना खरें पाहूं जातां, आतां बाजिरावांच्या बाजूला वजनदार माणसें फारच कमी उरलीं होतीं नारायणजी व आवजी यांचा बळी सेनापतींनी प्रथमच घेतला होता. राहतां राहिले चिमाजीअप्पा व दुर्जयसिंग, त्या दोघानाही बाजिरावाचा हा विचार पसत पडेना, पण बाजिरावानीं जेव्हां 'तुम्हां दोघांपैकीं कोणी ही कामगिरी करणार नाहीं, तर मला जातीने ती करावी लागेल' असें निक्षून मागितलें, तेव्हा निरुपायास्तव ते दोघे स्वतःच्या इच्छेविरुद्ध केवळ बाजिरावाची इच्छा म्हणून त्या कामगिरीवर जावयाला तयार झाले

अखेर निर्वाणीचा दिवस उजाडला त्या दिवशीं त्या युद्धाचा सोक्षमोक्ष करण्याचा निर्धार बाजीराव पेशवे व सेनापति त्रिंबकराव दाभाडे ह्या दोघानींही केला होता या निर्धाराप्रमाणे त्या दिवशीं घनघोर सग्राम झाला. तेव्हा सेनापतीं-बरोबर सर्व साह्यकाऱ्याची मिळून चाळीस हजारावर फौज व हुजूरपागेचे पांच हजार स्वार होते. फौजेसुद्धां सूर्योदयीं डभईवर दाखल झाले त्याच्या फौजेंत फितूर झाला होता तो कसा व कितपत झाला होता हे सेनापतींना माहीत नव्हतें, पण फितूर फारच झाला होता एवढें मात्र खरें बाजीराव पेशव्याची फौज त्या मानानें बरीच कमी होती. पण तिला फितुरीचा रोग जडलेला नसल्यानें अखेर विजयश्री आपणालाच वरणार असा बाजीराव व त्याचे साह्यकारी चिमाजीअप्पा आणि दुर्जयसिंग यांना भरवसा वाटत होता, मात्र त्याना पूर्वी गोवर्धन नावाच्या

माणसाकडून पत्र आल्याप्रमाणे त्या पत्राचा अमल अजून झाला नव्हता, व तो होण्याची काहीं लक्षणेही दिसत नव्हतीं त्यासाठीं त्यानी कोदंडाला त्या दिवशीं सकाळींच आपणासमोर आणविलें व विचारले, " तू आणलेल्या पत्राप्रमाणें कांहीं व्यवस्था अजून झाली नाहीं ना ? आता तर तुला शासन करावयाला काहीं हरकत नाही ना ? "

" नाही तरी मला शासन करावयाला आपणाला या घटकेपर्यंत तरी कोणाची हरकत होती ? आपण सर्वसमर्थ आहा, आपण कराल ती पूर्वदिशा होणार आहे "

" मला ह्या गोड गोड गोष्टी ऐकावयाला नको आहेत तुला मी स्पष्ट विचारतों, आपली निर्दोषता तुला सिद्ध करता येण्याजोगी आहे का ? "

बाजिरावानी संतापून विचारलेल्या प्रश्नाला कोदंडाने शांतपणे उत्तर दिले " सरकार ! कोणत्याही गोष्टीत उतावळेपणा उपयोगाचा नाहीं आपण मला कैदेंत टाकले म्हणून मी भितों आहें किंवा खिन्न आहें असे नाहीं पण आपण मला मोकळा ठेवलें असते तर फार बरें झालें असतें आपण आपल्या मनाशीं असा विचार प्रथमपासून करावयाचा होता कीं, मस्तानी माझी बहीण आपली व माझी योगायोगानुसार गांठ पडल्या दिवसापासून मी आपणाशीं एकनिष्ठेनें वागत आलों, त्याचीं कारणे दोन. एक मस्तानी ही जशी आपली प्रियमता तशी माझी बहीण हे, व दुसरें दानतवान आणि पराक्रमी अशा धन्याचें मंगल व्हावें असें मलाच काय पण कोणाही सेवकाला वाटेल "

इतके साळसूदपणाचे बोल कोदंड बोलतो आहे, त्याअर्थी त्यांत अजूनही काहीं तथ्य असावें अशी बाजिरावाना पुन्हा अशा वाटू लागली, पण तो मन मोकळेपणाने त्याना सर्व गोष्टींचा खुलासा करून सांगेपर्यंत त्यांच्या मनाला चैन पडेना अखेर ज्या युक्तिवादानें कोदंडाने त्याची सहानुभूति संपादन करण्याचा प्रयत्न केला होता, तोच युक्तिवाद त्यानीं अवलंबिला ते म्हणाले, " कोदंड ! हा तुझा आपलेपणा शब्दातला कृतींत उतरेल तेव्हाच्या गोष्टी ना ? तूं जर इतका आपलेपणा मानतोस, तर तुला ते रहस्य काय असेल तें मजपाशीं उलगडून सांगण्याला काय प्रत्यवाय आहे ? "

" प्रत्यवाय आहे याला कारण असें कीं—" कोदंड अडखळून थोडा वेळ थाबून म्हणाला, " सरकार ! मस्तानीबाईसाहेबांची निर्दोषता आपण आपल्या मनाशीं पटवून घ्यावयाला तयार आहा का ? "

" धडधडीत दुराचारी स्त्रीला मी माझ्या प्रेमाचें निधान मानू ? "

" ही सरकाराची गैरसमजूत आहे आपला संशय येऊन जाऊन त्या गोवर्धना विषयींच आहे ना ? "

" अर्थात ! आणि तो गोवर्धन दुर्जयसिंगजींचा हेर नाहीं हेंही आता सिद्ध झाले आहे "

" तें सर्व खरें आहे."

" काय ? सर्व खरें आहे ? "

" होय. पण याउपरही मस्तानी निर्दोषी ठरली, तर सरकार तिचा अंगिकार करतील किंवा नाहीं ? "

" असलीं पापें साक्षीपुराव्यानी ज्याप्रमाणें सिद्ध होत नसतात, त्याचप्रमाणें साक्षीपुराव्याच्या अभावी तीं नव्हेशीही होत नसतात. यांचा निर्णय लावण्याचा मार्ग एकच, मस्तानीनें दिव्य करावे "

त्या दोघाचें हें संभाषण तेवढ्यातच अपुरें आटोपण्याचे कारण याच वेळीं बाजिरावांच्या युद्धक्षेत्रावरील गोविंदपंत बातमी घेऊन आला चिमाजीअप्पा व दुर्जयसिंग सेनापतींच्या हातीं कैद झाले व त्यामुळें सेनापतीला जास्त हुरूप येऊन आज ते 'सूर्यास्तापूर्वी पेशव्याचे शिर कापून माझ्या डेऱ्यावर फडकणाऱ्या निशाणाला टांगीन तरच दाभाड्याचें नाव सांगेन' अशी प्रतिज्ञा करून निकरानें चालून येत आहेत.

चिमाजीअप्पा व दुर्जयसिंग कैद झाल्याचे ऐकून बाजिरावाचा धीर प्रथम बराच खचला, पण पुन्हा त्यांनीं स्वतःच्या मनाशीं विचार केला कीं, ही वेळ धीर सोडण्याची नव्हे इतक्यांत ज्या साधूने भडोच एथे सेनापतीच्या विरुद्ध पेशव्याची बाजू घेतली होती, तो साधु तेथें अचानक आला येताना अप्पा व दुर्जयसिंग कैद झाल्याची वार्ता त्याच्या कानीं आलीच होती, व त्यामुळे बाजिरावाची सेना हवालदील झालेली त्याला स्पष्ट दिसत होती तो बाजिरावासमोर येऊन म्हणाला, " बाजीराया ! इतका निराश कां होतोस ? अप्पा व दुर्जयसिंग कैद झाले तुझे डावे-उजवे हात खची झाले म्हणून ? छे ! छे ! त्यात निराश होण्याजोगे काहीं नाहीं तुझे ते हात खची झालेले नाहींत, उलट ते बिनधोभाटपणे शत्रूच्या हातांत हात घालून शत्रूच्या मानेपावेतो जाऊन भिडले आहेत दिवा विझतांना मोठा होतो किंवा मृत्युपंथाला लागलेल्या माणसाचा श्वासोच्छ्वास

नेहमींपेक्षा जोरानें सुरू होतो, तशांतली सेनापतींची अवस्था आहे तू माझ्यावर विश्वास ठेव व परमेश्वराचें नांव घेऊन 'आजच्या मोहिमेत विजयी होईनच' अशा निग्रहानें रणागणात उडी घाल माझ्या शब्दांवर विश्वास ठेव, तू रणागणावर जाण्याचा अवकाश, कीं स्वयवरासाठीं रणक्षेत्रावर हातीं विजयमाला घेऊन उभी असलेली विजयश्री तुला वरण्यासाठीं उत्सुकतेने उभी असलेली तुला दिसून येईल"

तो साधु जरी यापूर्वी बाजिरावाच्या परिचयाचा नव्हता, तरी त्याच्या चर्येवर व दृष्टींत विलसणारें पावित्र्य व सामर्थ्यदर्शक तेज पाहून त्याच्याविषयीं बाजिरावाच्या मनांत आपोआप श्रद्धा उत्पन्न झाली त्या श्रद्धेला त्या साधूच्या आश्वासनाची आणखी जोड मिळाली, "बाजीराया ! वेळ दवडण्यात राम नाही परमेश्वर सुसंधि प्राप्त करून देतो, आपण त्या संधीचा फक्त उपयोग करून घ्यावयाचा असतो. मीं तुला आता सांगितलेंच कीं, तुझा बंधु व तुझा मित्र आज जरी कैद झालेले दिसले, तरी ऐन रणकंदनांत सूर्यचंद्राप्रमाणें तळपत तुझ्या शत्रूचे जाळून भस्म करीत असलेले व त्याना कैद करणारे शत्रुपक्षाचे लोक त्यांच्या प्रभेप्रमाणें चमकत असलेले तुला दिसतील आणि हा कोण ?" साधु कोदंडाकडे पाहून म्हणाला "कोदंड ! तू आणि कैदेंत ? हा देवदूत कैदेंत ?" साधूनें लगेच कोदंडाला बंधमुक्त करता करता म्हटलें, "दोन साखळ्याना सांधणारा हा दुवा असा तुटून अलग राहतां उपयोगी नाहीं. हा माझा सच्छिष्य माझ्याबरोबर पाहिजे" लगेच तो बाजिरावांकडे वळून म्हणाला, "बाजीराया ! मी येतों. माझ्या ह्या पिकल्या केंसांवर व साधुत्वावर तुझा विश्वास असेल, तर मीं सांगितल्याप्रमाणें कर आजच्या रणकंदनात तू लढण्याची शिकस्त कर, कीं विजयश्री तुझ्या बाजूला ठेवलेली आहे"

इतक्यात बाजिरावांच्या सैन्यातील रणशिंग वाजले जणु काय खुद्द बाजिरावानींच ती घोषणा केली असें समजून त्या साधूनें 'सर्वत्र विजयी भव' असा आशीर्वाद दिला कोदंडही त्या साधुमागोमाग जावयाला निघताना बाजिरावाना वंदन करून म्हणाला, "सरकार ! आज सूर्यास्तापर्यंत ह्या लढयाचा शेवट व्हावा व माझ्या प्रत्येक शब्दाची सत्यता आपल्या प्रत्ययाला यावी, अशी माझी परमेश्वरापाशीं प्रार्थना आहे. पण कर्तव्याची शिकस्त करणाऱ्या आपल्या पाठसांनाच परमेश्वर पावत असतो, हें जाणून मला माझ्या पुढील कामगिरीवर जाणें प्राप्त आहे." साधु उगवत्या सूर्याकडे पहात कोदंडाला म्हणाला, "चल. लौकर चल."

लगेच त्यानें बाजिरावांना म्हटलें, " बाजीराया ! हा उगवता सूर्यनारायण पहा ! या सूर्यनारायणाची शपथ वाहून आजच ह्या मोहिमेचा सोक्षमोक्ष करण्याचा निश्चय करून युद्धाला प्रवृत्त हो माझा तुला आशीर्वाद आहे कीं, सूर्यास्तापूर्वी तुझा शत्रु धारातीर्थी पतन पावेल मी आतां जातों बरोबर सूर्यास्तापूर्वी, बाळ अभिमन्यूचा अन्यायानें–निर्दयपणें वध करणाऱ्या जयद्रथाचा वध करून अर्जुनाला आपली प्रतिज्ञा पूर्ण करता यावी म्हणून श्रीकृष्णानें सूर्याआड धरलेलें आपले सुदर्शनचक्र मागें घेऊन 'हा सूर्य व हा जयद्रथ' समोरासमोर दाखवून दिला, त्याप्रमाणें सेनापतीच्या वधानें ह्या मोहिमेचें साफल्य करण्यासाठीं मी प्रगट होईन, तेव्हांच तुझी माझी भेट "

एवढें बोलून तो साधु कोदंडाला हाताशीं धरून तेथून विद्युद्वेगानें निघून गेला बाजिरावांना त्यावेळीं सर्वच गोष्टींचा अचंबा वाटला जणू काय त्या साधूने तेथें आल्यापासून तेथून जाईतों त्यांच्यावर मोहिनी घातली होती ! साधु जाऊन थोडा वेळ होतो न होतो तोंच सेनापति स्वतः हत्तीवर स्वार होऊन लढाईला निघाल्याची वार्ता येऊन थडकली, व बाजिरावांना प्राप्त परिस्थितीशीं तोंड देण्यासाठीं सर्व विचार बाजूला ठेवून लढाऊ पोशाक करून आपल्या सैन्यासह समरांगणाच्या अग्रभागीं चालून जावें लागले.

प्रकरण पंचविसावें

# सेनापति ठार झाले !

"सेनापतिसाहेब !"

"काय ?"

"घात झाला !"

"काय झाले ?"

"चिमाजीअप्पा व दुर्जयसिंग हे दोघेही आपले कैदी मोकळे झाले, व ते आता आपणावर चालून येत आहेत"

"ते कसे मोकळे झाले ?"

"कोण जाणे ! पण मला वाटतें, दुर्जयसिंगाची राणी डोंगराळ लोकाच्या सैन्याची एक भली मोठी तुकडी हातार्शी घेऊन पेशव्याच्या वतीने अचानक चालून आली व आपण सर्व इकडे रणक्षेत्रावर गुतून पडलो आहो असें पाहून तिनें आपल्या छावणीवर हल्ला करून त्या दोघाना सोडविले"

"अहारे नामर्द ! य:कश्चित् एका बायकोमाणसानें तुम्हाला धूळ चारावी ! गोवर्धन ! तुझ्यासारखा उमदा वीर ! तू कमरेला तरवार कसून ही बातमी सागावयाला रडतराउतासारखा एथवर आलास, त्यापेक्षा तू बागडया का भरल्या नाहींस ? तू बायकोच्या जन्माला का आला नाहींस ? म्हणजे तरी तुझें हें स्वरूपसुंदर जिणें काहीं उपयोगाचें ठरलें असतें."

"हो ! मलादेखील तसें वाटतें खरें, पण आता उपयोग काय ?"

वरील संभाषण त्या दिवशीं सायकाळीं प्रहर दिवसास रणक्षेत्रावर ऐन खणाखणी सुरू असता वाचकाच्या परिचयाचा असलेला गोवर्धन व सेनापति त्रिंबकराव दाभाडे याच्यात सुरू होतें ते संभाषण सुरू असताच सभोंवारून पेशव्याच्या सैन्यातून सेनापतीच्या सैन्यावर बाणाची पर्जन्यवृष्टि एकसारखी सुरू होती, सेनापति पहिल्या प्रतीचे तिरंदाज होते ते त्या शरवृष्टींत स्वत:चाच बचाव करीत होते असें नाहीं, तर अमुक शरसधान करून स्वत:चा माहूत व हत्ती याचें देखील संरक्षण त्यानीं चालविलें होतें पण गोवर्धनाशीं बोलण्यात त्याचें चित्त क्षणकाल व्यग्र होऊन शरसंधानाला अमळ खळ पडला, तेवढयात समोरून

त्यांच्यावर शरसधान करणाऱ्या बाजीराव पेशव्याचा एक तीर सू सूं करीत येऊन माहुताच्या वर्मी झोंबला व त्याचक्षणीं माहूत धरणीवर कोसळला. त्याचक्षणीं गोवर्धन ताठरपणानें उत्तरला "सेनापतिसाहेब ! आम्हीं पदरच्या माणसानीं आपणासाठीं प्राणाच्या आहुति देण्यालाही तयार व्हावें व आपण आमचा पदोपदीं असा पाणउतारा करावा, इतकें आमचें आपणाकडून अपमान सोसण्याचें काय अडले आहे ? हा पहा मी चाललों !"

पेशवे आणि सेनापति यांच्यातील त्या दिवशींच्या सग्रामाचें वर्णन द्यावयाच म्हटले तर व्यासवाल्मीकींनीं महाभारत-रामायणासारख्या चिरजीव ग्रथांतून कर्णार्जुन किंवा रामलक्ष्मण याचे परम प्रताप वर्णन केले आहेत, तसे वर्णन करावें लागेल कारण बाजीराव पेशवे काय किंवा सेनापति त्रिंबकराव दाभाडे काय, दोघेही तोडीला तोड वीर होते दोघेही इरेला पेटलेले होते, व दोघानीही आज 'मारीन किंवा मरेन' अशा निग्रहानें एकमेकाशीं झुजण्याचा निश्चय केला होता. पण आज सेनापतींना दैव अनुकूल नव्हतें किंवा दैवाला दोष देणे ज्यांना रुचणार नाही, त्यानीं सेनापति प्रयत्नात चुकले असे म्हणावे पाहिजे तर ! त्यानीं ज्या आपल्या पदरच्या मातबर लोकावर भरवसा ठेवून आजचा निर्वाणीचा युद्धप्रसग आरभिला होता, त्या मडळीनें आज ऐनवेळीं त्याचा अवसानघात केला. वास्तविक सेनापतींच्या मनातून योग्य अटीवर बाजीराव पेशव्याशीं तह करून हा लढा मिटवावयाचा होता आता, त्याच्या तहाच्या योजनेंत पेशव्याना अपमान-कारक अशा बऱ्याच अटी असल्यानें त्या पेशव्यानीं मान्य केल्या किंवा नाहीं हा प्रश्न निराळा, पण सेनापतींची तशी इच्छा नाहीं. इच्छा तरी होती यात सशय नाहीं. पण सेनापतींची तशी इच्छा तरी होती, यात सशय नाहीं. पण त्याची इच्छा त्यांच्या जवळच्या सहकाऱ्यांनीं तडीला जाऊ दिली नाहीं पिलाजी गायकवाड, उदाजी पवार, कंठाजी कदम बाडे वगैरे मडळींचा विचार असा कीं, पेशव्याना केव्हां तरी एकदा नामशेष केल्याशिवाय आपलें मराठ्यांचें बस्तान नीट बसावयाचे नाहीं ह्या एकाच गोष्टीला सेनापति वेळीं कबूल होणार नाहींत, म्हणून त्यानीं त्यांच्या मनात आणखी असें विष भिनवून दिलें होतें कीं, 'तुमची पत्नी गिरिजा-बाई यांना पेशव्यानीं फुसलावली होती, त्याचा सूड म्हणून तुम्हीं पेशव्यांच्या मस्तानीला आपल्या रगमहालांत ओढून आणलेंच पाहिजे, ह्या सुडाच्या कल्पनेला पाठिंबा द्यावयाला पुन्हा भास्करराम व कोन्हेरराम हे कोल्हटकरबधु कोडगे-

पणानें तेथें हजर होतेच ! आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, कोन्हेररामाला मिळालेल्या माहितीनुसार (ती माहिती खरी असल्यास) मस्तानीही सेनापतीवर फिदा झाली होती ! त्या मस्तानीच्या नादानें मस्तानीच्या मर्जीतील कित्येक नवख्या पुरुषाना सेनापतींनीं आपल्या सैन्यात मोठमोठ्या जबाबदारीच्या जागा बहाल केल्या होत्या चिमणाजी दामोदर मोघे सेनापतींचे एवढे पक्षपाती, पण ते देखील सेनापतींना वेळोवेळी सावधगिरीच्या सूचना देत होते की 'असें, करावें, असें करूं नये', पण मोहवश सेनापतींना चिमणाजीपंताचा तो उपदेश रुचला नाही, व चिमणाजीपंत अखेरपावेतों एकनिष्ठापूर्वक वागत असताही सेनापतींना त्याचा संशय येऊन त्यांनीं त्यांना अपमानास्पद रीतीने वागवून सरहद्दींच्या बंदोबस्ताच्या निमित्तानें दूर ठेवून दिले होतें. शिवाय मानसिंगराव टोके, बळवतराव मोघे, शिवाजीपंत मोघे ह्या तिघाचाही त्यांनीं पावलोंपावलीं इतका पाणउतारा करावा कीं, तेच म्हणून तें सारें सहन करून पुन्हा सेनापतींच्या पक्षाला चिकटून राहिले होते तेवढा एकच विचारी मनुष्य प्रसगीं हिताची सल्ला देणारा दूर होतांच इतरांचे फावले, व त्याचेच पर्यवसान ही मोहीम इतकी विकोपाला जाण्यांत झालें होतें ह्या हितकर्त्या लोकांत काहीं फितूर आहेत, ते आपल्या नाशावर टपलेले आहेत, ही गोष्ट—त्या मंडळींतीलच एक गोवर्धन हा तेथें येऊन चिमाजीअप्पा व दुर्जयसिंग हे दोघेही दुर्जयसिंगाच्या राणीच्या हातून मोकळे सुटल्याची वार्ता घेऊन आला, व त्याच्यावर जरा रागावताच तो तेवढेंच निमित्त साधून उलटला, हे पाहून त्रिंबकरावाला जाणवली इतकेंच काय, पण गोवर्धनानें सूचना करावयाला व बळवतराव आघाडीची फौज घेऊन माघारा जावयाला एक गांठ पडली बळवंतरावाच्या मागोमाग त्या पक्षाच्या घोडदळाच्या व पायदळाच्या इतर तुकड्याही पाणी पिण्याच्या निमित्तानें रणांगण सोडून जाऊ लागल्या, आणि बाजिरावांना शरवर्षाव करून, सेनापतींच्या माहुताचा बळी घ्यावयाला तेवढीच संधी साधतां आली, हें पाहून सेनापति हताशपणे स्वतःशीं म्हणाला, "अरेरे ! आकाश फाटले, आतां याला ठिगळ कसें लागणार !"

सेनापतींच्या वासनेप्रमाणे तेव्हां आकाश खरोखरच फाटले, व तें क्षणोक्षणीं जास्त जास्त फाटू लागलें. दोन बाजूनीं दुर्जयसिंग व चिमाजीअप्पा यांची ताज्या दमाची फौज, व दुसऱ्या बाजूनें दुर्जयसिंगाच्या राणीची फौज, व चौथ्या बाजूनें त्या साधूच्या नेतृत्वाखालीं ताज्यातवान्या सैन्याची एक मोठी तुकडी, असा

चोहोंबाजूनीं सेनापतींच्या सैन्याचा कोंडमारा झाला खरें पाहूं जाता कोंडमारा व्हावयाला सेनापतींचे सैन्य जाग्यावर तरी कुठें होतें ! पाणी पिण्याच्या मिषानें बहुतेक सैन्य जे रणांगणांतून बाहेर पडलें, तें माघारें आलेंच नाहीं सेनापतींच्या पूर्ण विश्वासातील व ज्याचा भाग्योदय (त्याच्या स्वतःच्या मतें) बाजिरावाचा पाडाव होण्यावर अवलंबून होता, ते पिलाजी गायकवाड, कंठाजी कदमबांडे, उदाजी पवार, वगैरे मूठभर लोक मात्र अखेरपावेतों सेनापतींच्या वतीनें लढत होते पण त्यांची देखील बहुतेक सैन्यें फितूर होऊन निघून गेल्यामुळें त्यांची अवस्था बहुताशीं एकाद्या शिलेदारासारखीच झाली होती त्या मूठभर लोकांना प्रतिपक्षानें चोहोंकडून घेरलें नसतें तरी देखील पेशव्याच्या फौजेनें त्यांचा धुव्वा उडविण्याला कमी केले नसतें त्यांत पेशव्यांना आणखी चोहोंकडून कुमक आली. मग काय ! सेनापतींच्या पक्षाचे खासेही पटापट धारातीर्थी पतन पावूं लागले व जे थोडेसे समयज्ञ ऊर्फ चुकारतट्टू अथवा भित्रे होते, ते रणांगणांतून पळून गेल्यानें वाचले त्यांतीलही कांहीं पळून जाता जाता मारले गेलेच कारण पाणी पिण्यासाठीं गेलेल्या सैन्यातील कांहीं सैनिक जाणून बुजून सेनापतींचा नक्षा उतरविण्यासाठींच मार्गांत ठायीं ठायीं दबा धरून बसले होते

सभोंवारून याप्रमाणे सैन्याचा गराडा पडला, ही बातमी हां हां म्हणता सर्वत्र वाऱ्यासारखी पसरली, ती ऐकून त्रिंबकराव दाभाडे सेनापति यांचे बंधू यशवंतराव दाभाडे व बाबूराव दाभाडे दूर अंतरावर गावाच्या वेशीबाहेर पेशव्यांना येणाऱ्या कुमकेची पिछेहाट करण्यासाठीं सैन्यासह खडे होते, ते पेशव्याच्या सैन्यावर चालून आले ती ताज्या दमाची कुमक आलेली पहाताच भीतीनें व निराशेनें पळत सुटलेल्या सेनापतींच्या सैन्याला धीर आला तें सैन्य पुन्हा दाभाडे बंधूसभोंवार जमा होऊन पेशव्याच्या सैन्याशीं निकरानें लढूं लागलें आतां मात्र प्रसंग आणीबाणी-चा आला पेशव्याचा मोड होतो की काय, या भयानें पेशव्याच्या सैन्यानें पेशवे व सेनापति यांच्या सभोंवार आपल्या छातीचा कोट उभा करून बाहेरच्या सैन्याला बाहेर थोपवून धरलें, त्यावेळीं मानसिंगराव टोके सेनापतींजवळ होते, त्यांनीही बाहेरून येणाऱ्या सैन्याची लाट बाहेरच थोपवून धरण्याची शिकस्त केली सेनापतीं-ना वाटलें,आपला मामा सारा मतभेद विसरून यावेळीं आपल्यासाठीं शत्रूच्या तरवारीं-चे व बाणांचे घाव छातीवर झेलीत उभा आहे ! सेनापतींनीं मानसिंगरावाच्या ह्या स्वामिनिष्ठेबद्दल भर रणकंदनांत त्याच्याविषयीं धन्योद्गार काढले, ते ऐकून मान-

सिंगरावांनीं स्मितहास्य केले तेव्हांच मानसिंगरावांच्या पाठीशीं असलेल्या दोघा मिसरूडही न फुटलेल्या तरुण, सुंदर व उमद्या सैनिकांनींही गालांतल्या गालांत हंसून तो प्रसंग साजरा केला. मात्र कोणा त्रयस्थाने किंवा खुद्द त्रिंबकरावांनींही त्या दोघा तरुणाच्या हंसतमुखाकडे तेव्हा चिकित्सक दृष्टीनें लक्ष्यपूर्वक पाहिलें असतें, तर त्याना तें हंसे फारच विपरीत भासले असतें

हा हां म्हणता सेनापतींच्या सभोंवार असलेल्या मूठभर सैन्याचा बाजीराव पेशव्यानीं एकसारखी बाणाची वृष्टि करून धुव्वा उडविला, व आपला हत्ती रेंटीत रेंटीत सेनापतींच्या हत्तीशीं आणून भिडविला. सेनापतींनीं आपला माहुत बळी पडला असे पाहून स्वत च त्याची जागा स्वीकारली, व तेथून तिरंदाजी सुरू केली बाजिरावांच्या हातचे कैक तीक्ष्ण बाण सेनापतींच्या हत्तीच्या सर्वांगात घुसले, त्यामुळें तो हत्ती घाबरून सैरावैरा पळूं लागला सेनापतींनीं त्याच्या पायाना अदु (लोखडी) सांखळदंड बांधून त्याला जागच्याजागी डाम्बून ठेविले, पर्जन्यवृष्टीप्रमाणे शरवृष्टि करून बाजिरावांचा हत्तीही घायाळ करून सोडला. तो लढण्याला निरुपयोगी झाला असे पहातांच बाजीराव हत्तीवरून उतरून एका एका उमद्या घोड्यावर स्वार होऊन सेनापतींशीं झगडू लागले दोघांचीही झुंज इतक्या निकराने जुपली कीं, ज्याच्या त्याच्या तोंडून 'महाभारतकालीं कर्णार्जुनांचें समर झाले, त्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही समराशीं तुलना करतां यावयाची नाहीं' असे विस्मयोद्गार निघू लागले. लढाई एकंदरींत ह्या थराला येऊन पोंचली, तेव्हां मानसिंगराव टोके हलकेच पुढे होऊन सेनापतींना हाक मारून म्हणाले, " त्रिंबकराव ! आपली सारी फौज फितूर होऊन पाणी पिण्याच्या मिषाने निघून गेली आतां आपणाला पेशव्यानः शरण जाऊन त्यांच्याशीं तह करण्याशिवाय गत्यंतर नाहीं "

" तुम्ही पेशव्यांचे वकील आहां वाटतें ? " सेनापतींनीं सतप्त मुद्रेनें मानसिंगरावांकडे पहात विचारले

" मी सत्पक्षाचा वकील आहे. सेनापति व पेशवे या दोघापेक्षांही मला मराठशाहीच्या परमपूज्य सिंहासनाची जास्त आस्था आहे, व त्या सिंहासनाची इभ्रत राखण्यासाठीं पेशवे जिवापाड झटत आहेत, म्हणून त्यांचा पक्ष हाच सत्पक्ष आहे असें मी म्हणतो." मानसिंगराव म्हणाले

" जो कोणी पेशव्याचा लेंकावळा असेल, तो पेशव्यांचा कैवार घेईल, व

त्यांच्याशीं सख्य करण्याचा उपदेश मला करील मी पेशव्यांपाशीं तोंड वेगाडून जगण्यासाठीं जन्माला आलेला नाहीं पेशवे व त्याचे कैवारी छत्रपति याना पायां-खालीं रगडून विजयी होण्यासाठीं जन्माला आलों आहें "

सेनापतीच्या तोंडून हे दर्पोद्गार निघतात न निघतात, तोंच पेशव्याच्या मागाहून कोणीतरी बदुकीची गोळी झाडली ती नेमकी सेनापतींच्या उजव्या मनगटावर येऊन आदळली आधींच सेनापतींच्या बोटाचीं तीर सोडसोडून सालडीं निघालीं होतीं व त्यातून भळभळा रक्त वहात होतें, त्यांच्या शरिरावर असख्य जखमा होऊन त्यांतून वहाणाऱ्या रक्तानें त्याच सर्वांग माखून निघालें होतें, तरीही त्यानीं शरसधान अव्याहत सुरू ठेविले होतें, पण आतां उजवा हातच निकामी झाला, तेथे त्याचा अगदी नाइलाज झाला त्यानी 'नशीब !' असे उद्गार काढून एक दीर्घ नि:श्वास सोडून हातातील धनुष्यबाण तसाच दूर फेंकून दिला, व अत्यत उष्मा होत होता म्हणून मस्तकींचा जिरेटोप डाव्या हाताने जरा काढून घेतला सेनापतींना होतां होईतो जखमीही करावयाचें नाही, त्याचा अपमान करावयाचा नाहीं, त्याना फक्त कैद करावयाचे, अशी बाजिरावाची आपल्या सैनिकाना सक्त ताकीद होती त्यानी जेव्हा आपल्या बाजूनें सेनापतींवर गोळी सुटलेली पाहिली तेव्हा रागावून गर्जून आपल्या सर्व सैनिकाना आज्ञा केली, "आपल्यापैकीं जो कोणी सेनापतींच्या केसाला तरी धक्का लावण्याला कारण होईल, त्याला देहान्त शासन करण्यात येईल"

बाजिरावांची ही आज्ञा त्याच्या बाजूच्या सैनिकांनीं ऐकली, त्याप्रमाणेंच सेनापतींनींही ऐकली लगेच सेनापति घामाने डबडबलेलें मस्तक पुशीत म्हणाले, "पेशवे ! तुम्ही माझ्याविषयीं असा मायावी ममताळूपणा दाखविला तरी त्यामुळें माझ्या अत:करणांत तुमच्याविषयीं जरादेखील करुणा उत्पन्न व्हावयाची नाहीं" लगेच त्यांनीं आपल्या सैनिकांना आज्ञा केली, "नेभळटासारखे पाहतां काय ? प्रथम ह्या पेशव्यांना व त्यांच्याबरोबर त्याच्या पक्षाचे आणखी जे जे खासे तुमच्या हातीं सांपडतील त्याना ह्या क्षणाला यमसदनाला पाठवा —"

इतक्यांत मानसिंगराव टोके उभे होते, त्यांच्या मागाहून एक गोळी सूं सूं करीत आली, ती सेनापतींच्या कानफटींतून आरपार निघून गेली, व सेनापति तत्काळ गतप्राण होऊन धरणीवर कोसळले ! अव्वलींचा मोहरा याप्रमाणे जाया झाल्यावर त्याची बाकीची फौज कितीसा टिकाव धरणार ! ती सैरावैरा प

लागली प्रथम बाजिरावांना वाटलें कीं, आपल्या बाजूच्या कोणा आततायी सैनिकानें गोळी मारली, म्हणून त्रिंबकरावाचा समाचार घेण्यासाठीं तत्काळ आपल्या घोड्यावरून खालीं उतरून त्रिंबकरावाच्या शवाकडे जाता जातां आपल्या सैनिकाना म्हणाले, "गोळी कोणी मारली, त्याचा तपास करून त्याला आताच्या आतां कैद करा."

त्रिंबकरावाच्या सैन्यातील दोघे तरुण प्रथमपासूनच लढाईतील जयापजयाविषयीं बेपर्वा असून त्याचा त्रिंबकरावावर एकसारखा डोळा होता. त्यातल्या एकानें अर्थात् गोवर्धनानेंच अप्पा व दुर्जयसिंग पळाल्याची वार्ता त्रिंबकरावाच्या कानावर घालून त्याना भाबावून सोडून त्याच्या माहुताचा बळी घेण्याला आपल्या दुसऱ्या साथीदाराला अवसर दिला होता ह्या गोष्टी बाजिरावाच्या बाजूच्या कैक सैनिकाना माहीत होत्या त्यांनीं त्या गर्दीत त्या दोघा सैनिकाकडे अंगुलिनिर्देश करून बाजिरावाना म्हटलें, "सरकार? तेच ते दोघे इसम! त्याना कैद करावयाचे?"

इतक्यात वाचकाच्या पूर्ण परिचयाचा झालेला साधु कोदंडासह पुढे आला व बाजिरावांना म्हणाला, "बाजीराया! मीं सकाळीं जी प्रतिज्ञा केली, तिचा हा प्रत्यय पहा!" साधु अनुक्रमे मावळत्या सूर्याकडे व त्रिंबकरावाच्या शवाकडे बोट दाखवून म्हणाला, "पहा! हा सूर्य आणि हा जयद्रथ!"

"हा सूर्य—' गोवर्धनाबरोबर नेहमीं असणाऱ्या व ज्याच्या हातातील बदुकीच्या गोळीला त्रिंबकरावाचा बळी पडला होता, तो तरुण इतका वेळ मानसिंगरावाच्या मागें उभा होता, तो विद्युद्वेगानें पुढें येऊन त्रिंबकरावाच्या मस्तकावर आवेशपूर्वक लत्ताप्रहार करीत म्हणाला, "आणि हा जयद्रथ!"

गोवर्धनानेही त्याच गोष्टीची पुनरावृत्ति केली त्या दोघा तरुणांची ती पिसाळलेली वृत्ति पाहून सभोंवारची सर्व मडळी क्षणभर स्तिमित झाली बाजिरावानीं सेनापतींना ठार करणाऱ्या माणसाना कैद करण्याचा हुकूम दिला असताना इतक्या धैर्यानें पुढें येणाऱ्या ह्या व्यक्ति असाव्या तरी कोण, याविषयीं सर्वांना अचंबा वाटला बाजिरावानीं आपल्या लोकाना पुन्हा आज्ञा केली, "ह्या दोघा बेजबाबदार तरुणानीं माझ्या आज्ञेचें उल्लघन केलें आहे—"

"सरकार! पण ते आपल्या पक्षाचे लोक आपले कैवारी आहेत" कोदंड मध्येंच म्हणाला




बाजीराव पेशवे व सेनापति दाभाडे यांचा घनघोर रणसंग्राम.

" ते कोणीही असले, प्रत्यक्ष माझ्या पाठचे भाऊ असले तरी ते अपराधी आहेत त्याना त्याच्या अपराधाबद्दल शासन झालेंच पाहिजे " बाजीराव म्हणाले

" तर मग मीही त्यांच्याबरोबर अपराधी आहें " साधु पुढें होऊन म्हणाला

" आणि मीही अपराधी आहे मला देखील कैद करा." मानसिंगराव टोके पुढें होऊन म्हणाला

इतक्यात आणखी एक व्यक्ति त्या गर्दीतून वाट काढीत पुढें बाजिरावासमोर येऊन म्हणाली, " माझाही ह्या अपराधात बराच मोठा वाटा आहे "

बाजिरावानीं त्या नव्या व्यक्तीला मात्र तेव्हाच ओळखलें ती पुरुषवेषधारी मस्तानी होती मस्तानीला पहातांच तर बाजीराव स्तंभितच झाले व विचारू लागले, " हा एकदर प्रकार आहे तरी काय ? "

" या प्रकरणाचा उलगडा असा उभ्या उभ्या लागावयाचा नाहीं सरकार शांतपणानें आपल्या शिबिरात गेले, म्हणजे तेथें ह्या प्रकरणाची चौकशी व्हावी, तोंवर आम्ही सारी मंडळी सरकाराची कैदी आहों सरकारानीं हे ध्यानीं ठेवावें कीं, ही कैदी मंडळी सत्याची कैवारी आहे पेशव्याच्या दुर्जनाचा नायनाट करण्याच्या कामीं ह्या मंडळीनें आपली शिकस्त करून पेशव्याना विजय मिळवून दिला आहे सरकारानी खरी बाजू ऐकली म्हणजे आम्हा सर्वांना सरकाराकडून ह्या अपराधाबद्दल क्षमाच काय पण ह्या महान् सत्कृत्याबद्दल शाबासकी मिळेल, अशी आमची खात्री आहे " गोवर्धन म्हणाला

हा गोवर्धन बोलतो आहे, असे पहातांच बाजिरावाना पुण्यापासूनचा सारा इतिहास त्या क्षणीं आठवला, पण आता त्याच्या मनातील गोवर्धनाविषयींचा राग बराच कमी झाला होता. गोवर्धन जर खरोखरच एवढा महान् अपराधी असता, तर तो अखेरपावेतो इतक्या उजळ माथ्याने वावरला नसता, असें त्याना वाटलें. तेवढ्यांत चिमाजीअप्पा, दुर्जयसिंग व दुर्जयसिंगाबरोबर आणखी एक सुंदर तरुण अशी मंडळी तेथें आली चिमाजीअप्पानीं बाजिरावाना खबर दिली, " विजयश्रीनें जरी आपणाला माळ घातली असली, तरी आपण अजून केवळ निःशत्रु झालों असें मात्र नाहीं यशवंतराव दाभाडे व बाबूराव दाभाडे हे दोघे वीर अजून आपल्या कसलेल्या सैन्यानिशीं रणक्षेत्राबाहेर आहेत ह्या अनर्थांची बातमी कळतांच ते चिडून आपल्यावर चालून येणार यात संशय नाहीं —"

" ते चालून आले तरी आता त्यांच्याशीं आपणाला लढावयाचें नाहीं. झाला

एवढा रक्तपात पुरे झाला. जी गोष्ट होऊं नये ती झाली. सेनापति मारले जावयाला नको होते; पण मारले गेले. त्याला इलाज नाहीं. पण हा वाद आतां इथेंच मिटला असें समजून आपणाला सेनापतींच्या पक्षाशीं सख्य करावयाचें आहे, हें आमच्या पैकीं कोणीही विसरतां उपयोगीं नाहीं." बाजीराव म्हणाले.

"गोष्ट खरी; पण ती पुढील योजना निश्चित ठरविण्यासाठीं तरी आपल्या सर्व मंडळीनें एकत्र बसून विचार करणें अवश्य आहे असें मला वाटतें."

चिमाजीअप्पांची ही सूचना सर्वांनाच मान्य झाली, हें सांगावयाला नकोच. लगेच बाजिरावांनीं आपल्या सर्व मंडळीला तशी आज्ञा केली, व रणांगणावर पडलेल्या सेनापतींच्या शवाला गौरवपूर्वक हत्तीवरून आपल्या छावणींत नेण्याची व्यवस्था करून व इतर जे उभयपक्षांतील वीर रणांगणावर घायाळ किंवा मृत होऊन पडले होते त्यांच्याविषयींही योग्य ती तजवीज करून आपल्या छावणीचा मार्ग धरला.

प्रकरण सत्विसावें

# उपसंहार

गोवर्धन, त्याचा तो साथीदार तरुण, दुर्जयसिंगाबरोबर आलेला तो नवा तरुण वगैरे मंडळी कोण असावी, हें कोडें जसें वाचकांना आहे, तसेंच ते बाजिरावांना व त्यांच्याबरोबरच्या इतर अनेक मंडळीलाही होतें बाजिरावाच्या पक्षाची सर्व मंडळी त्या रात्रीं त्यांच्या छावणीत जमा झाली, तेव्हा चिमणाजी दामोदर मोघे व त्याना कैद करून आणणारा आणखी एक तरुण याची भर पडली दुर्जयसिंगाबरोबर आलेली पुरुषवेषधारी व्यक्ति त्याची राणीच होती, हें सर्वांना कळण्याला वेळ लागला नाहीं त्या मंडळीच्या मागोमाग बळवंतराव मोघे व शिवाजीराव मोघे हे दोघेही शत्रु-पक्षाचा आणखी धुव्वा उडवून तेथें आले चिमणाजीपंताना पकडून आणणारा बाणेदार तरुण कोण हें अजून खुद्द चिमणाजीपंतानाही माहीत नव्हतें पण आता त्या गर्दीतून तो तरुण अचानकपणे पुढे झाला, व चिमणाजीपंताना नम्रतापूर्वक त्रिवार वंदन करून म्हणाला, "मामजी ! माझें कार्य आता संपलें आपण आपलें कर्तव्य चुकलां असे माझ्या अल्प मतीला वाटलें, त्याप्रमाणेच मदांध सेनापतीनें प्रत्यक्ष माझ्या वन्सच्या कपाळी वैधव्य आणलें, माझ्या अब्रूचे धिंडवडे काढण्याची पराकाष्ठा केली फार काय, पेशवे सरकारांच्या प्रियकरिणीवर—मस्तानीबाईसाहेबा-वरही त्याची पापी नजर होती, आणि केवळ पुरुषांच्या हातून आम्हा सर्वांच्या अब्रूचें संरक्षण झालेंच असतें असे नाहीं इतका हा प्रसंग आणीबाणीचा होता, म्हणून आम्हांला आमचें स्त्रीत्व बाजूला ठेवून समरांगणांत उडी घालणें प्राप्त झालें परमेश्वराच्या कृपेनें, आपणा सर्व वडील माणसाच्या पुण्याईनें व ( त्या तरुण व्यक्तीनें चिमणाजीपंतांना प्रथमच 'मामंजी' या नांवानें संबोधिलें, यावरून वाचकांना कळून चुकलेंच असेल की ती त्यांची सून अर्थात् राधेची वहिनी व बळवंतरावाची पत्नी लक्ष्मी होती. लक्ष्मी जवळच उभ्या असलेल्या साधूकडे अंगुलिनिर्देश करून म्हणाली.) "ह्या साधूजींच्या शुभाशीर्वादानें आमच्या प्रयत्नांना यश आलें"

"कोण, लक्ष्मी ! तूं का ती ?" चिमणाजीपंतांनीं विस्मयपूर्वक वर मान करून लक्ष्मीकडे पहात विचारलें.

"होय मीच ती, आपली लाडकी सून!" लक्ष्मी उत्तरली

"एकूण ह्या साधूजींचें कृपाछत्र तुम्हा आम्हा सर्वांच्याच मस्तकावर रुळत होतें म्हणावयाचे तर!" बाजीराव त्या साधूकडे पहात म्हणाले

"होय" गोवर्धनाबरोबरचा दुसरा तरुण आपला पुरुषवेष टाकून पुढें झाला. त्याबरोबर सर्व मोघे मडळीने ओळखले, ती राधा होती राधा बाजिरावांना नम्रतापूर्वक वदन करून म्हणाली, "पेशवे सरकार! सेनापतीचा मीं वध केला म्हणून आपण मला दोषी ठरविले खरें, पण माझ्या ललाटींचें कुंकू ज्या चाडाळानें पुसून मला राखेंत बसविले, त्याच्यावर मीं असा सूड घेतला, यात मीं तरी काय वावगें केलें? ह्या अत्याचाराचा सूड घेण्याची मीं जी प्रतिज्ञा केली होती, ती मीं शेवटाला नेली आता त्याबद्दल मला शासन करावेंसें आपणाला वाटलें, तर त्याला माझी ना नाहीं"

गोवर्धन ही व्यक्ति इतका वेळ अगदीं स्तब्ध होती, ती लगेच पुढे झाली, व पेशव्याना म्हणाली, "माझ्यावर व माझ्या निमित्तानें मस्तानीबाईसाहेबावर पेशवे-सरकाराचा अत्यत रोष आहे, व त्याबद्दल पेशवे सरकारानीं मस्तानीबाईसाहेबाच्या वाट्याला वनवास आणला आहे, ह्या गेरसमजाला प्रारभ प्रथम धाकट्या सरकारां-पासून झाला पण योग्य वेळीं एका चुटकीसरसा सर्वांचा गैरसमज दूर करण्याचें सामर्थ्य मला देवाने दिल्याबद्दल माझी व मस्तानीबाईसाहेबांचीही खात्री होती, म्हणूनच आम्ही आजवर स्वस्थ असलो मस्तानीबाईबाना मीच स्वस्थ बसविलें"

"पण तू कोण?" बाजिरावानीं विचारलें

"सारे काही आपणाला आता कळून येईल पण मी कोण, हें सांगण्यापूर्वी मला पेशवे सरकारापाशी एका वस्तूची याचना करायची आहे मीं हे सर्व खटाटोप माझ्या एका जिवाच्या जिवलगासाठीं केले."

"कोणासाठीं? दुर्जयसिंगजीसाठीं?" बाजिरावानीं पुन्हा प्रश्न केला

"होय त्याच्यासाठीच प्रेमाखातर मनुष्य काय काय साहस करू शकतो, याची थोरल्या सरकाराना अनुभवाची जाणीव नाहीं असें नाहीं तसें साहस मींही केले, असे सर्वांच्या निदर्शनाला आल्यावर माझ्यावर सर्वांकडून उल्लूपणाचा आरोप केला जाईल हें मी जाणून आहें. इतके असूनही मी पेशवे सरकारापाशीं एका थोर जीवाची–त्याच्या एका जिवलग स्नेह्याची–दुर्जयसिंगजींची याचना करीत आहें अजूनही माझ्याविषयीं मडळीचा संशय दूर होत नसेल तर—" त्या

गोवर्धन नामधारी व्यक्तीनें आपला वेष टाकतांच ती एक अत्यत रूपवती अशी तरुणी आहे हें सर्वांच्या निदर्शनास आले, व सर्वांनीं आश्चर्यानें तोंडांत बोटें घातलीं.

“ दुर्जयसिगजी ! तुम्ही ह्या स्त्रीला ओळखता का ? ही बंगषाची शहाजादी जुलेखा आहे ” मस्तानीनें पुढें होऊन विचारलें, “ आता तरी ओळख पटते का ? ”

‘जुलेखा’ हे नांव ऐकतांच दुर्जयसिंगाची चर्या पहाण्यासारखी झाली तिच्या वर तेव्हां आश्चर्य, कौतुक, उत्सुकता व सकोच अशा नाना भावनांच्या छटा एकसमयावच्छेदेंकरून उमटल्या व तो आपल्या राणीकडे पाहू लागला आणि राणी त्याच्याकडे पाहू लागली त्या पतिपत्नींच्या पहाण्यांत जो गूढार्थ भरलेला होता, तो इतरांच्या ध्यानीं येणे शक्य नव्हतें. बाजिरावानीं त्यांना आग्रहपूर्वक जुलेखेच्या ओळखीविषयीं विचारणा केली तरीही दुर्जयसिंग काहीं बोलेना शेवटी मस्तानीनें त्या रहस्याचा स्फोट करण्याचें ठरवून जुलेखेला विचारलें, “ जुलेखे ! आता मीं खरा प्रकार बोलून दाखविला, तर त्याला तुझी काहीं हरकत आहे का ? ”

“ माझी कांहीं हरकत नाहीं ” जुलेखा लाजून खालच्या मानेने उद्गारली

मस्तानी बाजिरावाकडे वळून म्हणाली, “ ही महमदखान बंगषाची शहाजादी माझी व हिची ओळख मी बंगषाच्या नजरकैदेंत जैतपूरच्या किल्ल्यात होतें तेव्हापासून ची आहे मध्यतरीं बगष व दुर्जयसिग यांच्यात लढा उत्पन्न झाला, तेव्हा बगषानें दुर्जयसिंगाला तू मला शरण येऊन मुसलमान व्हायला तरी तयार हो, किंवा मरणाला तरी तयार हो, असा निर्वाणीचा खलिता पाठविला, इतकेच काय पण त्याला मुसलमान होण्याचा मोह पाडण्याची कामगिरी त्यानें जुलेखेवर सोंपविली यापूर्वीच जुलेखा व दुर्जयसिंग यानीं एकमेकांना कोठें तरी पाहिले होते व दोघांनींही एकमेकावर मन बसलें होतें, पण बगष जुलेखेचा उपयोग आपणाला बाटविण्यासाठीं करीत आहे असें कळताच दुर्जयसिंगांनीं बंगषाचा धिक्कार केला, व त्याला मोह पाडण्यासाठीं आलेल्या जुलेखेला बहीण मानून गौरवपूर्वक परत पाठविले दुर्जयसिंगजींच्या मनाचा हा थोरपणा व बाणेदारपणा पाहून जुलेखेला त्याच्याविषयीं अधिकच आपलेपणा वाटू लागला, व तिने त्याचक्षणीं मनानें स्वतःला दुर्जयसिंगजींना अर्पण करून घेतलें ” मस्तानी दुर्जयसिंगाकडे वळून म्हणाली, “ दुर्जयसिंगजी ! ही जुलेखेची मनकवडी गोष्ट तुम्हाला माहीत नसेल, पण मीं सांगितला हा प्रकार खरा ना ! ”

दुर्जयसिंगानें यावर फक्त स्मितहास्य केलें. मस्तानी पुढें म्हणाली, “ तुम्ही बोलत कां नाहीं ? ” तिनें जुलेखेचा डावा हात आपल्या हातीं घेऊन त्या हातां-

तील आंगठी दुर्जयसिंगाला दाखवून विचारलें, " ही पहा–ही आंगठी तुम्हींच जुलेखेला स्वतःच्या निष्पाप भगिनीप्रेमाची खूण म्हणून नजर केली होती ना ? "

" होय ! पण ती भगिनीप्रेमाची खूण म्हणून मीं नजर केली होती." दुर्जयसिंग आपल्या राणीकडे पहात म्हणाला

मस्तानी व जुलेखा यांनीं दुर्जयसिंगाचा त्या राणीकडे पहाण्याचा अर्थ ओळखला राणीच्या मनांत जुलेखेविषयीं सवतीमत्सर उत्पन्न होईल याविषयींचें भय त्या पहाण्यात पूर्णपणे प्रतिबिंबित झालें होतें

जुलेखा इतका वेळ स्तब्ध होती ती आता स्पष्ट बोलली, " दुर्जयसिंगजी ! तें मला कबूल आहे, व मीही राणीसाहेबांच्या संसारात अर्धा वाटा मागण्यासाठीं धडपडत आहे अशांतला अर्थ नाहीं त्यांच्या संसारात मला स्थान मिळाले तर तें मला पाहिजेच आहे मग तें कितीही हलक्या प्रतीचें कां असेना ! आपली दासी म्हणून राणीसाहेबांनी मला वागविली तरी चालेल प्रेमासाठीं दास्य पत्करण्यात आनंद कोणाला वाटणार नाहीं ? मीं इतकी यातायात केली," जुलेखा मस्तानीकडे पहात म्हणाली, " ती दुर्जयसिंगजींवरच्या माझ्या निःसीम प्रेमामुळेंच ना ? दुर्जयसिंगजींच्या हातून स्वसंरक्षणाची काहीं तजवीज होणार नाहीं, हें ओळखून व त्यांनीं मला दिलेल्या स्वाक्षरीचा उपयोग करून मला जें काय करता आले, तें मीं केलें."

" जुलेखा म्हणते तें मात्र अक्षरशः खरे आहे " मस्तानी म्हणाली, " या स्वाक्षरीच्या जोरावरच तिने पेशव्यांना देण्यासाठीं दुर्जयसिंगजींच्या हातचें पत्र तयार करून त्यांना मित्रसाह्यासाठीं येण्याला भाग पाडलें त्या स्वाक्षरीच्या जोरावरच ती माझी संगत सोडून गेल्यावर—" मस्तानी बाजिरावांकडे वळून म्हणाली, " आपणाला माझा संशय येऊन आपण माझा त्याग केला, तेव्हां प्रत्यक्ष आपल्या जन्मदात्या पित्याशीं ती कारस्थान खेळली. 'मी धर्मांतर करावयाला तयार आहें, पण पेशव्यांच्या जाचातून मला सोडवा' अशा अर्थाचें दुर्जयसिंगजींच्या नांवाचें विनतिपत्र तयार करून हिनेंच आपल्या पित्याकडे–बंगषाकडे पाठविलें, व त्याच्याकडून सैन्यबळ आणून स्वतःच्या नेतृत्वाखालीं त्या बळाच्या जोरावर दुर्जयसिंगजी व भावजी याची शत्रूच्या गोटातून मुक्तता केली " ती दुर्जयसिंगाच्या राणीकडे वळून म्हणाली, " राणीसाहेब ! तुमचें सौभाग्य तुम्हाला परत मिळवून देणारी ही जुलेखा आहे तुम्हीं महत्प्रयासानें सैन्य जमवून सेतापतींच्या सैन्यावर चाल केली, तेव्हा

तुमच्या साह्याला स्वयस्फूर्तीनें धांवून आलेला गोवर्धन तो हाच होय. आता तुमच्या सौभाग्यावर न्यायानें तुमचा एकटीचा हक्क उरला नाहीं, ही जुलेखा त्यांत वांटेकरीण आहे."

"पण हा वाटा राणीसाहेबांच्या खुषीनें मला मिळाला तर मला हवा आहे, नाहींपेक्षा माझें काहीं म्हणणें नाहीं त्यांनीं मला ह्या प्रेमापायीं जोगीण बनायला लावले तरी त्यालाही माझी ना नाहीं कोणीकडूनही राणीसाहेब व दुर्जयसिंगजी हीं दोघें सुखात असलीं कीं, त्यातच मला सुख आहे राणीसाहेबानीं माझ्याविषयीं नसता गैरसमज करून घेऊ नये"

"माझा गैरसमज मुळीच व्हायचा नाहीं" राणी जुलेखेचा हात आपल्या हातीं घेऊन म्हणाली, "तुला मी माझी पाठची बहीण मानतें. हें आपलें नातें पाहिले आहे, हें आपण निरंतर ध्यानीं वागविले, म्हणजे सवती-सवती या नात्यानें भांडण्याची दुर्बुद्धि आपणाला आठवल्यास आपले बहिणींचे नातें पहिलें आहे याची आपणाला आठवण होऊन कलहाचें निर्बीज करता येईल"

"यापेक्षा मी तरी आणखी काय मागतें आहे!" जुलेखेनें राणीला आलिंगन देत म्हटलें, "माझी इतक्या दिवसाची तपश्चर्या आज फळाला आली परमेश्वर पावला."

"शहाजादीसाहेबाना आपल्या ह्या नूतन हिंदु पतीविषयीं प्रथमपासून इतका आपलेपणा वाटतो आहे कीं, त्याच्या सहवासात आपणाला हिंदु व्हायचें आहे. हें ओळखूनच त्या कैक दिवसांपासून अल्लाला सोडून परमेश्वराला भजून तपश्चर्या करीत आल्या आहेत" मस्तानी म्हणाली.

"माझी आई अस्सल रजपूत हिंदु होती ती दैवदुर्विलासामुळें बाटून मुसलमान झाली, तरी तिचें हिंदु मन कसें बाटणार? तिचीच मुलगी मी!" जुलेखा हसून म्हणाली.

कोदंड इतका वेळ अगदीं स्तब्ध होता, तो आता बोलता झाला, "थोरले सरकार! धाकटे सरकार! आता तरी मस्तानी व कोदंड याच्या निर्दोषतेची साक्ष आपणां उभयताच्याही मनाला पटली ना?"

यावर नकारार्थी उत्तर द्यावयाला बाजीराव व चिमाजीअप्पा याना तोंड कुठें होतें?

साधु इतका वेळ स्तब्ध होता, तो आता बोलता झाला, "आणि माझ्या वचनांची सत्यताही-बाजीराया! आता तरी तुझ्या मनाला पटली ना?"

साधूने लगेच ओघाओघानें भडोचला सेनापतींचे कट कसकसे चालले होते, त्या कटांतून बळवतराव मोघे, शिवाजीराव मोघे व मानसिंगराव टोके कसे फुटले, ते आपल्या आश्रयाला कसे आले, राधेची व आपली गांठ कशी पडली, लक्ष्मीवर सयाजी गायकवाडाचा डोळा होता हें पाहून तिला आपण रातोरात आपल्या देवालयाखालील भुयारांत आणून तिचें कसे रक्षण केलें, वगैरे सर्व गोष्टी सविस्तरपणें निवेदन केल्या त्या ऐकून बाजीराव व चिमाजीअप्पा यांची खात्री झाली कीं, सेनापतींच्या सैन्यात कावेबाजपणानें वेषांतरानें घुसून, फितूर माजवून, त्याला तोंडघशीं पाडण्यात शिवाजीराव व बळवतराव मोघे, लक्ष्मी, राधा, मानसिंगराव टोके, वगैरे सर्वांचे प्रयत्न सारख्याच उत्कटतेनें फळाला आले होते

"पण साधूजी! इतकी यातायात आपण कशासाठीं केली? आपणासारख्या सर्वसंगपरित्यागी साधूनें एवढे राजकारण लढवावें, याचे मला नवल वाटतें." बाजीराव म्हणाले

"ती नवल वाटण्यासारखी गोष्ट आहे खरी!" साधु गहिंवरलेल्या कंठानें म्हणाला, "ह्या गोष्टीचा परिस्फोट मी आजवर कधींच केला नव्हता, पण तुम्हां सर्वांच्या समाधानासाठीं आता मला तें रहस्य उकलून सांगावे लागत आहे" तो राधेला आपल्या पोटाशीं धरून म्हणाला, "ही राधा माझी मुलगी! हिच्या जन्माच्या वेळींच मी सर्वसंगपरित्याग करून तीर्थयात्रेला निघून गेलों, तो आजवर पुन्हा संसारात गेलों नाहीं पण योगायोगानुसार राधेचे लग्न झाल्यावर मीं ती कुष्ठरोगाने पीडित पाहिली, तेव्हां तिला उपचार करून त्याप्रीत्यर्थ माझी पुण्याई खर्चीं घालून तिला मींच रोगमुक्त केले त्यानतर पुन्हा कैक वर्षांनीं यदृच्छेनें तिची व माझी भडोच एथे गाठ पडली, तेव्हां ती संकटांत सांपडलेली पाहून तिच्या रक्षणासाठीं मला एवढे सारे खटाटोप करावे लागले सेनापतीनें—त्या चांडाळानें तिच्या कपाळींचे कुंकू पुसलें, तेव्हा मला चीड का नाहीं येणार? त्याच्या सत्यनाशाची प्रतिज्ञा माझ्या मुलीनें केली ती मीं माझीच प्रतिज्ञा मानली, व ती प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठीं मला एवढें कारस्थान करावें लागलें. मानसिंगराव टोक्यासारखा सेनापतीच्या नात्याचा वीर मीं सेनापतींविरुद्ध रणांगणावर लढविला, याचें कारण तो माझा सच्छिष्य होता; त्यानें गुरुभगिनीच्या अब्रूचे रक्षण करण्यासाठींच सेनापतींविरुद्ध शस्त्रग्रहण केलें"

"हें तर खरेंच," मानसिंगराव म्हणाला, "पण त्याला आणखी कारण असें

की, कुलीन स्त्रियाच्या अब्रूवर घाला घालण्यासाठीं व देशबुडवेपणाचें अघोर पातक जोडण्यासाठीं माझा भाचा मदांधाप्रमाणे उत्सुकतेने पुढे सरसावला, त्याला शासन करणे हें माझें कर्तव्यच होते तें कर्तव्य पार पाडून मी गुरुमाउलींची आज्ञा व माझे पवित्र कर्तव्य ह्या दोन्ही पवित्र गोष्टी एकाच वेळीं पाळल्या "

" आणि मी माझ्या ह्या साऱ्या मैत्रिणींसह रणांगणावर उतरले, याचे कारणही तेंच!" मस्तानी चिमाजीआपाकडे वळून म्हणाली " मी पुण्यात दसऱ्याच्या दिवशी आपणापाशी जे उद्गार काढले, ते खरे केले, व आपण धर्मपत्नीच्या कर्तव्याची जाणीव मला करून दिली तिचाही मीं यथायोग्य उपयोग केला आपण ह्या मोहिमेचा आढावा काढला, तर आपणाला असे दिसून येईल की, आपणा सारख्या रणधुरंधर राजकारणकुशलांच्या शौर्याचा व कल्पकतेचाच हा विजय झाला असता तरी त्या विजयांत आम्हां बायकांचही बराच मोठा वाटा आहे तुम्हा पुरुषाच्या पराक्रमाला आम्हा बायकांच्या कर्तव्यतत्परतेची व पराक्रमाची जोड मिळाली, म्हणूनच ही मोहीम यशस्वी झाली पेशव्याच्या दुर्जनांना जमीनदोस्त करण्याच्या कामी आम्हा अबलाचा एवढा उपयोग झाला, ही गोष्ट जगाला कळली नाहीं, तरी पेशव्यांना व त्याच्या वतीच्या इतर खाशाना ह्या विजयाबद्दल आमच्याशीं नेहमीच कृतज्ञ रहावें लागेल "

" गोष्ट अगदीं खरी! तुम्हीं अबलानीं हातभार लावला, म्हणूनच मला माझ्या पेशवाईतील ह्या सर्व दुर्जनाचा नायनाट करता आला या तुमच्या उप काराचा उतराई मी कसा होऊ?"

" आपण मला पूर्ववत् निर्मल अंतःकरणानें आपल्या पदरी आश्रय दिला कीं, माझ्यापुरता हा प्रश्न मिटला, मी आता स्वार्थानें माझ्यापुरतें बोलतें आहें" मस्तानी मार्मिकपणें उद्गारली

"आपण मला लाजविले तेवढें पुरे झालें मी माझी चूक कबूल करतों, मग तर झाले?" बाजीराव म्हणाले

" आणि वहिनी! मीं तुम्हाला गैरसमजानें आजवर छळले, याबद्दल तुमची आणि–" चिमाजीआपा कोदंडाकडे वळून म्हणाले, " कोदंड! तुझीही मनःपूर्वक माफी मागतों मग तर झालें?"

"माफी मागायला नको कांही!" मस्तानी स्मितहास्यपूर्वक म्हणाली, " माफी मागण्याचा अधिकार आम्हा बायकांचा आहे, तो आम्हीं कां गमवावा?"

चिमणाजीपंत मोघे इतका वेळ शरमेनें अगदी चूर होऊन गेले होते, ते म्हणाले, "ह्या मंडळींत खरा अपराधी, खरा निमकहराम असा एकटा मीच आहे! बाजीरावसाहेब, मी आपला सत्पक्ष सोडून असत्पक्षाचा अवलंब केला, याबद्दल मला मनापासून पश्चात्ताप होत आहे पण नुसत्या पश्चात्तापाने परिमार्जन न होण्याइतकी माझीं पापें अघोर आहेत मी आपणापाशीं क्षमेची याचना कोणत्या तोंडानें करूं?"

"चिमणाजीपंत! पश्चात्तापासारख्या पवित्रतम प्रायश्चित्तानें ज्याचें परिमार्जन होत नाहीं, अशीं पापेंच नाहींत. तुम्हीं प्रथमपासून आडमार्ग पत्करला नसता, तर त्यात मला आनंदच होता, पण झाल्या गेल्या गोष्टींबद्दल आता बोलून उपयोग काय? यापुढें तरी तुम्हीं आमच्याशी निष्ठेने वागावे अशी आमची तुम्हाला विनंति आहे तुमचे हे बंधु शिवाजीराव व चिरंजीव बळवंतराव यानीं जुनी परंपरा कायम ठेवून आम्हांला साह्य केले, हे त्यांचे उपकार आम्ही विसरणार नाही योग्य वेळी योग्य स्वरूपात ह्या उपकारांची फेड केली जाईल" बाजीराव म्हणाले

"माझ्या आयुष्यातील फारच थोडे दिवस आता शिल्लक राहिले आहेत मी कोणत्याही बाजूला असलो तरी यापुढे असून नसून सारखाच, कारण यापुढे मीं नोकरी व राजकारण यातून मन काढून काशीला जाऊन हरिहरि म्हणत बसावयाचे ठरविले आहे" चिमणाजीपंत म्हणाले

"हो! तसे केल्यानें तरी तुमच्या स्वामिद्रोहाच्या व देशद्रोहाच्या पातकाचे क्षालन होवो!" साधु म्हणाला हे साधूचे शब्द चिमणाजीपंताना झोंबण्यासारखे होते, व इतर सर्वांनाही ते झोंबले, पण त्याच्या त्या पवित्र वेशाकडे पाहून कोणीच कांहीं बोललें नाही लगेच तो साधु बाजिरावाकडे वळून म्हणाला

"बाजीराया! तू मोघ्यांच्या उपकाराची फेड करशील तेव्हा करशील, पण ह्या अनाथ अबलेचें—ह्या राधेचे—सर्वतोपरी संरक्षण करणें आता केवळ तुझ्यावर अवलंबून आहे तुझ्यासाठींच तिच्या संसाराची होळी झाली आहे घर दार-पति दीर सासू या सर्वांना ती तुझ्यासाठी पारखी झाली आहे"

"तिच्याविषयीं मी आजन्म कृतज्ञ राहीन. तिच्या पोटी परमेश्वराने पुत्र जन्माला घालावा, व त्याच्या कमरेला तरवार बांधून आपसे बेटा सवाई शोभण्याची संधी देऊन ह्या उपकाराची फूल ना फुलाची पाकळी फेड आमच्या हातून व्हावी" बाजीराव बळवंतरावाकडे वळून म्हणाले, "बळवंतराव! ही तुमची बहीण

तशीच आमचीही बहीण आहे असे आम्ही मानतो हिला तुमच्यासारख्या मातब्बर माहेरचा आसरा असल्यावर आम्हाला तिच्याविषयी चिंता करण्याचे कारण नाहीच!"

बाजिरावाची ही सूचना कोणालाही पटण्यासारखीच होती याप्रमाणे त्या सर्व मंडळीच्या भेटीगांठी होऊन आनदीआनद झाला चिमणाजीपंत मोघे तेथूनच काशीयात्रेला जावयाला निघाले. त्याना साधूची सगत मिळाली त्या दोघानाही पेशवे वगैरे मडळीनें आनदाने निरोप दिला शिवाजीपंत व बळवतराव मोघे त्या दिवसापासून पेशव्याचे आश्रित झाले. बाजीराव-मस्तानीची एकी पुन्हा कायमची झाली. व चिमाजीआप्पांनाही त्यात आनद वाटला कारण, मस्तानीने आज आपल्या वर्तनानें आपली पेशव्यासारख्या थोराची सहचारिणी होण्याची पात्रता त्याना पटवून दिली दुर्जयसिंग व त्याची राणी यांचें मीलन झाले त्यामुळें त्या दपत्याला अत्यंत आनंद झाला, व बाजीराव वगैरे मडळीही त्या आनदाची अश-भागी झाली, पण त्यात सर्वांहून जास्त आनद जुलेखेला झाला जुलेखेच्या दुर्जय-सिंगावरील प्रेमाला त्याच्या राणीचीच समति मिळाल्यामुळें त्याने पुन्हा जुलेखेच्या बाबतीत बहीणभावडांच्या नात्याचा उच्चारही केला नाहीं जुलेखेसारखी मूर्तिमत प्रेमदेवता आपण होऊन चरण चुरण्याला चालून आल्यावर ती कोणाला नकोशी होईल. या सर्वांचा जो आनद, तोच कोदडाचाही आनद होता, हें सागायला नकोच. त्याला मस्तानीच्या खासगी कारभाऱ्याची जागा त्या दिवसापासून मिळाली, व शिवाय बाजिरावानीं त्याला पचहजारी सरदार बनवून सोडले मात्र कोन्हेरराम व भास्करराम कोल्हटकर हे दोघे लढाईचा रग सेनापतीच्या विरुद्ध पालटलेला पाहताच जे कुठें काळें करून गेले, त्याचा कोणालाच पत्ता लागला नाहीं ते पुढें निजामाचे पक्षपाती झाले असे इतिहास सागतो त्यानीं पुढें पेशव्या-च्या विरुद्ध काय काय प्रताप गाजविले, हे आपणाला पुढें यथाकाली कळून येईलच. मानसिंगराव टोक्याचा पेशव्यानी यथोचित गौरव करून त्याची सुस्थिति करून दिली अवांतर गोष्टी सांगत बसण्याचें तादृश कारण नाहीच.

आपल्या प्रस्तुतच्या कथानकाचा शेवट वस्तुतः इथेंच झाला, असें म्हणायला हरकत नाहीं. याच अनुरोधानें ह्या मोहिमेचा आढावा घेऊन सागून ह्या कथेचा समारोप करावयाचा आहे तो आढावा असा कीं, ह्या मोहिमेंत सेनापति दाभाड्याचे बरेच लोक जाया झाले, तरी यशवंतराव दाभाडे व बाबूराव दाभाडे हे सेनापतींचे

दोघे बधू सेनापतीच्या मागे होते, त्यानीं सेनापतीच्या वधाबद्दल पेशव्यावर सूड उगविण्याचा कसून प्रयत्न केला, वस्तुतः पेशव्यानीं सेनापतींच्या बाबतींत कोणताच अन्याय केला नव्हता सेनापतींना ठार मारण्याचा तर त्याचा मुळींच उद्देश नव्हता. पण योगायोगानुसार गोष्ट होऊन गेली, त्याला कोणाचा इलाज! यशवतराव व बाबूराव याचा मात्र असा ग्रह झाला कीं, पेशव्यांनीं सेनापतींना आकसानें दगा दिला. म्हणूनच ते दोघे बंधु चुरशीनें पेशव्याचा नायनाट करण्याच्या प्रतिज्ञेने साताऱ्यापर्यंत त्याचा पाठलाग करीत गेले. अखेर उभय पक्षातील मडळी साताऱ्याला पोचताच शाहूमहाराजानीं मध्यस्थी करून दाभाडे बंधु व त्याची माता उमाबाई यांची समजूत घालून पेशवे व दाभाडे याची एकी करून दिली. बखरकार या एकीचें वर्णन करतात त्याचा इत्यर्थ असा : "शाहूमहाराज दाभाडे सेनाखासखेल याचे वाड्यांत तळेगाव एथे येऊन सेनापतींची माता खडेराव दाभाडे याची स्त्री उमाबाई होती त्याजपाशीं बाजीराव पेशवे याना नेऊन बोलले की, 'त्रिबकरावही तुझा पुत्र व बाळाजी विश्वनाथ पेशवे याचा आणि खडेराव दाभाडे याचा भाऊपणा होता, त्यास हाही तुझाच पुत्र आहे' असें म्हणून महाराजानीं बाजिरावास तिच्या पायावर घातले, व त्याचें शासन किंवा पालन काय करावयाचे तें कर' असे सागितले तेव्हा उमाबाईनें विनति केली कीं, 'महाराज! आपण धनी मायबाप आहा सर्व लेकरें आम्ही तुमचीं आहोंत जी आज्ञा कराल, ती सर्वांस मान्य आहे' त्याजवरून महाराजानीं यशवतराव दाभाडे सेनाखासखेल व बाबूराव दाभाडे यांस सागितलें कीं, 'जी गोष्ट घडो नये ती झाली याउपरी तुम्हीं व बाजीराव यानीं माझे पायावर हात ठेवावा कीं, याउपरी जाहल्या गोष्टींची चुरस मनांत नाहीं'. याप्रमाणे बोलून त्रिवर्गापासून पायावर हात ठेवून घेतला, आणि सेनापतींचीं वस्त्रे यशवतराव दाभाडे सेनाखासखेल यास दिलीं सेनाखासखेलीचीं वस्त्रें महाराज बाबूराव दाभाडे यास देऊ लागले, ते वेळेस बाबूराव यानीं विनति केली कीं, 'मी धाकटा भाऊ, वडील भावाने करावे व धाकटया भावाने त्याचीं वस्त्रें घ्यावीं हें मजला उचित नाही पूर्वी खडेराव यास दोहों पदांचीं वस्त्रें दिलीं होतीं त्याप्रमाणें वडील बधु यशवतराव आहेत त्यासच द्यावीं मी सरकारसेवा करीन तेव्हा सरकार जे पद देतील तें घेईन तोपर्यंत पदास मी अधिकारी नाहीं' त्याजवरून महाराजानीं पाठ थोपटून आज्ञा केली कीं, 'तू सवाई बाबूराव सेनाखासखेल आहेस. तू चाकरी करून दाखविशील तेव्हां तुजला दुसरें पद नवें उत्पन्न करून देईन'. ऐसें

बोलून सेनाखासखेलीचीं वस्त्रे, हत्ती, घोडा, शिरपेच, कंठी वगैरे देऊन त्याचा बहुमान केला ”

* * *

सेनापति त्रिंबकराव दाभाडे वगैरे पेशवाईतील दुर्जनाच्या लयाची कथा याप्रमाणे आहे आता यानंतर जंजिऱ्याच्या हिंदुद्वेष्ट्या सिद्दीच्या अरेरावीला आळा घालून व कोंकणपट्टींत तेव्हां सत्ताधारी असलेल्या आंग्र्याचा गृहकलह मिटवून पेशव्यानीं त्या बाजूला कसा विजय संपादन केला, हा मनोरम वृत्तान्त **‘पेशवाईतील पश्चिम दिग्विजय’** या कादंबरींत कथन करण्याचें वचन देऊन वाचकाची तूर्त रजा घेतो.

इत्यलम्

श्री० हडप यांच्या 'कादंबरीमय पेशवाई' मधील

# आजवरच्या कादंबऱ्या

पेशवाईचें पुण्याहवाचन

पेशवाईची प्राणप्रतिष्ठा

पेशवाईचें ध्रुवदर्शन

पेशवाईचा ध्रुव ढळला

पेशवाईचा पुनर्जन्म

पेशवाईचें पुनर्वैभव

पेशवाईचा दरारा

पेशवाईतील दुर्जन

---

## पुढील चार कादंबऱ्या

पेशवाईतील पश्चिम–दिग्विजय

पेशवाईतील धर्मसंग्राम

पेशवाईतील उत्तर–दिग्विजय

पेशवाईवरील गण्डान्तर

या व अशा आणखी मिळून सुमारे पंचवीस कादंबऱ्या 'कादंबरीमय पेशवाई' मधून यथाक्रम प्रसिद्ध व्हावयाच्या आहेत.